पॉप्युलर प्रकाशन : २ :

प्रकाशक :
**गणेश रामराव भटकळ**
पॉप्युलर बुक डेपो
लॅमिंग्टन रोड, मुंबई ७



प्रथमावृत्ती
१२–१०–१९५२

मुखपृष्ठ :
**दीनानाथ दलाल**

मुद्रक :
**विष्णु पुरुषोत्तम भागवत**
मौज प्रिन्टिंग ब्यूरो,
खटाववाडी, मुंबई ४

## अनुक्रमणिका





अरविंद गोखले
यांचे कथासंग्रह

नजराणा
जन्मखुणा
उन्मेष
तनुजा
माहेर
मीलन
जागरण
कमळण



# कमळण



लोकरीच्या पांढऱ्या पटांतून सुयांचीं चकचकीत टोकं पुढंमागं सरकत होतीं. गुंतला गेलेला धागा जेमतेम हालत होता; ओघळत बाजूला पडलेल्या गुंड्यांत मिसळून गेला होता. लोकरीचा तो लहानसा गोळा सूर्यप्रकाशाच्या पट्ट्यांत चांदीसारखा चमकत होता. खालीं पसरलेल्या चटईवर पेपरवेटसारखा वाटत होता. चटई, भोंवतालची फरशी, भिंती नि आढं दुपारच्या रखरखाटानं फटफटीत पडलं होतं. दोन खोल्यांच्या त्या सुबक संसारांतल्या साऱ्याच वस्तू उन्हाच्या कडाक्यानं करपून गेल्या होत्या. भिंतीवरचे कपडे, कॅलेंडर, आरसा व तसबिरी; भिंतीजवळचं टेबल, कोच, कपाट व पलंग; आणि आंतघरांतलीं एकूण एक भांडीं, विझलेली चूल व भरून ठेवलेलं पाणी. अगदीं स्तब्ध, मलूल. मलूल आणि मृतवत्. आणि त्या तप्त, तटस्थ वास्तूंत केवळ सुयांचीं निमुळतीं टोकं हालत होतीं.

कमळा केवढा वेळची विणकाम करीत बसली होती. सकाळचं काम संपल्यावर तिनं जेवण उरकलं होतं, व कामावर गेलेल्या श्रीकांतचा डबा भरून ठेवला होता. पाणी भरणं, पेपर चाळणं, शेजारीं डोकावणं, असं करण्यांत तिनं आणिक थोडा वेळ दवडला होता. मग डबेवाला येऊन गेल्यावर ती विणकामाचं पुड्यांत घेऊन भिंतीशीं बसली. कधीं तरी अर्धवट करून ठेवलेला श्रीकांतचा स्वेटर. विणकामांत तिला विशेष गोडी होती असं नव्हे. दुपारचा तिचा वेळ कादंबऱ्या वाचण्यांत, झोपा ताणण्यांत अगर मैत्रिणींकडे गप्पा मारण्यांत जात असे. पण आज ती नकळत, निमूटपणें उलटसुलट टांके ओढीत राहिली. दुपार भरभर वर येऊं लागली तरी तशीच अवघडून बसली. एकमेकींवर माना टाकणाऱ्या सुयांकडे दोन्ही डोळ्यांनीं टक लावून पहात राहिली.

कुठलासा काळाशार किडा जवळून वळवळत गेला आणि कमळेची समाधि चाळवली. अनेक पायांच्या व कांटेरी अंगाच्या त्या कुरूप प्राण्याची हालचाल ती बराच वेळ पाहात बसली. तो किडा फरशीवरून फरफटत गेला, भिंतींतल्या भोकांतून नाहींसा झाला. कमळेची दृष्टि तेथून दूर झाली व वर, वळचणींतल्या चिमणीच्या जुनाट घरट्याभोंवतीं भिरभिरली. मग ती श्रीकांत विसरून गेलेलं टेबलावरचं पेन पाहूं लागली. अखेर तिची नजर परत सुयांच्या टोकांवर टेकली. इतका वेळ बसून दोन ओळी देखील पुऱ्या झाल्या नव्हत्या. विणकामांत तिचं मुळीं लक्षच नव्हतं. नुसती सुया चाळवीत ती शून्यपणें बसलेली होती. वेळ घालवीत, विषण्ण अवस्थेंत! —हें ध्यानांत येतांच कमळा दचकली. बावरून पुन्हा खोलीभर पाहूं लागली.

काय झालं होतं आज? असं वेगळं, विचित्र, विषण्ण कां वाटत होतं? कमळेला कळेना. एखादे वेळीं तिला अस्वस्थ होई. लग्नानंतरसुद्धां. पण मग ती लगेच श्रीकांतला बिलगे; अथवा तो नसला तर कांहीं काम वा करमणूक काढून त्यांत दंग होई. खरं म्हणजे वेळ कसा दवडायचा हा प्रश्न पडे एवढाच त्या अस्वस्थतेचा अर्थ. आजची ही अस्वस्थता अगदीं वेगळी होती. आज वाचण्यागाण्यांत किंवा मैत्रिणींच्या मेळाव्यांत मन रमणार नाहीं हें जाणवत होतं. झोपण्या-लोळण्याचं भय वाटत होतं. हें उमगूनच कीं काय, ती विणकाम करण्यास बसली. पण त्या यंत्रासारख्या क्रियेंत तिचं मन मिसळून गेलं नाहीं. आंत, हृदयांत अगदीं खोलवर कांहीं तरी चुकचुकल्यागत वाटत होतं आज. एखादी वस्तू हरवली आहे अशा नुसत्या भावनेनंच चुटपुट लागावी, किंचित् कसर आल्यावर अंग मोडून यावं, तसं कांहींसं झालं होतं. काय तें नीट आकलन होत नव्हतं. म्हणून अधिकच खिन्न, विषण्ण वाटत होतं.

घरटं सांपडलं नाहीं कीं पांखरू जसं दोन्ही पंख फडफडवीत आकांत करतं, तसे तिचे दोन्ही डोळे दाही दिशांना फिरले व मन टकटकूं लागलं. तिचं घरटं ठिकाणावर होतं. ती आपल्याच घरट्यांत सुरक्षित होती. मग असं कां झालं? कुणी तिला रागावलं तर नव्हतं?—पण राजाराणीच्या त्या संसारांत तिसरं माणूस येणार कुठून? श्रीकांत तर तिच्या मनासारखा वागत होता. सकाळपासून तिच्याभोंवतीं घोटाळत होता. कचेरीला जातांना तिला जवळ घेऊन, परततांना सिनेमाचीं तिकिटं आणायचं कबूल करून गेला होता. परवांच ती आईकडे एक दिवस राहून आली होती. शेजारणीचा, रामा गड्याचा, रेशनवाल्याचा, कुणाचाच त्रासतंटा नव्हता...

काल-आजच्या घडामोडी कमळा आठवीत होती; पण तिला पक्कं वाटत होतं कीं रागावण्या-रुसण्याइतकं साधं, उघड निमित्त नाहीं आपल्या अस्वस्थतेचं ! कधीं तरी, कांहीं तरी आपण वाचलं असेल, पाहिलं असेल अन् तेंच आपल्या हृदयांत घर करून कायमचं राहिलं असेल. वर्तमानपत्रांतली कुठली तरी बातमी, रेडियोंतून आलेली एखादी आर्त ओळ, भरवेगानं गेलेल्या गाडींतला कुणाचा तरी चेहरा... कदाचित् ह्यापैकीं कांहीं नसेल. कदाचित् कुठलं तरी स्वप्नांतलं, स्मृतींतलं......

हातांतली लोकर खालीं टाकून कमळेनं दीर्घ निःश्वास सोडला. जुन्या घटनेंतले अगर अर्ध्यामुर्ध्या स्वप्नांतले धागे शोधीत बसायचं म्हणजे केवळ अशक्य कोटींतलं काम होतें. तरी पण बहुधा त्यापैकींच, तसलं कांहीं हृदयांत हालत असणार, सलत असणार. काय असेल? भरलेल्या हृदयाच्या तळाशीं कल्पनेचीं कसलीं कांसवं हळूच हालत आहेत? कमळेनं श्वास रोधून धरला. डोळे मिटले, टिपले, सताड उघडले. काय आठवत होतं? काय दिसत होतं? आपल्या हृदयांत आपणच डोकावून पाहण्याचा प्रयत्न तिनं केला. संध्याकाळचे दोन क्षण, अस्पष्टशीं दोन शरीरं, शून्यांतून विस्तारणारं मोठं, नवं जग...

कमळा कमालीची दचकली. दोन अडीच वर्षांपूर्वीची ती संध्याकाळ तिच्या मनावर काजळी धरीत होती. त्यांतल्या दोन आकृती वाकुल्या दाखवीत होत्या. ज्या क्षणापासून तिच्या आयुष्याला नवं वळण लागलं, ज्या स्पर्शापासून तिच्या जीवनाला नवा उजळा मिळाला, ज्या शब्दामुळें तिच्या अस्तित्वाला वेगळाच अर्थ आला तीच सारी घटना अगदीं अंधुकपणें तिच्यापुढं तरळत होती. अन् त्यामुळें तिला अंधेरी येत होती. असं कां व्हावं? आजच असं उलटं, वाकडं कां वाटावं?—श्रीकांत आणि ती प्रीतीच्या आणाभाकांनीं बद्ध झालीं तेच ते गहिरे, सोनेरी क्षण! वारंवार त्यांची आठवण करणं हेंसुद्धां तितकंच आनंददायक, उन्मादक होतं. पण नेहमीं सुखावणारी ती आठवण आज नकोशी वाटली. अंगावर रोमांच उठण्याऐवजीं आतां तोंड कडू झालं, डोळे ओले झाले. कमळेला त्या स्मृतीचं भय वाटलं; व आधारासाठीं ती परत त्याचंच स्वप्न पाहूं लागली.

सारं स्पष्ट होतं, सत्य होतं!...कॉलेज सुटल्यावर श्रीकांत आणि ती त्या एकाकी रस्त्यानं जात होतीं. प्रोफेसरांच्या व अभ्यासाच्या गप्पा नांवाला मारीत चाललीं होतीं. एकाएकीं वावटळ उठली. धुळीचे लोट टाळण्यासाठीं दोघंजणं एका डेरेदार

झाडाखालीं थांबलीं. धुळीची भिंत समोरून धावत सुटली. कमळा श्रीकांताजवळ सरकली. त्यानं तिला आधार दिला. मग आलिंगन दिलं! म्हणाला, " मी तुझ्यावर फार प्रेम करतों. तुझ्याशिवाय माझं आयुष्य...माझ्याशीं लग्न करशील?" वावटळ आटोपून सारं स्वच्छ झालं. भावी सहजीवनाचे बेत करीत दोघं फुलून चालूं लागलीं...

किती तरी दिवस हें दृश्य तिला दिसत राहिलं. त्या धुंदींतच लग्न झालं, संसार सजला. त्या आठवणीचा सुगंध साऱ्या संसारभर भरून राहिला. श्रीकांताचे ते शब्द, ती मिठी, आजहि अभंग होतीं. पण आज...आज वेगळं रूप घेऊन ती घडामोड हृदयांत हलकेच चमकली; अन् कमळा चरकली.

मनांतले वेडे विचार आणिक वाढूं नयेत म्हणून कमळा उठून उभी राहिली. त्या संध्याकाळच्या क्षणामुळें, स्पर्शापासून निर्माण झालेला स्वर्ग समोर साकार होता. शय्या, स्वैंपाकगृह, कपडे, पुस्तकं, दागिने. पण उभं राहतांना कमळेला वाटलं कीं सारं कलंडत, कोसळत आहे. समोरचा संसार नकली, नाटकी आहे. ह्या भावनेनं तिची काया थरारली. भिंतीचा आधार घेत ती भिंतीवरच लटकवलेला तिचा व श्रीकांतचा एकत्र फोटो पाहूं लागली. नुकतंच काढलेलं दोघांचं चित्र: दोघांचे चेहरे प्रसन्न होते. एकमेकांबद्दलच्या गाढ निष्ठेनं, असीम आत्मीयतेनं भारलेले होते. स्वर्गीय प्रीति त्या चारी नेत्रांतून प्रकाशत होती. त्या उजेडांत कमळा आपल्या मनाला उजळा देण्याचा यत्न करूं लागली.

—नकली, नाटकी! इवल्याशा कल्पनेवर उभारलेलं. केवळ मोहांतून उत्पन्न झालेलं!—तिचं मन एकदम टकटकलं. चित्रांतले चेहरे मागें सरले. वर रेखलेल्या वेलबुट्टींच्या पर्णहीन फांद्या झाल्या; अन् झाडाखालीं उभीं असलेलीं कमळा-श्रीकांत तिला दिसूं लागलीं. आतां अधिक स्पष्ट, स्वच्छ. पण पूर्वीपेक्षां फिकट नि क्षुद्र. कमळेची व्याकुळता वाढली. स्वतःला सांवरण्यासाठीं तिनें तेथून नजर काढली. आतुरतेनं पलंगावर, स्वैंपाकगृहांत, व्हरांड्याकडे वळली. ह्या व्हरांड्यांत ती डोळयांत प्राण आणून श्रीकांतची वाट बघे; तो कचेरीला निघाला कीं त्याला रुमाल दाखवी. ह्या स्वैंपाकघरांत सुगरपणा दाखवून तिनं श्रीकांतला भरवलं होतं; पत्नीधर्म पाळला होता. अन् हा पलंग!...कमळेचं हृदय अनेक रात्रींच्या असंख्य स्मृतींनीं भरून आलं.

नको, आणिक कुशंका नको—कमळेला वाटलं व ती वेगानं टेबलाकडे धावली. टेबलाच्या खणांत वरच बँकबुक होतं. काटकसर करून, योजना आंखून, दोघांनीं

टाकलेली शिल्लक तिनं डोळे फाडून, डोळे भरून पाहिली. त्यांच्या एकतानतेचं, समरसतेचं मोल होतं तें!—त्याखालींच श्रीकांतनं वेळोवेळीं तिला लिहिलेलीं पत्रं रेशमी रुमालांत बांधून ठेवलेलीं होतीं. लग्नाआधींचीं व लग्नानंतरचीं प्रेमपत्रं. तेच शब्द, तेच सूर, तोच जिव्हाळा. दिव्य, भव्य प्रीतीचा उमाळा. पहिल्या दिवसापासून आजतागायत तीच उत्कटता, अपूर्वता. कमळेनं तो रेशमी ठेवा उचलला, आवेगानं छातीशीं धरला. होय, त्यांचं एकमेकांवर खरोखरीच खोल, भव्य, अमर प्रेम होतं! कमळेला तरी कसलाच किंतु उरला नाहीं. समाधानाचा श्वास सोडीत तिनं टेबलाचा खण बंद केला व खिडकी उघडली.

—हळूहळू तिच्या मनांतला चोरकप्पा उघडला. हृदयांतला सल हालूं लागला. पुन्हा विपण्ण, विषादपूर्ण वाटूं लागलं. चेहऱ्यावरचं समाधान पुसून गेलं. डोळे ओले झाले व खांदे खालीं ओघळले. रंगवलेला, मांडलेला संसार अधिकच डगडगूं लागला.

कमळेला कळून चुकलं! हें सारं कां नि कसं जाणवलं हें गूढ असलं, तरी इतकं खरं कीं आपल्या ह्या सुंदर संसारविश्वाची उभारणी एका क्षुद्र क्षणावर झालेली आहे! आपण सुबकसं घरटं बांधलं, एकमेकांना सोबत दिली हें जितकं सत्य तितकंच आपण केवळ कृत्रिम, काल्पनिक भावनेनं जवळ आलों, एकजीव झालों हें सत्यच!—कॉलेजमधली फक्त कांहीं दिवसांची, कांहीं घटकांची ओळख आपली. वाचनालयांत, रस्त्यावर घडलेल्या आटदहा तुटपुंज्या भेटी. बहुतेक वेळ परीक्षा, नोट्स, नाटकं, हवापाणी व मित्रमैत्रिणी ह्यांवर गप्पा मारीत गेलेला. एकमेकांच्या आवडीनिवडींची, कल्पनाभावनांची, हृदयाशरीरांची ओळख कुठें होती एवढी? कसलं आलंय् आपलं भव्य, दिव्य प्रेम? प्रेम, प्रेम म्हणायला आपण काय असं सहन केलं होतं, साहस केलं होतं, त्याग केला होता, अग्निदिव्य केलं होतं?—वडील माणसांचा मोडकातोडका अडसर, पैशानोकरीच्या तात्कालिक अडचणी. त्याग, प्रेम, चिरमीलन इत्यादि शब्द उच्चारायला तेवढे मुखवटे पुरेसे होते. तेवढ्या रंगरंगोटीवर आपण हें नाटक चालवलं आहे. हें सारं खरंच भव्य, अमर मानून ह्यांत गुंगून पडलों आहोंत. पण हा खेळ केवळ त्या संध्याकाळच्या मोहाच्या घटनेला वाट करून द्यायला, उदात्त आकार आणायला मांडला आहे. तारुण्यांतल्या, उन्मादांतल्या त्या थरथरत्या स्पर्शानं, तकलादू शब्दांनीं फुगवलेला हा रंगीबेरंगी फुगा आहे. श्रीकांत आपल्याला खूप आवडत असेल, संसारांत आपण

जीव ओतला असेल; पण त्यावर प्रीति, प्रेमविवाह, खरा संसार इत्यादि चिठ्ठ चिकटवल्या आहेत त्या मात्र वेगडी आहेत !

कमळेच्या डोळ्यांतून पाणी ओघळलं आणि तिची काया थरथरूं लागली. आजवर उराशीं धरलं, उजळ माथ्यानं मिरवलं तें केवळ असं क्षुल्लक, क्षुद्र आ हें उमगून तिला भोवळ आल्यासारखं झालं. आयुष्यांतले सारे अस्मानी, अद्भु रंग उडून गेले व तिला निराधार झाल्यासारखं वाटलं. बिऱ्हाड थाटणं, बँकबु भरणं, श्रीकांतला निरोपाचा रुमाल फडफडवणं नि त्याच्या पांघरुणांत मिसळू जाणं ह्यांतलं स्वारस्य संपलं. त्या साऱ्या चारचौघीजणी करतात तसल्या मामुल गोष्टी होत्या. चाळींतल्या चोवीसपंचवीस बिऱ्हाडांत जसे टमाबाईहणमंतरावां संसार होते तसाच तिचा साधा, सामान्य संसार होता. ते संसार तर सांगून सवरू राक्षसविवाहाचे होते. कावळ्याचिमण्यांचीं घरटीं होतीं तीं. आपणच मात्र स्वतः स्वर्गांतली, प्रीतीच्या नंदनवनांतली मानीत होतों. छी, आपलाच संसार उल अधिक कळकट, कलंकित आहे.

कमळेला स्वतःची अनुकंपा वाटली. स्वतःच्या संसाराचा क्षुद्रपणा उमगला ती मटकन् खालीं बसली. आतां तिला तो टेबलाचा खण उघडावासा वाटेन त्यांतलं बँकबुक भेडसावूं लागलं. त्या सायंकाळच्या पापाचा, मोहाचा मोबदल मूल्यमापन मांडलं होतं त्यांत ! श्रीकांतच्या प्रेमपत्रांतल्या ओळी विषारी नागिणी सारख्या वळवळूं लागल्या. ...'तूं माझं जीवनसर्वस्व आहेस', 'तुझ्याशिवाय आयु फोल आहे', 'अहोरात्र तुझंच चिंतन', 'तुझ्या हृदयाची ओळख'... कुठली ओळ नि कसलं सर्वस्व ! केवळ कल्पनेचे मनोरे सारे ! ढोंग, ढोंग आणि लफंगेगिरि नागिणी जिभा काढीत वळवळूं लागल्या, विळखे घालूं लागल्या. नवऱ्याच्या ल वासनेच्या वचनांवर ती दांतओठ खाऊं लागली. तीं पत्रं फाडून टाकावींत असा ति चेव आला. पत्रंच काय, पण त्याचं हास्य, कुजबूज, आलिंगन सारं तिला आठवल असह्य झालं. कधीं नाहीं तो श्रीकांतचा तिटकारा, तिरस्कार वाटूं लागला.

पण मग ती भांबावली. त्यालाच एकट्याला बोल लावण्यांत काय अर्थ होता ह्या नाट्यांत, ह्या कटांत तीहि तितकीच वांटेकरी नव्हती काय ? टेबलावर पडले पेन तिनेंच त्याला वाढदिवसाची भेट म्हणून दिलं नव्हतं का ?—समोर पडले स्वेटर ती कुणासाठीं विणीत होती ?—त्याची वाट पहात व्हरांड्यांत घुटमळण सट्टीच्या दिवशीं त्याला आपल्याभोवतीं घोटाळत ठेवणं, मच्छरदाणीच्या मखरां

त्याच्याशीं विलास करणं—हें सारं कां?—अन् त्या संध्याकाळीं वादळाचं निमित्त करून त्याला बिलगणं, लाजणं, सर्वस्व देणं, हें तरी कुणाचं कृत्य?

कमळा खिन्नपणें, शून्यपणें बसून राहिली. दांतओठ खाण्यांत अर्थ नव्हता; अश्रू ढाळण्यांतहि नव्हता. अपूर्वता, उत्कटता असेल तरच आठ्यांना अगर अश्रूंना मोल! इथं कुणीं कुणासाठीं रडारागवायचं?—फुसक्या भावनेवर बांधलेला डोलारा हा. त्यांत हृदयांतल्या तुफानाला कुठला वाव? कमळा तशीच मख्खपणें, मुर्दाडपणें बसून राहिली.

कुठें तरी घड्याळांत एकामागून एक ठोके पडले व कमळा भानावर आली. तिला वाटलं, श्रीकांतचे बूट वाजले. तो आला. आवेगानं तिला जवळ घेऊं लागला. चहा मागूं लागला. सिनेमाचीं तिकिटं देऊं लागला. दोघंजणं एकमेकांचे लाड करूं लागलीं. इतरांच्या संसाराची टवाळी करूं लागलीं. एकमेकांच्या प्रगाढ प्रेमाबद्दल...

ढळणाऱ्या पदराखालीं छाती धडधडली आणि कमळा दचकून उठली. श्रीकांत आला नव्हता. अजून प्रेमाची, स्वर्गाची भाषा सुरू झाली नव्हती. पण लवकरच तो येईल. लवकरच नाटक सुरू होईल. कमळेला वाटलं, नको तो नकलीपणा! किती दिवस ही सारवासारव करायची, स्वतःची फसवणूक करायची?—अजाण तारुण्याच्या उन्मादांत सुरू झालेली ती संध्याकाळ आतां संपलेली बरी नाहीं का? आपल्या संसाराचा पाया, पूर्वेतिहास पुन्हा एकवार डोळ्यापुढें उभा राहिला नि तिला कसंसंच झालं, किळस आली. स्वेटर, फोटो, पेन, टेबलाचा खण, भांड्यांच्या उतरंडी व वर गेलेली मच्छरदाणी तिच्यापासून दूर जाऊं लागली, अंधुक होऊं लागली. तिला वाटलं, आपणच दूर व्हावं. श्रीकांत येण्याआधीं अदृश्य व्हावं. त्याच्या मिटीं-तून मोकळं व्हायला, त्या झाडाच्या सावलींतून सुटायला ती धडपडूं लागली.

कमळा बिऱ्हाडाबाहेर आली. दाराला कुलूप लावतांना तिचं हृदय धडधडलं. इतक्या आत्मीयतेनं मांडलेला जोडलेला संसार सोडण्यासारखा खुळेपणा दुसरा नव्हता. आपल्याला वेड लागलं आहे कीं काय अशी तिची तिलाच शंका आली. ती तशीच कुलुपाजवळ घुटमळली. पण एकदां बंद केलेलं दार परत उघडायचा तिचा धीर झाला नाहीं. एका अल्लड मुलीनं एका भोळसट मुलाशीं फिरकोळ प्रणय केला; आणि मग त्या मूर्खपणाला आपल्या संभावित रूपास साजेसं नांव द्यायची केविल-वाणी धडपड केली. तें नांव म्हणजेच अपूर्व, अमर प्रेम! तो खेळ म्हणजेच हें बिऱ्हाड!—ह्या बिऱ्हाडांत कमळेनं परत प्रवेश करायचा? एकदां सत्य समजल्यावर? खोट्याचा त्याग करायचं ठरवल्यावर?

चाळ ओलांडून कमळा हमरस्त्यावर आली. चाळींतले चिमणाचिमणींचे संस पाहून तिला स्वतःची जरा शरम वाटली, जरा सुटल्यासारखं वाटलं. स्वतःर सांवरीत ती झपझप चालूं लागली. दुतर्फा असलेल्या दुकानांतून पुस्तकांचीं मुखपृ लटकत होतीं. भिंतींवरून चित्रपटांच्या जाहिराती चिकटवल्या होत्या. वाऱ्यावादळाश झगडून, उभ्या समाजाचा विरोध पत्करून केलेल्या प्रेमाच्या अमर कहाण्या. एक मेकांमार्टी झुरून, झिजून अखेर झालेलं युगायुगांचें चिरमीलन. त्या चित्रांक जाहिरातींकडे कमळा वेड्यासारखी पहात गेली. वाचलीं-ऐकलेलीं दैवी प्रीतीचीं अने उदाहरणं तिला आठवलीं. आठवलीं नि उदासवाणं झालं. त्या कहाण्यांची नायिका र उरली नव्हती आतां. संसारचक्रांत फिरणारी ती एक साधी चिंध्यांची बाहुली होती

"का हो—एवढ्या घाईंत?—कुठं माहेरीं का?" समोरून आलेल्या सुशीर जोशीनं हटकलं. कमळा दचकली, थबकली. मग मान हालवून पुढें निघाली. पोरां लटांबर घेऊन जाणारी सुशीला आपल्याकडे वळून पहाते आहे, हसते आहे अ तिला वाटत राहिलं. ह्याच सुशीलेला आजवर ती हसत होती, हिडिसफिडिस कर होती. केवळ इस्टेट बघून एका अजागळाशीं तिनं लग्न केलं म्हणून. सुशीले पैशांशीं लग्न झालं, पण कमळेचं तर पापाशीं लग्न झालं! काळा नवरा नि ढीग दागिने घालून सुशीला मिरवते म्हणून तिचा उणेपणा उघडा पडतो; कमर संभावित म्हणून तिचं व्यंग झाकलं राहातं, इतकंच!...

आणि माहेर! माहेरच्या आठवणीनं कमळा काळवंडून गेली. खरंच, माहेरीं, आईकडे निघाली होती. एवढं तेवढं कांहीं झालं तरी आईच्या कुशींत सा शल्यं बोथट होतात. श्रीकांतइतकाच आईचा आधार तिला होता. आणि नवऱ्या टाकल्यावर आईखेरीज ती कुठं जाणार? आईनेंच तिच्या विवाहाला तत्काळ संम दिली होती. तिला टुमदार संसार मांडून दिला होता. आतां आईच...

पण कमळा रस्त्यावरच थांबली. तिला पाऊल उचलवेना. आईपुढं कुठल तोंडानं जायचं, काय सांगायचं, हें समजेना तिला! लग्न करण्याचा हट्ट जसा धर तसा लग्न मोडायचा धरायचा?—स्वतःच्या पापाचा, पश्चात्तापाचा पाढा वाचायच आणि आई सांत्वन तरी काय करणार?—कुणी समजूत घालण्यासारखं, सांत्व करण्यासारखं दुःख नव्हतंच तिचं! तिची व्यथा तिनं एकट्यानंच भोगायला हवं तिचं दुखलेलं, सुजलेलं मन तिच्याच अश्रूंनीं, कृत्यांनीं स्वच्छ होणार होतं.

कमळा धीर धरीत. बळ एकवटीत. निघाली. दसऱ्या. दरच्या रस्त्यानं गांवाबा

निघाली. आईची आकृति अजून डोळ्यांपुढं येत होती...आत्तां आई ओसरीवर उतरत्या उन्हांत चोळी शिवीत बसली असेल.—ये, कमळू—भलत्या वेळीं कशी आलीस? नवरा यायची वेळ झाली असेल ना?—कमळे, माझा कुठं तुझ्यासारखा प्रेमविवाह झाला होता? तुझ्या वडिलांना मीं प्रथम पाहिलं तें बोहल्यावरच!—कमे, बाई, तुझा जन्म झाला तेव्हां आमची दोघांची धड ओळखहि झालेली नव्हती!—पोरी, मोठी भाग्याची तूं! तुमची पिढीच भाग्याची. मनांतला, प्रेमांतला पति पटकावतां...आई बोलत होती, अन् कमळा रडत होती. आईच्या आठवणींनीं तिचे डोळे भरून येत होते व रस्ता नीट दिसत नव्हता. अखेर ती गांवाच्या बाहेर रस्त्याच्या कडेला थांबली...आई, तुला वाटतं तितकी तुझी लेक सरळ नाहीं, आजच्या पोरी भाग्याच्या नाहींत. तूं संसारांतली दुपार चोळ्या शिवण्यांत घालवतेस, आम्ही स्वेटर विणण्यांत दवडतों. एवढाच फरक! एका धाग्याचा, एका पिढीचा. तुझ्यासारखाच माझा—छे, तुमचे संसार सरळ सरळ सौदे तरी होते. आमचे, माझा प्रेमविवाह हा फसवेगिरीचा धंदा आहे केवळ...तिचं हृदय आकांत करीत म्हणालं, व तिचे डोळे सारखे अश्रूंचे सर सोडूं लागले. हृदयांतली ही वावटळ कशी थांबवावी, कळेना तिला! ती तशीच ळळत लोंबत बाजूच्या हिरवळीवर गेली. एका मोठ्या झाडाखालीं निर्जीवपणें बसली.

किती तरी वेळ कमळा शून्यपणें बसून होती. तिला आतां आई आठवत नव्हती. श्रीकांतचं तर स्मरणहि होत नव्हतं. आजूबाजूचा अंदाजच येत नव्हता. आपण कुठं आलों, कुठं जाणार, कांहींच विचार सुचत नव्हता. पापाच्या एकमेव जाणिवेनं ती जळत होती; पश्चात्तापाच्या भावनेनं अश्रुपात करीत होती.

...बऱ्याच वेळानं ती भानावर आली. तिचं हृदय दमून गेलं होतं नि डोळे कोरडे पडले होते. हृदयांतला सल नाहींसा झाला होता व चिखलांत रुतलेल्या भावना मोकळ्या हवेंत अंकुर काढीत होत्या. पश्चात्तापानें, पापाच्या जाणिवेनें किती क्लेश झाले होते तिला! आपलं व्यक्तिमत्त्व राखण्यासाठीं, मिळविण्यासाठीं तिनं संसार सोडायचं साहस केलं. स्वतःच्या बेगडी प्रेमावर कोरडे ओढून श्रीकांतला सोडायचं अग्निदिव्य केलं!—दुःखाची, त्यागाची, दृढ निश्चयाची, प्रगल्भ भावनांची परिसीमा गांठली. आतां केवळ मोहाच्या मागं, तकलादू शब्दासाठीं, फसव्या भावनेपायीं ती वेडावणार नव्हती. सर्वस्व देणार नव्हती. तिला उघड्या डोळ्यांनीं मांडलेला, समंजस भावनेवर आधारलेला संसार हवा होता, स्वामी हवा होता.

कमळेचं म्लान मुखमंडळ जरासं उजळलं. तिनं भोवतालीं पाहिलं. आपण कुठें, कशा आलों हें तिला कळेना. संध्याकाळ झाली होती. आकाश धूसर झालं होतं. मंद वाऱ्याच्या झुळकी सुटल्या होत्या. दूरच्या इमारतींतून दिवे लागत होते. रस्ता निर्मनुष्य होता. तिच्या डोक्यावरील फांद्या......

कमळा थरथरली. हालणाऱ्या फांद्या, झुलणारीं पानं पाहून शहारली. तें कुठलं तरी जीर्ण, विस्तीर्ण वडाचं झाड होतं !—त्या झाडाकडे मोठ्या डोळ्यांनीं पहातां पहातां तिला दोन अडीच वर्षांपूर्वीच्या असल्याच एका वृक्षाची आठवण झाली. अकस्मात् वावटळ आली म्हणून त्या वृक्षाखालीं ती श्रीकांतसह आश्रयाला आली. थरथरतं तारुण्य एकत्र आलं, एकांतांत सांपडलं. त्या उन्मादांत आलिंगन दिलं गेलं. ती वावटळ विरून जाण्यासाठीं विवाह-विधि करण्यांत आला...

पण हें झाड वेगळं होतं. ही संध्याकाळहि वेगळी होती. आज वावटळ नव्हती, चोरटा मोह नव्हता, प्रियकरहि नव्हता...कमळेला एक प्रकारचं समाधान वाटलं, शांत वाटलं. त्या मोहांतून, त्या खोड्यांतून ती आतां सुटली होती. तिला आतां समज आला होता. स्वत्वाची जाणीव झाली होती. जगाच्या व्यवहाराची, भावनांच्या सच्चेपणाची कल्पना आली होती. त्यांतून ती स्वतंत्र झाली होती. एकटी झाली होती.

एकटी...कमळेला विचित्र वाटलं. तिला एकटं जगांत रहायचं नव्हतं. कुणावर तरी प्रेम करून जगायचं होतं. मात्र खरंखुरं, भव्य, दिव्य प्रेम ! आजूबाजूला पाहतांना तिला अधिकच एकाकी वाटलं, असहाय झालं. तिचं धुवून निघालेलं, फुललेलं मन पिंगा घालूं लागलं. श्रीकांतची अति तीव्रतेनं आठवण झाली, उणीव भासली. आज अडीच वर्षं दोघांनीं जग पाहिलं होतं, जीवन जगण्याचा यत्न केला होता. एकमेकांच्या आवडीनिवडी, कल्पनाभावना, हृदयंशरीरं समजून घेण्याची धडपड केली होती. कमळेला वाटलं, आपल्या स्वच्छ झालेल्या मनोभूमींत आज खरं प्रेम, नवं प्रेम जन्म घेत आहे !...'आज थरथरती संध्याकाळ नाहीं, अपघाती वावटळ नाहीं, मोहाची मदत नाहीं—पण श्रीकांत, तरीहि तूं हवास !—माझं हृदय स्वीकारायला, प्रेम पूर्ण करायला हवास...' तिचं प्रौढ, प्रसन्न मन त्या शांत संध्याकाळीं साद घालूं लागलं; आणि वडाच्या जीर्ण खोडाला टेकून ती अधीर मनानं नि आत्मविश्वासानं श्रीकांतची वाट पाहूं लागली.

* * *

# अधर्म

२

येणार असल्याची खात्री असूनहि आपल्या प्रिय व्यक्तीची वेड्यासारखी मार्ग-प्रतीक्षा करीत राहणं ह्यासारखा वेदनेचा विषय जगांत दुसरा नसेल. निदान त्या क्षणीं तरी त्याला तसं वाटलं. बरोबर दीड वाजतां येईन असं मेधा म्हणाली होती. आणि आत्तां कुठें एक वाजत होता. तब्बल तीस मिनिटं अवकाश होता. अनेक लोकलगाड्या, बसगाड्या, टॅक्सीज् चोहोंकडून येत होत्या. आणि ह्यांपैकीं कुठल्याहि वाहनांतून कुठल्याहि क्षणीं मेधा येण्याची शक्यता होती. ती येणार ह्यांत संदेह नव्हता. पण तरीहि तो घुटमळत होता, घामाघूम होत होता. घड्याळाकडे वारंवार पहात होता. चर्चगेट, एरॉस्, स्टेडियम व पुरोहित ह्यांमधल्या चौकोनांत त्याची दृष्टि रिंगण घालीत होती. धास्ती, धडपड, शंका, व्यामोह—अनेक भावनांनीं तो कावराबावरा झाला होता.

काय गंमत आहे ! मेधाची दहा वर्षांपूर्वी तो अशीच मार्गप्रतीक्षा करीत असे. पुण्यास कॉलेज सुटल्यावर, अगर कॉलेज टाळून, लायब्ररीजवळच्या जिन्याशीं अगर देवळाजवळच्या बोळाशीं असाच वाट पहात असे. आतां स्थळ बदललं, गांव बदललं, जग बदललं—पण पुन्हा त्याच व्याकुलतेनें वाट पाहणं नशिबीं आलं. अन् त्याच व्यक्तीची ! जणूं कांहीं केवळ काळ लोटला, कॉलेजजीवन सरलं, पण दोघांच्या चोरट्या, थरथरत्या गांठीभेटी चालूच राहिल्या. प्रेमाच्या आणाभाकांचे चिंचोके झाले नाहींत, कीं मीलनाची शक्यता कायमची दुरावली नाहीं.

चर्चगेटच्या गर्दीत मेधा दिसली नाहीं तशीं तो वाटेमधलं अळं ओलांडून अस्वस्थपणें एरॉस चित्रगृहाशीं गेला. लांबीनें वाढत गेलेल्या एका कुरूप

कुत्र्याला घेऊन कुणी गोरी युवती तिथें उभी होती; बाकी एकहि स्त्री आसपास नव्हती. तो तिथेंच पायरीवर थबकला. आपल्या मनःस्थितीस अनुरूप असा चित्रपट चालू असेल ह्या समजुतीनें बाजूच्या जाहिराती पाहूं लागला. त्याच्या मनांत नेमकं काय होतं? काल किती तरी वर्षांनीं मेधा अकस्मात् भेटली होती. किती तरी दिवसांनीं परत हृदय हेलावलं होतं, डोळे पाणावले होते. आशानिराशेचे कढ आले नि गेले होते. त्या तुटपुंज्या भेटींत तिचं आपल्यावरील प्रेम तसंच शाबूत आहे हें पाहून तो थक्क झाला होता. जुन्या जखमा, जुन्या वेदना, भावना साऱ्या परत जागृत झाल्या, अनावर झाल्या. हुरहूर, थरथर, प्रेमभंग, मानभंग, उन्माद, उपभोग, नव्या आशा, नवं जग—त्याच्या मनांत नेमकं असं कांहींच ठरत नव्हतं. जाहिरातीवरून कांहीं बोध झाला नाहीं व तो नकळत रस्ता ओलांडून बाजूच्या रेस्टॉरंटशीं गेला. खिशांतल्या सिगरेट्स संपल्या नव्हत्या. तेव्हां रेस्टॉरंटमध्यें डोकावण्याचंहि निमित्त नव्हतं. खिशांत सिगरेटची पेटी होती आणि पेटींत हॉटेलच्या खोलीची चावीहि ठेवलेली होती. त्याच्या डोळ्यांपुढें ती चपटी चावी चमकूं लागली. क्षणभर तो पेटून निघाला. मेधा केव्हां भेटते असं त्याला झालं. पण दुसऱ्या क्षणाला तिच्याबद्दल आपण अभिलाषा धरावी हें त्याला कसंसंच वाटलं. खिशांतला हात काढून त्यानें केसांवरून फिरवला. छे, त्याचं प्रेम काय पवित्र नव्हतं? मेधासह एकांतांत असतांना दाखवलेल्या संयमाचे, समंजसपणाचे अनेक प्रसंग त्याला स्मरले. आणि पुन्हा मेधाची तीव्रतेनं आठवण आली.

फूटपाथवर रेंगाळत रेंगाळत तो परत चर्चगेटच्या आवाराशीं आला. दूरवर दिसणाऱ्या कित्येक पांथस्थ पोरी त्याला मेधाच वाटल्या. पण मेधा आलेली नव्हती. तो अगदीं अस्वस्थ झाला. लोकलमधून बाहेर पडलेल्या लोंढ्याकडे हताशपणें पाहूं लागला. बाजूंनीं कांहीं कोवळीं जोडपीं जात होतीं. पण मेधाच्या नि त्याच्यासारखं भव्य प्रेम ह्या पिढींत कुठलं असायला? ते लोक, लोकलगाड्या, वाहनांचे आवाज, आजूबाजूच्या इमारती त्याला घेरूं लागल्या. मेधाशिवाय कसा वेळ काढायचा हें कळेना. इतकीं वर्षं तिच्याशिवाय कसं जगलों हेंहि उमगेना. तिच्या सहवासांतले सारे क्षण सारखे आठवूं लागले. आणि ते कालच्या भेटींत प्रकटलेले भाव! तिचं हास्य व अश्रू, शब्द व स्पर्श, दिव्य अन् अमर प्रीतिभावना. मात्र नुसती भावनाच आतां उरली होती. बाकी सारे संकल्प संपले होते, छिन्नविच्छिन्न झाले होते. ती

भावना व ही भेट. दुसरी, नि कदाचित् शेवटची. निदान शेवटची तरी, एक वेळ तरी मेधा भेटूं दे, ह्यासाठीं त्याचं मन टकटकूं लागलं.

"मी आल्यें आहें—" मेधा त्याच्या मागं उभी होती व मान वाकडी करून मलूल स्मित करीत होती. तो दचकला. तिच्या दर्शनानें दिपून गेला. खरंच, ती त्याच्या पुढ्यांत होती. तीच, त्याचीच! वक्षःस्थलाशीं पर्स टेकवून त्यावर डावा हात आडवा धरण्याची तिची पद्धत तीच. तिरक्या मानेनं हलकेच हसणं, मध्येंच भरल्या नजरेनं दूरवर पाहणं. टरलेल्या वेळेच्या आधींच कांहीं मिनिटं येणं! तिच्याकडे पाहात त्यानें मन आवरलं. काय तो वेड्यासारखा वाट पहात होता! एखाद्या नुकत्याच प्रेमांत पडलेल्या अगर प्रेम शाबूत असलेल्या तरुणासारखा विव्हळ झाला होता. आतां हें शोभणारं नव्हतं, शिळं झालेलं होतं. तो आतां मोटा झाला होता. मेधाहि आतां बाई झाली होती. दुसऱ्याची बायको झाली होती.

"आपण कुठं तरी जाऊं. इथें उभं राहूं या नको—" मेधा इकडे तिकडे पहात म्हणाली. तिचं वाक्य ऐकतांच तो एकदम हसला. कोवळेपणाचे व प्रौढपणाचे, सारे बंध तत्काळ विसरला. तिलाहि त्याच्या हसण्याचं कारण उमगलं. मोठे डोळे करीत ती म्हणाली, "हो, समजली थट्टा. पण माझं मराठी सुधारलंय हं. सांगलीच्या शुद्ध ब्राह्मणाच्या घरची सून आहें मी—"

आतां दोघं 'पुरोहित'पुढच्या फुटपाथवरून चालूं लागलीं. कॉलेजमध्यें असतांना तिच्या मराठीची तो खूप थट्टा करीत असे. बादलीला बालटी, पिण्याच्या पाण्याचं म्हणे मडकं, कमी गोड म्हणजे निगोड—किती तरी विचित्र शब्दप्रयोग. किनई, बरका, मंजे, हिकडून, यांचीं तर कारंजींच. तिला चिडवतांना तो पुढें पुढें तिला गुदगुल्या करी. त्याला गुदगुल्या आठवल्या व अंगावर रोमांच उठले. बाजूच्या इमारतींची ओळ वितळून ढगांत गेली व रस्त्यावर हिरवळ उमटली. कॉलेजमागच्या मैदानांतून तो तिच्यासह चालला होता व हातांतल्या स्लाइडरूलनें तिला गुदगुल्या करीत होता. पिंपळाच्या पारावर बसत मेधा म्हणत होती, 'किती रे थट्टा करतोस?' अन् कृत्रिम कोपानें देखील तिचे डोळे पाणावत होते. एकदां हॉटेलच्या स्पेशल रूममध्यें...

पण वळण आलं व थबकावं लागलं. हॉटेल, पिंपळ, मैदान—सारं अदृश्य झालं. स्थूल, भरल्या अंगाची मेधा त्याच्याजवळ उभी होती. त्याला विचित्र वाटलं, विलक्षण

एकाकी वाटलं. प्राणापलीकडे प्रेम करणारी त्याची प्रेयसी त्याच्याजवळ होती. पण ती आतां असून नसल्यासारखीच झाली होती. काय अर्थ होता तिला भेटण्यांत ? ह्या दहा वर्षांत सारं जगच बदललं होतं. दहा वर्षांपूर्वी जीं स्वप्नं जोपासलीं, प्रीति-शब्दांची माळ जपली, तीं सारीं मोडून तोडून गेलीं होतीं. एकमेकांबद्दल अभंग निष्ठा ठेवून व कुठल्याहि संकटाला तोंड देण्याची तयारी करूनहि दैवानें त्यांची ताटातूट केली होती. दैवानें कसली, तिच्या महाकारस्थानी बापानें ! तो अहमदाबादेला नोकरीवर गेल्यावर त्या इसमानें तिच्या लग्नाची खोटी पत्रिका छापवून त्याला पाठवली. त्याला चकवलं व भंगलेल्या, भडकलेल्या मनःस्थितींत ठेवून कुणा मुलीशीं लग्नाला प्रवृत्त केलं. आणि मग स्वतःच्या मुलीचं धन कुणा सांगलीच्या सराफाच्याकडे गोटवून टाकलं.

त्यानें स्वतःला सांवरलं. दहा वर्षांचं दैन्य दूर करायलाच जणूं आज मेधा भेटली होती. तर मग ह्या थोड्या वेळांत कशाला कडवट विचार आणायचे ? तिचं कोपर धरून तो म्हणाला, “ कुठें जायचं ? उन्हं तर तापूं लागलीं. ये, आपण आइस्क्रीम खाऊं—”

“ खरंच, आपण पुण्याला खूप आइस्क्रीम खात असूं नाहीं ? लकींत, नि कावरेकडे, नि...”

रस्ता ओलांडून दोघंहि ‘ पारिसिअन ’मध्यें शिरलीं. मध्यरस्त्यावर वेगांतली मोटर टाळण्यासाठीं त्यानें तिचा दंड धरला. तीहि त्याला बिलगली व मग अंतरावरून चालूं लागली. अशीच ती बिलगे व बाजूला होई. त्याला सारं स्मरलं. छे, दहा वर्षं नुसतीं बोटं दुमडल्यासारखीं गेलीं. कांहीं बदल झाला नव्हता. तिचा स्पर्श तर त्याला तत्काळ ओळखूं आला होता.

वेटरनें आइस्क्रीम आणून ठेवलं. ग्रामोफोन रेकॉर्डचं कार्ड पुढें केलं व म्हटलं, “ आपली फर्माईश सांगा—”

मेधा म्हणाली, “ बाई ग—इथेंहि फर्माईश सतावते आहे—”

तिचं ‘ बाई ग ’ हें त्याला नवीन वाटलं. तिच्याकडे चमकून पाहात त्यानें कुठल्या तरी रेकॉर्डचे नांवावर बोट ठेवलं. जराशानें लता मंगेशकरचं गाणं सुरू झालं.

चमचा तोंडांतून काढीत मेधा मध्येंच म्हणाली, “ जिकडे तिकडे लताच्याच

रेकॉर्ड्स. माझी धाकटी मुलगी झोपतांना काय म्हणते ठाऊक आहे ?—आई, तूं नको गाणं म्हणूं. तूं नुसतं थोपट, अन् गाणं लाव लताचं, मला झोप येईपर्यंत—"

तो एकदम तोंड भरून हसला. पण मग हलकेच पुटपुटला, " तुझ्या मुलींना पाहायची मला फार इच्छा आहे. "

" तुला आवडायच्या नाहींत. छान आहेत; पण थेट त्यांच्या वळणावर गेल्या आहेत—"

" असेनात तुझ्या नवऱ्यासारख्या ! माझं त्याच्याशीं कांहीं वाकडं नाहीं. मीं तर त्याला पाहिलाहि नाहीं. कसा आहे ग ?"

" सुंदर आहेत. खरंच चांगले आहेत !"

त्याला काय बोलावं, सुचेना. मेधाचा पति चांगला आहे हें त्यानं इतर ठिकाणांहूनहि ऐकलं होतं.

तो एकदम म्हणाला, " —अन् मी ?"

" तूं गोड आहेस—"

" गोड ?"

" हो. गोड आहेस, माझा आहेस !"

त्याला विचारावंसं वाटलं कीं मग तो नाहीं का तुझा ? तो तर तुझा नवरा; आणि मी तर आतां परका. पण तो बोलला नाहीं. काल जें अश्रूंच्या ओघांत, हुंदक्यांच्या तालांत, तडफडत्या हृदयानें तिनं सांगितलं होतं त्याचाच ती आतां कोरड्या नेत्रांनीं, आइस्क्रीम खात पुनरुच्चार करीत होती.

लताच्या आवाजाची भिंगरी फिरत होती. उंच आणि आर्त स्वर. अवकाशांत, पूर्वायुष्यांत नेणारे सूर. असंच आइस्क्रीम खातां खातां एकदां तिचं हृदय वितळलं होतं. त्याच्या मनगटावर डोकं टेकीत ती म्हणाली होती, ' कंटाळलें ह्या चोरट्या, खोट्या भेटींना ! कधीं रे एकत्र राहायचं आपण ? कायमचं, कल्पांतापर्यंत ?...' त्याला मग कांहींतरी आठवलं व तो उद्‌गारला,

" आठवतं ?—कॉलेजच्या गॅदरिंगमध्यें तूं गायली होतीस—"

" अन् म्हणूनच तूं प्रथम खूप झालास !—कुठलं रे गाणं ?"

" कान्हा मुखसे ना बोले–बाजुबंद—"

" किती जुनं आहे नाहीं ?—आतां हसेल कुणी—"

" मला तर त्याचे स्वर अजून ऐकूं येतात. अन् मग मी—"

" माहीत आहे. नको काढूं त्या आठवणी. काल झाली सारी उजळणी. खूप बडबडलों नि खूप रडलों—"

दोघंहि गप्प झालीं. खाणं संपवून, बोलणं थांबवून शून्य बसून राहिलीं. पण ' पारिसिअन 'मध्यें ' कान्हा मुखसे ना बोले ' ह्या गाण्याची रेकॉर्ड वाजूं लागली. अँफीथिएटरमध्यें तंबोरा घेऊन बसलेली मेधा मराठे गाऊं लागली. टाळ्यांचा प्रचंड कडकडाट व हृदयाचें अखंड स्पंदन. श्रोतृसमुदायापुढें निर्भयपणें गाणारी आकृति टेकडीवरील एकांतांत प्रीतिवचनाच्या उच्चारांनीं मात्र मूक झाली. अश्रूंचे व आशेचे उन्हापावसाचे खेळ सुरू झाले. कांपऱ्या अक्षरांतल्या चिठ्या व चोरट्या एकांतांतल्या भेटी सुरू झाल्या. न संपणारी कहाणी, न थांबणारं गाणं सुरू झालं.

कधीं तरी बिल दिलं गेलं, कधीं तरी दोघं उठलीं व हॉटेलबाहेर पडलीं. एक-मेकांशीं न बोलतां, पण एकमेकांना जवळ करून चालत राहिलीं. वर सूर्य धगधगत होता, समोर समुद्र उसळत होता. नकळत दोघंही समुद्राच्या दिशेनं गेलीं. तिनं डोईवरून पदर घेतला, त्यानें गळ्याभोवतीं रुमाल टाकला.

" मेधा—"

" काय रे, अरू ! "

" तूं किती तरी दिवस मुंबई पाहिली नव्हतीस, समुद्र पाहिला नव्हतास. आठवतं ? पुण्यास आंबील ओढ्याच्या पाण्यांत पाय सोडून आपण बसत होतों. पाणी दिसलं कीं तुला पाय भिजवायची लहर यायची. एकदां पर्वतीमागच्या ओढ्याकांठीं आपण विसावलों होतों. मी समुद्राच्या नि कोकणच्या सफरींतल्या तुफानाचं वर्णन करीत होतों. संध्याकाळ पडली तरी—"

" हल्लीं पर्वतीकडे म्हणे बलात्कार होतात मुली गेल्या कीं. आपल्या वेळेला छान होतं, नाहीं ?" मेधा कॉंक्रीटच्या बांधावर बसत म्हणाली, " पण इथं कसे भिजवूं मी पाय ? किती दूर आहे पाणी; नि केवढे मोठाले दगड हे—" तिनें वाकून पाहिलं व समुद्राकडे पाठ फिरवली. तिचं बोजड बोलणं व वागणं त्याला कसंसंच वाटलं. पर्वती-मागच्या अनेक क्षणांच्या जतन केलेल्या स्मृती तिनें चिवडून टाकल्या. समुद्राला

सामोरें जातांना त्याला नेहमीं तिची आठवण येई. पण आज ती तिकडे पाठ फिरवून बसली. हीच का त्याची मेधा? ती, पूर्वीची...खालच्या खडकावरच्या खेकड्याच्या चालीकडे पाहतांच त्याला पुन्हा एक आठवण आली. तिच्याजवळ बसत तो म्हणाला,

"आणिक एक आठवतं?"

"नको ना—नको ना काढूं आठवणी! आतडं तुटतं रे. कांहीं उपयोग आहे का सारं उगाळून—"

"उपयोग?" तो कावला; पण तिला कवेंत घेत म्हणाला, "मग कशाला आलीस भेटायला? अन् काल कां भेटलीस अचानक?"

स्वतःला सोडवून घेत ती म्हणाली, "मला स्वप्न का पडलं होतं तूं भेटशील म्हणून? मैत्रिणीच्या लग्नाला म्हणून कधीं नाहीं ती मी आलें. अन् तूंहि अहमदाबादहून अचानक आलास. आलास अन् ह्या अफाट वस्तींत नेमका भेटलास—"

"पण मग काल भेटल्यावर कशाला मैत्रिणींच्या कळपांतून वेगळी झालीस नि माझ्यामागं एकटी आलीस? अन् आज तरी कशाला बोलावलंस मला?"

ती क्षणभर गप्प झाली. मोठा आवाज करीत दोन विमानं वेगानं गेलीं. ती संधि साधून तिनें घसा साफ केला. मग म्हणाली, "नको असं बोलूं! तुला पोट भरून पहावं, डोळे भरून पहावं, म्हणून काल तुला दूर नेलं. दहा वर्षांनीं भेटलास राजा, मग कसं राहवेल मला?—तुझा राग दूर करावा, समजूत घालावी, धीर द्यावा, डोळे पुसावे, थोपटावं—" मेधाचा कंठ दाटून आला. तिनं पदरानं डोळे टिपले व समुद्राकडे वळून पाहात ती पुढें म्हणाली, "म्हणून काल तुला बोलावलं. अन् आज—काल आपण उगाचच खोट्या आशा उराशीं धरल्या, नवीं स्वप्नं परत उभारलीं, जिवाला खूप क्लेश करून घेतले. ते दूर व्हावेत, समंजसपणें निरोप घ्यावा, म्हणून आज ही तुझ्या मागं धावत आलें—"

तो तोंड फिरवून रुक्षपणें म्हणाला, "म्हणजे माझी समजूत घालायला आलीस होय? आपली भेट निरर्थक आहे हें सांगायला आलीस होय?—तुला तुझ्या संसाराचं, पोरींचं नि नवऱ्याचं सुख पाहिलं पाहिजे. अन् मला माझ्या विधुरावस्थेंत वैराण दिवस काढायला हवेत हें तूं कशाला—"

"किती–किती रागावतोस रे—"

तिच्या डोळ्यांतून टप्टप् पाणी पडलेलं पाहून तोहि विरघळला. व्याकुळ होऊन म्हणाला,

"मग काय तर! मला कळतंय् कीं आपल्याला कुठलीच आशा नाहीं. भविष्यकाल नाहीं. म्हणूनच मागल्या आठवणी बोलायच्या—"

"बरोबर आहे—" ती खालीं मान घालून म्हणाली, "बोल ना. मी नाहीं रागवत—"

तो अंमळ तिचं अधोवदन पहात राहिला. ती म्लानमूर्ति पाहून क्लेशानं, वेदनेनं, प्रेमानं त्याचं हृदय पेटून गेलं. अगदीं सावकाशीनें तो नकळत उद्गारला,

"माझ्यावर तुझं खूप प्रेम आहे का ग?"

तिनं वर पाहिलं. मग हसत ती म्हणाली,

"ही कांहीं आठवण नाहीं. जुन्यांत जमा झालेली गोष्ट नाहीं—"

तो हसला नि मग एकदम फुलून निघाला. जवळ सरकून म्हणाला,

"खरंच सांग ना! माझ्यावर खूप प्रेम करतेस तूं मेधा?"

"खूप प्रेम करतें अरू, खूप प्रेम करतें रे—"

किंचित् काल कुणीच कांहीं बोललं नाहीं. मेधाला वाटलं, कशाला सारं बोलायचं! पण मग ती आवेशानं उभी राहिली. समुद्राकडे पाहात म्हणाली,

"दहा वर्षांपूर्वी ओढ्याच्या कांठीं जे शब्द उच्चारले ते पुन्हा ह्या समुद्रासमोर म्हणूं काय? केवळ शब्दच हवेत?—कीं तूं दुरावलास हें समजूनहि तुझी पूजा बांधीत बसलें तीहि दाखवूं? प्रथमपासून तुझ्याबद्दल जी प्रीतीची दिव्य भावना आहे तीच अजूनहि अस्पर्श आहे रे. इतकीं संकटं आलीं, संसार उभारला—पण तुझ्यावरचं प्रेम—कसं सांगूं—"

तिचा स्वर कांपरा झाला. पण तिनें अश्रू आवरून धरले व क्रुद्धपणें क्षितिजाकडे पाहिलें. जणूं तिच्या प्रीतीचा ठेवा हिरावून न्यायला कुणी येत होतं. एखाद्या वाघिणीसारखी ती जागरूक होती. एखाद्या देवतेसारखी वाटत होती.

त्याला वाटलं, तिला आलिंगन द्यावं, आधार द्यावा. पण तोहि नकळत उभा राहिला. हातांत हात अडकवून दोघंहि शांत होतीं. मग तो म्हणाला, "चल इथून! उन्हानं अंग तापलीं आपलीं—"

ती मूढपणें त्याच्या मागोमाग गेली. तोहि भारावून पुढं पुढं चालत होता. त्याला वाटलं, असंच 'नरीमन पॉइंट' वरून पुढं जावं. समुद्र तुडवून, क्षितिज ओलांडून मेधासह अदृश्य व्हावं. तिच्या अलोट प्रेमाच्या साक्षात्कारानं तो वेडापिसा झाला होता. संशय, निराशा, द्वेष, असूया, अगतिकता—ह्यावर दहा वर्षं दवडतां आलीं. पण आतां ! संतापाच्या भरांत त्यानें लग्न केलं तरी मेधा बिथरली नाहीं, संसारांत गुरफटून देखील ती त्याला विसरली नाहीं. मग आतां पुढचं सोपं आहे ! दहा वर्षं गेलींच नाहींत असं समजावं. जें अर्धवट, अपुरं, अज्ञात राहिलं आहे तें सारं साकार, संपूर्ण करावं. तो थबकला. खिशांतली चपटी चावी चाचपूं लागला. पुढच्या वळणावर तर 'सागर हॉटेल' होतं. पांचव्या मजल्यावरची शांत, प्रशस्त, सुसज्ज खोली ! एकटी, दोघांसाठीं !

"कुठें निघालों आतां आपण—"

तो थबकला. तिच्याकडे न पाहतां म्हणाला,

"रस्त्यावर कुठं हिंडायचं? अजून दोन एक तास तुला वेळ आहे ना? पलीकडच्या हॉटेलांत जाऊं. मीं खोली घेतली आहे तिथं—"

"खोली ?" मेधा माघार घेत म्हणाली. तिच्या स्वरांतला, दृष्टींतला भाव पाहून तो चरकला. त्याला स्वतःची शरम वाटली. मेधा आपल्याला मिळणार नाहीं ह्या जाणिवेनं त्याची चुळबुळहि झाली. ती कांहीं बोलायच्या आंत त्यानं विचारलं,

"कां, भीति वाटली माझी ? चल ना—"

"भीति ?" ती शुष्क हसून म्हणाली, "तुझ्याबद्दल नेहमीं विश्वासच बाळगीत आलें. तुला का भिऊं ?" मग एकदम मोठ्यानें हसून ती म्हणाली, "ओहो—ही काय समोरची इमारत ! तळमजला तयार आहे. सावली आहे नि एकांतहि आहे—"

रस्ता ओलांडून ती वाळूचा ढीग तुडवीत अर्धवट बांधलेल्या इमारतीकडे गेली. दोन्ही बाजूंना दगडाविटांचे तुकडे पडले होते. पांच सहा प्रशस्त खोल्या उभारून झाल्या होत्या. जिना तयार होत होता. कॉंक्रीटच्या पायऱ्यांवर पोतीं पसरलीं होतीं. दोन पायऱ्या चढून ती एका पायरीवर रुमाल पसरून बसली. दुसऱ्या किनाऱ्यावर तो उभा होता त्याला अल्लडपणें साथ देऊं लागली.

खोटा अल्लडपणा. केवळ ढोंग. तिनं चतुराईनं खोलींत येण्याचं टाळलं हें त्यानं ओळखलं. तिनं तोल सावरला होता, शहाणपण दाखवलं होतं. अन् त्यानं रागावूं नये म्हणून वर अल्लडपणाचं नाटक केलं होतं. हीच मेधा म्हणत असे, "कशाला उघड्यावर बसायचं? कुठें तरी जाऊं या. दूर, एकांतांत—" हीच मेधा त्याला तिच्या खेड्यांत बोलवीत असे—तिथं वृद्ध आजीला टाळून त्यांना साऱ्या खोल्या मजा करायला मिळाल्या असत्या म्हणून. आपल्या प्रेमाला पूर्णत्व यावं, आपल्या प्रियकराशीं एकरूप व्हावं म्हणून ही अज्ञ, अजाण, अल्लड पोर वारंवार वेडीपिशी होत असे. पण तेव्हां संधि मिळाली नाहीं, नकळत तोल राखला गेला. आणि आज सारं हातांत असून, हाकेवर असून...तो आवेगानें तिच्याकडे गेला. जवळ जातांच मात्र योजून ठेवलेलं बोलूं शकला नाहीं.

ती म्हणाली, "रागावलास?"

तो मानेनं नाहीं म्हणाला व तिच्याजवळच पायरीवर बसला.

"फार त्रास होतो का रे वहिनी नाहींत म्हणून?—कशा होत्या त्या? सुंदर, सशक्त, प्रेमळ?—"

क्षणार्धांत त्याच्या मनांतले वाकडे विचार विरून गेले. कॉंक्रीटमधून बाहेर डोकावणाऱ्या सळयांकडे पहात तो म्हणाला, "गेली ती! माझ्या आयुष्यांत आली काय, दीडएक वर्ष संसार करून गेली काय, साराच चमत्कार वाटतो. आमचं कधींच रहस्य जमलं नाहीं. तुझ्या रागावर मीं तिचे खूप लाड केले—पण तिच्याबरोबर मी रमूं शकलों नाहीं....माझी ही अवस्था, तर तुझं काय होत असेल—"

त्यानं तिच्याकडे पाहिलं. तिच्या डोळ्यांत दाटून आलेलं दुःख पाहिलं. तिचे अश्रू ओघळूं लागले, आणि तरीहि ती बोलतच राहिली, "प्रथम फार त्रास होई. तूं मिळण्याची अंधुक आशा असती तरी मी तशी राहिलें असतें. पण मग तसं राहण्यांत अर्थ नव्हता. ज्या बापानं माझं प्रेम तुडवलं, त्याच्या घरीं तुकडा मोडत राहणं अशक्य होतं. तुझ्यावर, त्यांच्यावर संतापूनच मीं लग्नाच्या आगींत उडी घेतली. संसार सुरू केल्यावर एकदाहि माहेरीं गेलें नाहीं. भय वाटे, कीं तूं भेटशील. अन् त्या जन्मदात्याचं दर्शनहि मला नको होतं. त्यांच्या मरणाचे क्षणींदेखील मी जवळ गेलें नाहीं.—त्यांचा द्वेष केला. पण मग हळुहळू कळलं कीं

तुझा द्वेष करणं कठीण आहे. वंचना होऊन, प्रतारणा होऊनहि तुझ्यावरचं प्रेम क्षणभरहि कमी होईना!—मग मी घाबरलें. चुलीजवळ, देवघरांत, घास घेतांना नि अंथरुणं घालतांना तुझीच आठवण येत राही—"

"तुझ्या नवऱ्याला ठाऊक नाहीं हें?"

"त्यांना माझ्या प्रेमाबद्दल मींच थोडं सांगितलं. ते रागावले, रुष्ट झाले, पण अधिक भानगडींत पडले नाहींत. त्यांचं म्हणणं कीं शिकलेल्या पोरी लग्नाआधीं किरकोळ प्रेमं करतातच. पण तें सारं भावलाभावलीचं, भेकड असतं. लग्न झालं कीं सारं विसरतात, संसारांत एकरूप होतात. असेल तसं! पण मी मात्र विसरूं शकलें नाहीं. शरिरानं तिथं राहिलें, पण मन मात्र तुझ्याभोंवतीं भिरभिरत राहिलं—"

"मेधा—मेधा—" भावनाविवश होऊन तो तिच्या थरथरत्या शरिराकडे पाहात राहिला. तिच्या अलौकिक प्रेमाच्या साक्षात्कारानें तो शहारून गेला. इतकें भव्य, दिव्य प्रेम असतांना त्यानं कशाला जगाचे बंध सांभाळायचे? आणि हे अमोल, कदाचित् एकदाच आलेले क्षण कां नाहीं लुटायचे? त्यानं तिच्याकडे टक लावून पाहिलं. वाऱ्यावादळाशीं झगडणारं तिचं शरीर कांतिहीन होत असलं, तरी तेंच होतं. तेच तिचे कपोल, कानामागच्या कुरळ्या बटा, गालाची खळी व हनुवटीची चोंच. तेच तिचे बाहू नि तिचा गळा. तें शरीर अर्पण करायला ती अनेकवार उत्सुकहि झालेली होती. प्रीतीच्या पूजेंतला तोहि एक आवश्यक अन् अपूर्व सोहळा तिला वाटलेला होता. खेड्यांतल्या व उफाड्याच्या त्या नवोढेनें त्यांत संकोच बाळगला नव्हता. उलट शहरी वातावरणानं तोच दबकलेला होता. परिणामाची तमा बाळगीत होता. अखेरपर्यंत टाळीत आला होता.

पण आज—! त्याचं अंग थरथरलं, तापलं. आतां दूरत्व अगदीं सहन होईना. आतां अलगपणांत अर्थहि नव्हता. तिचा हात धरून तो म्हणाला, "ऊठ मेधा. हॉटेलांत जाऊं!—लाजूं नको, भिऊं नको. अगदीं शांत, छान खोली आहे—"

'सागर हॉटेल' मधली ती कडेची, नऊ नंबरची खोली त्याच्या नजरेसमोर तरळूं लागली. खिडकीबाहेर समुद्र व खिडकीला गडद पडदा. छताला पंखा व पंख्याखालीं प्रशस्त मऊ पलंग. कोंपऱ्यांत आरशाचं मोठं कपाट व भिंतीवर बसवलेली रेम्ब्रॉंची कलाकृति. नुसतं खोलीचं दार लावलं कीं...त्यानें चावी खिशाबाहेर काढली व म्हटलं, "चल! फार सहन केलं आपण! इतकं प्रेम करीत

असूनहि दूरावलों. एकत्र झालों नाहीं, एकजीव झालों नाहीं—"

तो उठणार होता; पण ती दगडासारखी बसून राहिलेली पाहून तो थांबला. तिची दृष्टि दूर गेली होती, मुद्रा उजळली होती अन् शरीर शिळेसारखं झालं होतं. जणूं पुतळाच पुटपुटला, " कुठं नेतोस मला ? न्यायचं तें नेलंस कीं, माझं हृदयच नेलंस— "

त्यानं मनाशीं चुकचुक केलं. शब्दाच्या उधळपट्टीला तो विटूं लागला होता व वेळ वायां जात होता म्हणून व्याकुळ झाला होता. अधीरतेनं तिचे दोन्ही खांदे धरून तो म्हणाला,

" हो—म्हणूनच तुलाहि न्यायचा अधिकार आहे मला. कां म्हणून तसं राहायचं आपण ? आपण एकमेकांना हवीं आहोंत तर—"

" आपण एकमेकांचीं सदाचींच आहोंत. पण मनानं. हृदयदानाच्या विषयांतच फक्त. शरिरानं आपण जवळ कसं यायचं ?—निदान ह्या आयुष्यांत तरी अशक्य—"

" एकत्र जगणं, राहणं अशक्य असेल; पण—"

" आपण आतां एकांत करूं शकत नाहीं—" तिचे कडवे शब्द ऐकतांच त्यानं तिचे खांदे सोडून दिले. पण त्याचे हात हातांत घेऊन ती पुढं म्हणाली, " ऐक माझं ! मीं संसार थाटला आहे. आवडो न आवडो, माझा मांडलेला खेळ मला निष्ठेनं सांभाळायला हवा. माझे पंचप्राण तुझ्यापाशीं गुंतले आहेत; पण माझ्या नवऱ्याचा हक्क—"

त्यासरशीं त्यानें तिचे हात हिसडले. तुसडेपणानें म्हटलें, " मग हें प्रेमाचं प्रदर्शन कशाला ? हा शोक नि ही भेट—"

" ही भेट एकमेकांच्या हृदयाला धीर द्यायला. एकमेकांच्या शरिरानं आपापल्या चाकोरींत चालावं म्हणून. म्हणून हा शोक नि हें प्रदर्शन. माझं आयुष्य नवऱ्याच्या आधीन असलं तरी माझं हृदय तुला आधींच दिलं आहे. तें मी कसं काढून घेऊं ? ब्रह्मदेवालाहि तें शक्य नाहीं !—मात्र जन्मदात्यानं माझं शरीर तुझ्यापर्यंत पोंचूं दिलं नाहीं. आतां त्या शरिराला तूं हात लावूं नको, हक्क सांगूं नको !—अरू, ह्या संसारांत शरिराला फार महत्त्व असतं रे. हृदयाचा फारसा प्रश्न येत नाहीं. तें मारून टाकावं लागतं. मनाला पोचे येतात, कधीं कधीं तर मन गुंडाळूनच ठेवावं

लागतं. खस्ता खाव्या लागतात, झिजावं लागतं. प्रथम प्रथम मला विलक्षण जड जाई. जमत नसे, जीव नको होई. पण हळुहळू माझ्या मनाची नि शरिराची व्यवस्थित विभागणी झाली. तुझ्या चिंतनांत मन गुंगलेलं राही. अन् इकडे अन्न रांधतांना नि अंथरुण घालतांना संसाराला स्वरूप येई. माझं सासर नि माझा नवरा समाधानी होत...अन् मग माझीं मुलं. माझ्या संसाराचीं फळं. तीं तर माझ्या शरिरांतून आलेलीं, माझ्या अंगावर पोसलेलीं. त्यांची बायको म्हणून, मुलांची माता म्हणून माझीं कर्तव्यं कशी विसरूं? माझ्या शरिराचं महत्त्व कसं विसरूं?—त्यांना कळणार नाहीं हें सोड, पण आपली आई व्यभिचारी आहे हें मुलींना आवडेल काय? सांग—"

बोलतां बोलतां मेधा उठली व जिन्याच्या अर्ध्याकच्च्या कटड्याला रेलून उभी राहिली. तो भारावून, मान उंचावून तिच्याकडे पाहात राहिला. तिच्या प्रीतीच्या दीप्तीनं तो प्रथम चकित झाला; आणि आतां तें सतीचं तेज पाहून थक्क झाला. एकाच वेळीं ती दुर्दम्य प्रेमासाठीं प्राण पाखडीत होती व सामान्य नीतीपुढें नम्रहि होत होती. त्याला वाटलं, ती फार उंचावर आहे. आपण फार खालीं आहोंत, खुजे आहोंत. हळुहळू त्याला तिच्या व्यस्त वागण्यांतलं श्रेष्ठत्व समजलं. पटलं. जें पूर्वीं घेणं अविचाराचं होतं, तें आज मागणं तितकंच अधर्माचं होतं. हॉटेलची चावी खिशांत सोडीत तो म्हणाला,

"खरंच मेधा, मला तूं दिलं आहेस तेंच अधिक मोलाचं आहे...तुला वाटलं असेल ना, मी लंपट आहें—"

"नाहीं. तुझं, पुरुषांचं वागणं मी समजूं शकतें. त्यांतून तुझा संसार असा उद्ध्वस्त झालेला! तुझं बरोबर आहे. पण मी—मी तुझ्यासारखी मोकळी असतें तर कदाचित् आलें असतें तुझ्याकडे. कदाचित् नाहींहि; माझ्या मुलींवर तें अवलंबून राहिलं असतं—"

दोघं गप्प झालीं. ती उभीच होती व तो बसलेला होता. उन्हं उतरलीं होतीं व समुद्रावरून वेगाचा वारा सुटला होता. न बोलतांच त्यानं तिला रुमाल दिला. तिनें डोळे अगदीं कोरडे केले. मग पर्समधल्या आरशांत पाहून कुंकू व केस सारखे केले. पर्समधला वेलदोडा सोलला. त्याला दिला, थोडा आपण खाल्ला. बांधकामावरचा पठाण पलीकडे खाट मांडून गुडगुडी ओढूं लागला तिकडे दोघं

बघूं लागलीं. दूरवर, समुद्रांत शिडाचा सफेत ठिपका दिसत होता तो एकमेकांना दाखवूं लागलीं.

"जायचं ?—" ती एकदम म्हणाली. तो दचकला. वेळ संपली, भेट संपली, म्हणून त्याचा चेहरा उतरला. ती रखरखीत दुपार अन् भोंवतालची अर्धवट उभारलेली इमारत त्याला भेडसावूं लागली. कसाबसा तो म्हणाला, "जाऊं या—"

दोघं निघालीं.

"मी उद्यां सांगलीला जाणार—"

"पुन्हा कधीं भेटायचं नाहीं ?"

"असं नाहीं. पण भेटायची मुद्दाम खटपट करायची नाहीं."

"मजेंत राहशील ना तूं ?"

"हो. तूंहि राहशील अशी माझी खात्री आहे. माझी शपथ आहे—"

'पारिसिअन' पाशीं दोघंजणं आलीं. तो म्हणाला, "थांब. चॉकोलेट देतों. चॉकोलेटशिवाय तुझं चालत नाहीं हें ठाऊक आहे मला !"

त्यानं पटकन् चॉकोलेटचं पाकीट खरीदलं. हात मागं घेत ती हसली. म्हणाली, "हो, पण असं मी घेत नसें."

त्याला परत भरून आलं. चिमणीच्या दांतांनीं तुकडा मोडून त्यानं अर्धा तिला नजर केला. हात पाठीशीं बांधून तिनें त्या भेटीचा स्वीकार केला. दोघंहि हसलीं. मोकळेपणानं हसलीं. हसतच चालूं लागलीं.

चर्चगेटच्या चौकोनांत त्यानें मेधाचा निरोप घेतला. हसऱ्या चेहऱ्यावर पाण्यानें भरलेले चार डोळे एकमेकांना चुकवूं लागले. टपोऱ्या आसवांतून इंद्रधनुष्यें उमटत राहिलीं. प्रीतीचं अमाप वैभव उधळणारी मेधा हृदयाचा हंस मागें ठेवून गृहिणीच्या लगबगीनें इंद्रधनुष्यावरून अंतर्धान पावली. दिसत असून नाहींशी झाली. तो पाहातच होता. आणि त्याचं शांत शरीर व उजळलेलं मन अनोळखी माणसांच्या गर्दीत गुदमरून जात होतं.

* * *

# गिलावा

३

मुंबई-पुण्याच्या मोटरमार्गाला मिळणाऱ्या फाट्याकडून बैलगाडी थबकत थबकत आली व मुख्य रस्त्याच्या कडेला खडी झाली. आजूबाजूच्या पांच पंचवीस खेड्यांतले उतारू त्या सांध्यावर मुंबई-पुण्याची बस पकडीत. एक अगदीं छोटंसं चहाचं दुकान, फळं विकणारे चारपांच मावळे, एखाददुसरी थांबलेली सोडलेली बैलगाडी त्या सांध्याला स्टेशनाचं स्वरूप आणीत होती. कोर्टाच्या कामाला, व्यापाराच्या सौद्याला, घरगुती कार्याला शहरांत जाणारे कोकणचे लोक भातखांचरांचे बांध तुडवीत अगर शेतांत पडलेल्या कंगोऱ्यांतून गाडी हाणीत इथें येत. जेमतेम थांबणाऱ्या बसमध्यें गर्दी करीत.

बैलगाडी थांबायच्या आधींच बंडू उडी मारून उतरला व लाडवाचा डबा काढूं लागला. गाडी थांबल्यावर दाजीसाहेब धोतर सांवरीत उतरले. मास्तर मागोमाग उपरणं सांवरीत बाहेर आले. आणि मग दोघे मिळून " हं, उतरा जांवईबोवा— जपून " अशी जपणूक दाखवीत वासूला खालीं घेऊं लागले. चहाच्या दुकानाशीं उभे असलेले शास्त्रीबुवा शेजाऱ्याजवळ पुटपुटले, " दाजी परांजप्याचा जांवई हा. काल झालं ना लग्न—" गुणाजी चहावाला सांध्यावर उतरून आंत गांवढ्याकडे गेलेल्या वऱ्हाडांतला नवरदेव पहायला दुकानाबाहेर आला.

वासू खालीं उतरला व हातांतली नवी घडीची टोपी डोईवर ठेवूं लागला. बैलगाडीच्या प्रवासानें त्याचं हाड न् हाड रगडून गेलं होतं. आणि कोरं धोतर व रेशीमरंगी कोट मळून गेला होता. तीन चार तासांपूर्वी झालेलं जिलबीचं जेवण, काल रात्रीं गप्पांमुळं झालेलं जागरण, अन् आदल्या सबंध दिवसाचा विवाह-

सोहळ्याचा शीण ह्यानें तो कंटाळला होता. केव्हां एकदां पुण्यास पोंचून आपल्या खोलीवर जाऊन शांतपणं पडतां असं त्याला झालं होतं—अन् खोलीची आठवण येतांच तो अधिकच थकून जात होता !

लाडवाचा डबा; लहानशी वळकटी, मित्राची मागून आणलेली मोठी ट्रंक व सासुरवाडी सोडतांना मिळालेला नारळ चहाच्या दुकानापुढें येऊन पडला. सासऱ्याच्या आणि मास्तरांच्या मागोमाग वासू सामानाशीं उभा राहिला. मुंबईहून येणाऱ्या बसची वाट पाहूं लागला. बैलगाडींतून येतांना सारी वाट प्रश्नोत्तरें झालेलीं असल्यानें बोलायचीहि इच्छा उरली नव्हती. ‘उद्यां कामावर जाणार ना ?—रजा वाढविली असतीत तर बरं झालं असतं. आतां दिवाळीला यायला हवं—पोंचल्याचं पत्र पाठवा, द्वारका वाट बघेल—दोन खोल्यांची जागा आहे म्हणतां ? नेमकं कुठं आलं हो घर ?—’ सगळे अगत्याचे, खुशालीचे प्रश्न. आणि जागेचं, बिऱ्हाडाचं पालुपद. ‘कुठं आहे बिऱ्हाड ? कशीं आहे जागा ? द्वारकीला सोबत आहे ना ?’ तें पालुपद घुमलं कीं वासूला वाटे, अशीच धावत्या मोटरींत उडी घ्यावी व नाहींसं व्हावं...

“काय नुसता नारळच का जांवयाबरोबर ?” शास्त्रीबोवा दांत विचकत नाकांत बोलले, “द्वारका राहणार आहे वाटतं ?”

दाजीसाहेब धोतर सांवरीत सरसावले, “हो. तिची वडगांवची आतेसासू दोन दिवस इकडेच राहिली आहे. गणपतीचं दर्शन केल्यावर पुढल्या रविवारीं त्या काशीयात्रेला जातील नि द्वारकेची पुण्याला पाठवणी होईल. जांवयांना जास्त रजा नाहीं मिळाली. बिस्किटाच्या कारखान्यांत असतात पुण्याला—अकौंटंट !” दाजीसाहेबांनीं अभिमानानं वासूकडे पाहिलं. तोच अभिमान बंडूच्या मुद्रेवर तरळला. अन् दूर उभ्या असलेल्या अर्जुना गाडीवाल्याच्या चेहऱ्यावर.

त्या क्षणीं वासूच्या डोळ्यांपुढें गेले दोन दिवस झालेलं कौतुक उभं राहिलं. वडगांवहून आतेला व तिच्या मुलामुलींना घेऊन तो ह्याच सांध्यावर उतरला तेव्हां सामोरे आलेले सासरे, बैलगाडी गांवांत शिरतांना पावलोपावलीं पाहायला उभे असलेले गांवकरी, आपण होऊन ओळख करून घेणारीं घरचीं माणसं. चहाचा आग्रह, फराळाचा आग्रह, पक्वान्नांचा आग्रह. पुण्याची बातमी विचारणारे

आणि आडून न पाहणारी पण पाहतांच लाजणारी, जेवायला जवळ बसणारी पण आग्रह न करणारी, आयुष्य वाहणारी पण ओळख न दाखविणारी द्वारका! शालीन चेहऱ्याची, भाबड्या डोळ्यांची त्याची पत्नी. वासूला विवाहविधीच्या वेळीं वावरणाऱ्या द्वारकेचीं विविध रूपें आठवलीं. मग निरोपसमयींची उंबरठ्याआड उभी असलेली तिची आर्जवी, आतुर आकृति तरळत राहिली. त्याला वाटलं, सारीं शेतं तुडवीत माघारीं जाऊन...

"येईलच गाडी आत्तां." त्याच्या अस्वस्थ हालचालींकडे पाहून मास्तर म्हणाले. वासूच्या वृत्ती जाग्यावर आल्या. मास्तर परत कांहीं म्हणाले. मग सासरे-बुवाही कांहीं बोलले. वासू नुसता 'हुं' करीत होता. रस्त्यावरून वेगानें पळणारी एखादुसरी खाजगी मोटर पाहात होता. अखेर दाजीसाहेब म्हणाले, "गाडी आलेली दिसतेय्. हो वाटतं! जागेची काळजी करूं नका—अन् पुढल्या रविवारीं सात वाजेपर्यंत स्टँडवर या. बंडूला देतोंच आहें द्वारकीबरोबर. पण घर सांपडायला हवं ना—"

सासऱ्याचे शब्द कानांत आदळले. आणि लगेच मोटरचा धडधडाट जोराजोरानं येऊं लागला. वासूला एकदां वाटलं, कीं दाजीसाहेबांना सगळी अडचण मोकळेपणीं सांगावी. द्वारकेला सध्या धाडूं नका म्हणून म्हणावं. पण तो बोलला नाहीं. अपराधी मुद्रेनं थांबणाऱ्या बसकडे गेला. रिकाम्या सीटवर बसून धापा टाकणाऱ्या इंजिनासह उसासे टाकूं लागला. दाजीसाहेब खिडकीशीं येऊन म्हणत होते, "जागा छानच मिळाली. पोंचल्याचं पत्र टाका. रविवारीं द्वारकीला धाडतों." मास्तर पुन्हा पुन्हा नमस्कार करीत होते. बंडू टक लावून आदरानं पाहात होता. आजूबाजूचं मोकळं वातावरण, डोंगर, शेतं व त्यामागची सासुरवाडी—सारीं नवरदेवाला निरोप देत होतीं. वासूचे डोळे ओलावले. गाडी धावूं लागतांच कुठं उकिरड्यांत फेकल्यासारखं वाटलं त्याला.

साऱ्या प्रवासभर तो असाच सुन्नसा बसला होता. द्वारकेची निष्पाप नजर आठवीत, लग्नांतल्या गोड गोंधळाची उजळणी करीत. तें वातावरण, ती वास्तु आतां मागं गेलीं होतीं. मैलचे मैल मागं टाकीत बस वेगानं पुण्याकडे धावत होती. पुण्याच्या आठवणीनं वासू अधिकाधिक उदास होत होता. पुण्याचे रस्ते दिसत, वस्ती दिसे...मग रविवार स्मरे, संसाराचं स्वरूप डोळ्यांपुढं येई...

पुण्यास पोंचेपर्यंत तो पुरा उन्मळून गेला. जिभेवरची जिलबीची चव ओसरली, द्वारकेच्या गृहप्रवेशानं डोकं दुखूं लागलं.

" काय साहेब, सामान काढूं ?—कुठं जायचं ? " स्टँडवर गाडी थांबतांच हमालांनीं, टांगेवाल्यांनीं गराडा घातला. हमालाच्या हातून त्यानें रागानं लाडवाचा डबा सोडवून घेतला. टांगेवाला सलगीनं म्हणाला, " सदाशिव पेठेंत सोडायचं ना ? " तेव्हां तर तो कावून गेला. दोन्ही हातांत तिन्ही डाग धरीत पायीं निघाला. बसमधले इतर उतारू स्टेशनावर, बुधवारा-शनिवारांत, हॉटेला-खानावळींत चालले होते. व्यापारी, यात्रेकरू, लेकुरवाळ्या, विद्यार्थी. आणि हा नवरदेव निघाला होता...

वासूला वाटलं, आपण सासुरवाडीला असतों तर कदाचित् आतां वरातीची तयारी झाली असती. पुण्यांत लग्न झालं असतं तर मोठ्या थाटांत मिरवणूक निघाली असती. तो एकदम दचकला. वरात मिरवत कुठून गेली असती ? कुठें गेली असती ?...

तो आपल्या बिऱ्हाडाशीं पोंचला तेव्हां संध्याकाळचे सात वाजून गेले होते. अंधार पसरला होता व दिवे पेटले होते. रस्त्यावर गर्दी वाढली होती, व खिडक्यांतून चेहरे चमकत होते. बिऱ्हाडाच्या दोन्ही बाजूंना बाजार सुरू झाला होता. समोरचा रस्ता व आजूबाजूचे बोळ गजबजून गेले होते. रेंगाळत जाणारे लोक टक लावून खिडक्यांकडे बोटं दाखवीत होते. खिडक्यांतल्या बाया रेंगाळणाऱ्या गिऱ्हाइकांना खुणवीत होत्या. हॉटेलांतले फोनो-रेडिओ गर्जत होते. चहावाल्यांची, पानवाल्यांची लगबग चालू होती. विचित्र आवाजांनीं व विशिष्ट वासांनीं सारी वस्ती व्यापून गेली होती.

वेश्यावस्तींत पानवाल्याच्या दुकानाजवळ असलेल्या गवळ्याच्या वाड्यांत वासूचं बिऱ्हाड होतं. वेश्यांनीं न अडवलेला तेवढाच एक वाडा त्या मोहल्ल्यांत उरला होता. तळमजल्यावर म्हशीचा गोठा, कडब्याचा सांठा. अन् वरच्या मजल्यावर एका खोलीचीं, दोन खोल्यांचीं दहाबारा बिऱ्हाडं. पोस्टमनचं, शिंप्याचं, आचाऱ्याचं, कारकुनाचं, सुताराचं. तेथेंच वासूला जागा मिळाली होती.

दिंडीदरवाज्यांतून आंत शिरल्यावर वासूनं वळून रस्त्याकडे पाहिलं. समोरच्या कुंटणखान्याच्या पिंजऱ्यापाशीं पांचसहा वेश्या गिऱ्हाइकांशीं सौदा करीत होत्या. हातवारे करीत, हसत खिदळत, पचापच थुंकत. बाजूची एक बाई रस्त्यावर उभी

ड्न वरच्या मजल्यावरच्या वेश्येशीं शिवीगाळ करीत होती. पिंजऱ्यांतली एकजण श्गावर बसली होती. पदर फेकून दिला होता व आरसा पुढ्यांत घेऊन तेलानं ।पडलेले केस उलटे फिरवीत होती. तिथलीच कुणी न दिसणारी स्त्री सिनेमांतलं णं आळवून आठवून म्हणत होती.

वर्षभर त्या वस्तींत राहून वासूनं मनाचा दगड केला होता, बुबुळं बधिर केलीं नीं. रात्रीं झोपायला आढं असावं, सुट्टीची दुपार एकटेपणीं दवडायला जागा सावी म्हणून नाइलाजानं इथं खोली घेतली होती. प्रथम विचित्र वाटलं. किळस, स्ती, चीड. पण इलाज नव्हता कसलाच ! अंधार पडायच्या आंत आणि पूर्ण जाडेपर्यंत खोलींत कोंडून वेळ काढणं भाग होतं. म्हणजे कसलाच संपर्क येत नसे. ा आतां तो परत दचकला. भोंवतालचं वातावरण पाहतांच त्याला वेड्यागत झालं. तांत लग्नाचे लाडू, अंगावर वराचा पोशाख. कालच्या विवाहाच्या वेदीवरून ालेला गृहस्थाश्रमी वासू आतां रात्र पडल्यावर वेश्यावस्तींत उभा ! वासूला घाम टला. अन्—अन् येत्या रविवारीं इथंच, अशीच येणारी ती निष्पाप नेत्रांची, ळबोध वळणाची, मंगळसूत्र ल्यायलेली...

त्याला द्वारकेची मूर्ति टळकपणं दिसूं लागली. शेला घेतलेली, मुंडावळ्या तलेली...वरातीचीं वाद्यें वाजूं लागलीं. बॅंडवरचं सिनेमांतलं गाणं, मिरवणुकींत तर्फा चाललेल्या गॅसच्या बत्त्यांचा उजेड, मोटरमागून चालणारा सुवासिनींचा ळप...वासूनें दचकून पाहिलं ! पिंजऱ्यांतल्या वेश्यांचे थवे, खिडक्यांतल्या ्यांचे उजेड, रेडिओवरच्या रेकॉर्डचा आरडा...तो हातांतलं सामान सांवरीत साबसा आंत पळाला. जिना चढून बिऱ्हाडाशीं पोंचला. कुलूप काढून आंत ला व घाईनं त्यानें दार बंद केलं. वरात नाहींशी झाली. वरात पाहायला मलेल्या वेश्या दूर गेल्या. त्यांच्या मेळाव्यांत मिसळणारी द्वारका अदृश्य झाली. ारं शांत झालं.

कपडे काढून शांतपणें अंथरुणावर आडवं झाल्यावर जरा बरं वाटलं. मोकळं ाटलं. अंमळशा ग्लानीनंतर तो उठून बसला. हलकेच त्याला द्वारकेची आठवण ाली. होमाजवळ हाताला हात लावला तें आठवलं. घास घेतांना ओठांत बोटं चिकटलीं स्मरलं. पुन्हा पुन्हा प्रत्येक स्पर्श जाणवला. अन् मग तिची आवेगानं उणीव ासली. जवळची उशी त्यानें कुशींत घेतली व धुंदपणें तो पडून राहिला. पण

तेवढ्यांत रस्त्यावरून कुणा कुंटिणीनं कर्कश आरोळी ठोकली. वासू शहारला, निपचित पडून राहिला. छे, कुणीच किंकाळलं नव्हतं. त्यालाच भास झाला ! अन् हें लक्षांत येतांच तो अधिकच शरमला. असं सारखं झालं तर कसं होणार ? रात्र कशी रंगणार नि संसार कसा सजणार ? रविवारीं तर द्वारका येणार—पण तिला इथं आणायचंच मुळीं कसं ? काय वाटेल तिला ह्या वस्तींत येतांना ? घाबरेल, हाय खाईल ? लग्नविधीचा, नवऱ्याचा द्वेष करील ?—आणि बाहेर बाजार चालू असतांना तिच्याशीं एकांत कसा करायचा ?—वासू विद्ध झाला. उशी फेकून देऊन फेऱ्या घालूं लागला. पुन्हा दमून निराशेनें गादीवर पसरला. त्याच्या ताणलेल्या शिणलेल्या मनाला आतां अनेक भास होऊं लागले...तो द्वारकेला घेऊन गृहप्रवेश करीत होता; अन् दारांतला पानवाला कुणा गिऱ्हाइकाला सांगत होता, 'समोरच्या कुंटणीकडे नवा माल आला आहे—' तो धडधडणाऱ्या हृदयानं पत्नीला आलिंगन देत होता; समोरच्या पिंजऱ्यापाशीं चार सहा आण्यांनीं भावांत चढउतार होत होता...घरीं ती दिवे लावायला लाजत होती, स्वर्ग साकार करीत होती; बाहेर दिवे भडकत होते, नरकाची कळा पसरली होती. घरीं...बाहेर ...

वेश्यावस्ती पेंगुळली, निद्राधीन झाली पण वासू भकासपणें आढ्याकडे टक लावून वेळ काढीत राहिला.



सकाळीं तो जागा झाला तेव्हां पिंजऱ्यापुढें बसलेली द्वारका अदृश्य झाली. दचकून त्यानें इकडे तिकडे पाहिलं. लाडवांच्या डब्याशीं खुडखुडणारे उंदीरहि पळाले. जागरणानं डोकं जड झालं होतं. आणिक झोपावंसं वाटत होतं. पण खूप उशीर झाला होता; दहा वाजायच्या आंत कारखान्यांत हजर व्हायला हवं होतं. प्रातर्विधी उरकून वासूनं जुने कपडे चढविले. लग्नांतला पोशाख घालायची त्याला लाज वाटली; व सोमवारपासून खानावळ बंद होणार याचीही !—स्वैंपाकाच्या सामानाची, भांडींकुंडीं व मीटमसाल्याची मोठी यादी त्याच्या मनांत तयार होऊं लागली. घरचा, बायकोच्या हातचा स्वैंपाक खायला मिळणार ह्या विचारानें तो हसला. अन् जेवून आपण कामावर जाणार व बायकोला ह्या वस्तींत एकटी टाकणार ह्या जाणिवेनें परत खिन्न झाला.

खोली बंद करून तो बाहेर आला. बाजार बंद होता, खिडक्या मोकळ्या होत्या. त्या उकिरड्यांतून तो घाईनें बाहेर पडला. खानावळींत चार घास जेवून कामावर हजर झाला. मिनिटं दोन मिनिटं उशीरच झाला होता. तें त्याच्या पथ्यावरच पडलं. त्यामुळं कुणाला चिडवायला सवड सांपडली नाहीं. लाडवांबद्दल, लाल डोळ्यांबद्दल कुणीं एखादी कोटी केली. कुणीं पाठीवर थाप दिली, डोळे मिचकावले. त्याचा जिवलग दोस्त जगदाळे सकाळपासूनचा बँकेंत गेला होता. त्यामुळें थट्टा अधिक होणं अशक्य होतं.

मधल्या सुट्टींत वासू बाहेर आला. बँकेंतून परतलेल्या जगदाळेला घेऊन उडपीच्या उपाहारगृहांत तो गेला. जगदाळेची टकळी चालूच होती, "लेका, एवढ्यानं भागणार नाहीं, जेवण हवं—कसं झालं कोकणचं लग्न ?—वहिनी केव्हां येणार..." वासूनें मुकाट्यानें चहा व डोसा मागवला व तो गंभीरपणें म्हणाला,

"जगदाळ्या, मी संकटांत आहें—"

"संकटांत म्हणजे संसारांतच ना ? अरे गृहस्था—

"तुझे कळकट विनोद पुरे कर. बायकोला कसं घरीं आणायचं ह्याची पंचाईत पडली आहे मला—"

जगदाळेला आणिक विनोद सुचला, पण वासूचा घोगरा आवाज व गंभीर चेहरा पाहून तो बोलला नाहीं. वासू काय म्हणतो तेंच त्याला कळेना.

"अरे, मी कुठें राहतों माहीत आहे ना? त्या वेश्यांच्या मोहल्ल्यांत संसार थाटायचा म्हणजे—"

वाक्य टाकून वासू जगदाळेकडे पाहूं लागला. जगदाळेला अजून कोडं कळलं नाहीं. वासूकडे तो अनेकवार गेला होता. नदीकांठीं नि कारखान्यापासून कोसभर असलेल्या त्याच्या बहिणीच्या बिऱ्हाडापेक्षां वासूची खोली बरीहि होती. खेरीज वासूला लगेच स्वतंत्र संसार थाटायची सुवर्णसंधि सांपडली होती. उलट जगदाळे आज सहा वर्षे आपला संसार सांवरीत बहिणीकडे तळ देऊन होता.

वासू गंभीरपणें म्हणाला, "त्या घाणींत बायकोला कसं ठेवूं? आईबापांच्या सहवासांत, खेड्यांतल्या मोकळ्या वातावरणांत वाढलेली आहे ती. अजाण अन् अशिक्षित ! ती कशी इथें राहील ? दिवसभर एकटं रहायचं. रात्रीं आजूबाजूला बाजार सुरू असतांना..."

जगदाळेला पटलं. कालच संध्याकाळीं बहीण एकटी पार्कवर फिरायला गेलेली समजतांच तो पत्त्यांचा डाव अर्धवट टाकून तिला सोबत करायला धावला होता, म्हणून अधिकच पटलं. तो घाईनं म्हणाला,

"वासू, तूं दुसरी जागा बघ!"

"तीच तर अडचण आहे. आधींपासून बघतोंच आहें. पण लग्नांतलं तें वातावरण, ते सरळ मनाचे लोक नि बायकोचा तो चेहरा पाहून मला हा प्रश्न फारच सतावतो आहे. काय वाटेल तें झालं तरी तिला त्या जागीं...तूं बघ जागा माझ्यासाठीं."

दोघे एकमेकांकडे पाहात राहिले. दुसरी जागा मिळणं म्हणजे बिस्किट कारखान्याच्या मॅनेजरची जागा मिळण्याहून मुष्कील होतं. पैसेवाल्यांना, वशिलेवाल्यांनाहि जागा मिळत नव्हती ह्या पुण्यनगरींत...

भांबुर्डा, वाकडेवाडी, लकडीपूल, नवी पेठ, साऱ्या पेठा नि लष्करचा भागदेखील दोघांनीं पायाखालीं घातला. सकाळीं तास दीड तास व संध्याकाळीं कारखाना सुटल्यापासून रात्र पडेपर्यंत. कुणाकडे विचारणा करणंच वेडगळपणाचं होतं. लोक हसत, हाकून देत. जगदाळे टाळूं लागला नि मग वासूहि दमून गेला. गुरुवार गेला, शुक्रवार गेला, पण कांहीं जमलं नव्हतं, कांहीं सुचलं नव्हतं. शनिवारीं कारखान्यांतून परततांना जगदाळेनें एकदम वासूचा हात धरून म्हटलें,

"उद्यां रविवार. उद्यां तर वहिनी येणार. असं कर. तिला माझ्या बहिणीकडे आण. आठ पंधरा दिवस ढकलूं—"

वासू मित्रप्रेमामुळें शहारला. तेवढा एक मार्ग काढण्यासारखा होता. पण जगदाळेच्या बायकोची दशा तो पाहात होता. बिचारी नणंदेच्या घरीं पाहुण्यासारखी, पोतेऱ्यासारखी राहात होती जागा नाहीं म्हणून! त्यांत आणिक द्वारकीची धिंड नको. तो म्हणाला,

"राहूं दे—बघूं. अजून तेवीस तास आहेत."

वासू विचार करीत घरीं आला. जगदाळेबद्दलचे विचार, द्वारकेबद्दलचे विचार. घरीं दाजीसाहेबांचं पत्र येऊन पडलं होतं. 'उदईक दुपारच्या बसनं चि. सौ...' चार ओळींचं पत्र पाहतांच वासूचं हृदय फाटून गेलं. द्वारकीच्या सहवासाची ओढा, तिच्या आगमनाची धास्ती! त्याला वाटलं, तार करून कळवावं कीं द्वारकीला धाडूं

नका. किंवा आपण स्टॅंडवर जायचंच टाळावं! किंवा...किंवा काय करावं ह्याचा विचार करीत तो फेऱ्या घालं लागला. डोकं दाबूं लागला. कपाळाला अमृतांजन फासूं लागला.

संध्याकाळ संपत होती. बाहेरचा बाजार सुरू झाल्याचं जाणवूं लागलं होतं. शेजारच्या सुताराच्या बिऱ्हाडांतली चूल पेटत होती. वासूला वाटलं, उद्यां आपल्या संसाराची चूल पेटेल. द्वारका ह्या कोपऱ्यांतल्या शेगडीशीं...पण पेटेल का चूल? कीं ही वस्ती, हा व्यापार पाहून ती भडकेल? संसारालाच आग लागेल? सुताराची सून पाणी भरीत होती, भाकरी थापीत होती. वासूला वाटलं, हिची सोबत आहे. दोघी बरोबरीनें मंडईत जातील, निवडणं टिपणं करतील. त्याला तेवढंच समाधान सांपडलं. पण दुसऱ्याच क्षणीं तो कावराबावरा झाला. सुताराच्या दारावर एकदां अपरात्रीं कांहीं दारुड्यांनीं धक्के दिले होते. कुणीं तरी त्यांना सांगितलं होतं कीं इथें खाजगी धंदा करणारी घरगुती बाई राहते म्हणून. त्या आठवणीनं वासू व्याकुळ झाला. डोकं दाबून सुन्न बसला.

दाही बोटांनीं डोकं चिवडतांना एक कल्पना त्याच्या डोक्यांत चमकून उठली. त्यानें उजव्या हाताच्या बोटाकडे निरखून पाहिलं. दाजीसाहेबांनीं लग्नांत कापड दिलं तेव्हां मास्तर म्हणाले होते, 'दिवाळसणाला आंगठी—' दाजीसाहेबांनींहि मान डोलवली होती. तोळाभर सोनं दिवाळीस मिळेल. त्याच्याबद्दल आगाऊ, आत्तां नथू सराफाकडून रक्कम आणतां येईल. दहा पंधरा दिवस द्वारकेला घेऊन हॉटेलांतच राहूं! मग तोंपर्यंत आत्या वडगांवला परतली कीं तिच्याकडे बायकोला पाठवूं. तिथून मग माहेरीं. मंगळागौरी, दिवाळसण! त्याला आपल्या कल्पनेचं कौतुक वाटलं. अखेर बायकोची व स्वतःची विटंबना होणं टळणार होतं. मग त्याला जरा वाईटहि वाटलं. बायकोची अशी धिंड काढण्यासाठीं का लग्न केलं? अन् कधीं नव्हे तें कर्ज करायचं, सासऱ्याच्या देणगीवर हा उद्योग करायचा...पण दुसरा मार्ग नव्हता! विचारांना आणिक फाटे फुटूं नयेत म्हणून तो एकदम उठला व तरातरा रस्त्यावर आला. रस्त्यावर वळवळणारे पुरुष व खिडक्यांत, खुर्च्यांवर, पलंगांवर, पिंजऱ्यांत बसलेल्या वासनेच्या पुतळ्या...छे, त्याची पत्नी इथें कदापि राहणार नव्हती, फिरकणार नव्हती.

वेश्यावस्ती संपवून तो पुढें जाणार तों समोरून भाऊकाका चाललेले त्याला

दिसले. त्याचे चाळीस वर्षांचे, चुलतचुलत, खूप दूरचे काका. वासूनें प्रथम त्यांना ओळखलं नाहीं. अन् ओळखलं तेव्हां तो वरमला. त्यांच्या घरीं लग्नाचं निमंत्रण करण्याचंहि सुचलं नव्हतं त्याला. भाल्काकांना तो टाळणार तोंच त्यांची नजर वासूकडे वळली. त्यांनींहि जरा अवधीनंच ओळखलं. अन दोघेही नाइलाजानें नकळत थांबले.

वासू चाचरत म्हणाला, "उद्यां परवां येणारच होतों. लग्न करून आलों परवां. एकाएकीं टरलं. कुणाला कळवायला सवडहि सांपडली नाहीं...कोकणांतली आहे—"

"हो ! कुणी म्हणालं खरं आईला—"

आपल्या विवाहाची वार्ता भाल्काकांच्या वृद्ध आईला तिऱ्हाइतांकडून कळावी याचं वासूला वाईट वाटलं. वाटलं, आईंना भेटावें. सर्वांना भेटून सारवासारव करावी. फार तर लाडू नेऊन द्यावेत उद्यां—

उद्यां ? उद्यां तर द्वारका येणार. अन् मग आणिक एक विलक्षण कल्पना त्याला सुचली ! खिशांत हात घालून तो दांत कोरणाऱ्या भाल्काकांना म्हणाला, "घरींच निघालांत ना ? चला, मीहि येतों."

अबोल, अस्वस्थ भाल्काकांबरोबर तो झपाझप चालूं लागला. कसबा पेठेंतल्या एका जुनाट वाड्याशीं आला. आपल्या आडनांवाचं, नात्याचं घराणं इथं नांदतं आहे, आणि आपल्याला त्याचं विस्मरण व्हावं याची त्याला शरम वाटली. भाल्काकांच्या मागोमाग तो घरांत गेला. जेवणं सुरू होत होतीं. भाल्काकांचे दोन मुलगे, दोन मुली, एक मेहुणा, अन् काकींची कुणी भाची पाटावर बसलीं होतीं. काकी वाढीत होत्या. वृद्ध विधवा आई देवाशीं बसली होती.

म्हातारीनं मात्र त्याला तत्काळ ओळखलं. "वासूच ना तूं ? दिगंबराचा मुलगा. आम्हांला अगदीं विसरलास का रे बाबा ? तुला सख्खं कुणी नाहीं, पण आम्हीं तुझीं कुणी आहोंत ! अरे, एवढं लग्न केलंस, पण—"

म्हातारी भडाभडा बोलत होती. काका, काकी, मुलगे, मुली पाहात राहिलीं. ती अनोळखी तरुण भाचीही. वासूचा चेहरा पडला. पण डोळे चमकूं लागले. कशी क्षमा मागायची, कसं प्रेम प्रकट करायचं, कसं पोटांत शिरायचं याचा तो विचार करूं लागला. त्याला वाटलं, कीं आत्तां नीट साधलं कीं उद्यांचं संकट सरलं ! मग उद्यां संध्याकाळीं स्टँडवरून द्वारकेला थेट इथें आणायची. नवी सून म्हणून

वडीलधरांत ठेवायच्या वहिवाटीनुसार, खोलीची डागडुजी चालली असल्याच्या सबबीवर, कांहीं दिवस इथें ठेवायची...द्वारकी ह्या घरांत प्रवेश करते आहे, म्हातारी तोंड भरून आशीर्वाद देत आहे, मुलं कुतूहलानें पाहात आहेत, नवी मैत्रीण मिळाली म्हणून ही भाची खूष आहे. खुद्द द्वारकी हें बाळबोध, भरलेलं घर पाहून आनंदित आहे...अशीं दृश्यें तो आधींच पाहूं लागला.



सोमवारीं सकाळीं वासू कारखान्यांत आला तों फाटकाशीं जगदाळे वाटच पहात उभा होता. वासूकडे धावत येऊन अधीरतेनें तो म्हणाला, "वहिनी आली का ?—काय झालं ?"

वासूचा टवटवीत चेहरा अधिकच प्रफुल्लित झाला. "जिंकली बेट्या ! आमच्या एका नातेवाइकाकडे उतरवली तिला. खोलीचा गिलावा ढासळला आहे, डागडुजी चालली आहे, अशी थाप मारली. ते लोक जरा नाराजच आहेत. पण घरांतली म्हातारी खूप आहे. मीं सूचना करतांच तयार झाली. तिला मान मिळाला, महत्त्व मिळालं ना !—"

जगदाळेनें सुस्कारा सोडला. तेवढ्यांत वासू म्हणाला, "पण आठवडाभरच हं. अधिक धकायचं नाहीं. त्यांना नि मलाहि. जागेचं लक्षांत राहूं दे —"

त्याला सोडून वासू आंकडेमोडी करूं लागला. म्हातारीला कसं खुलवलं, तयार केलं, हें आठवून तो स्वतःवर खूप झाला होता. काल संध्याकाळीं स्टँडवर द्वारकी आली तें आठवूं लागला. प्रवासानें मलूल झालेला तिचा चेहरा नवरा दिसतांच उजळला. मग टांग्यांत बसल्यावर झालेला तिचा स्पर्श ! बंड्या स्टँडवरून मित्राकडे उतरायला गेला म्हणून तिला वाईट वाटलें तेंहि स्मरलं. खोलीवर न जातां आपण दुसऱ्याकडे राहायला जायचं ह्या विचारानें तिला वाईट वाटलं होतं. पण भालूकाकांकडे पोहोंचतांच सर्वांना नमस्कार करून, झटकन् पदर बांधून पाटपाणी करायला लागून, तिनं सर्वांचीं मनं जिंकलीं, हेंही वासूला आठवलं. आठवलं नि त्याचं कामांत लक्ष लागेनासं झालं. तिची भोळी भाबडी, सरळ, शालीन मूर्ति त्याला सारखी दिसत होती. आणि अशा देवतेला त्या वेश्यावस्तींत नेलं नाहीं ह्याचा हर्ष होत होता. कारखाना सुटेपर्यंत हीं दृश्यं नि हा हर्ष त्याला एक ओळ लिहूं देत नव्हता.

सहा वाजलेले दिसतांच तो टेबल टाकून फाटकाबाहेर पडला. धावतच घराकडे

गेला. नेहमींच्या रस्त्यानें न जातां आपण नव्या मार्गानें सभ्य वस्तीकडे जात आहोंत हें ध्यानांत येऊन तो जरा बावरला, जरा बहरला. आपलं बिऱ्हाड जर चांगल्या वस्तींत असतं तर आत्तां द्वारका दारांत वाट पाहात राहिली असती. आपण घरीं जाऊन चहा पिण्यापूर्वी...उन्मादाच्या वांझोट्या विचारांनीं वासूला वाईटहि वाटलं.

तो भाऊकाकांच्या घरीं गेला, तेव्हां दारांत द्वारका नव्हती. त्याला चहा विचारायलाहि कुणी नव्हतं; नि त्यानं चहा मागणंहि अप्रशस्त होतं. जवळ जवळ आगंतुकच होता तो! द्वारकी काकींबरोबर नळाचं पाणी भरीत होती. त्याला पाहून ती हसली, लाजली. वासूचा शीण उतरला. पण अधिक सहवासाच्या अशक्यतेनं तो उन्मळून गेला. घरांत कोट-टोपी न काढतां फेऱ्या घालूं लागला. पोरं कॅरमचा डाव खेळत होतीं तो पहात राहिला. काकींची भाची माणिक आरशासमोर पावडरकुंकू लावीत होती तें पहात राहिला.

त्याला एकदम वाटलं कीं माणिकच्या सहवासानं द्वारकी सुधारेल, शहरी बनेल. तिचा खेडवळपणा, भाबडेपणा जाऊन ती अधिक तरतरीत, तरबेज दिसेल. तो माणिकच्या उफाड्या, पाठमोऱ्या मूर्तीकडे पाहूं लागला. तसं बघणं वाईट हें ध्यानांत येऊन मग तो बाहेर आला.

पदराला हात पुशीत द्वारका त्याची वाट पाहात होती. ती म्हणाली, "चहा घ्यायचाय् ना?"

"येतांना घेऊन आलों—मित्र होते बरोबर." वासू घाईनं खोटं म्हणाला. आपल्याला संध्याकाळचा चहा मिळत नाहीं, बायको तो करून देऊं शकणार नाहीं ह्या जाणिवेनें त्याला खिन्न वाटलं. जरा थांबून तो म्हणाला, "तुझा झाला ना?"

"मी चहाच घेत नाहीं. मघा मुलांचीं खाणीं झालीं तेव्हां काल्चा भात खाल्ला. मला भाताशिवाय होत नाहीं—"

मग कुणीच बोललं नाहीं. वासूला वाटलं, तिला घेऊन फिरायला जावं. पण...तो म्हणाला, "इथें कंटाळली नाहींस ना?"

"नाहीं. खूप माणसं असल्यानं वेळ जातो छान. मी एकटी राहाणार म्हणून माहेरीं सर्वांना भीति पडली होती—"

तिच्या मोकळया हसण्याला वासूनं खालच्या स्वरांत साथ दिली. ती म्हणाली, "कधीं नीट होणार आपलं बिऱ्हाड? कशी आहे खोली? कुठें आहे तरी?"

त्यासरशीं वासू दचकला. कसाबसा म्हणाला, "होईल तयार आठवडाभरांत. गिलावा चालला आहे. रंग लावायचा आहे—"

तेवढ्यांत भाऊकाका बाहेरून आलेले दिसले. द्वारका घाईनें म्हणाली, "मामंजी आले. मी जातें आंत—"

वासू घाईनें म्हणाला, "आंत कशाला? बाहेर जाऊं! फिरायला—"

"नको! सासूबाई म्हणाल्या, माणकला रात्रीच्या स्वैंपाकांत मदत कर म्हणून."

द्वारका आंत पळाली. वासू रस्त्यावर आला. उदासपणें, उद्वेगानें. चोवीस तास झाले, पण बायकोशीं चोवीस वाक्यंदेखील तो बोलला नव्हता. त्यानें एकदांहि तिच्या अंगाला हात लावला नव्हता. त्याला स्वतःच्या दैवाचा राग आला. बायकोच्या बाळ-बोधपणाचा राग आला. साऱ्या जगाचा उगाचच राग आला. वाट फुटेल तिकडे तो वेड्यासारखा भटकत होता. मोकळ्या रस्त्यावर जोडपीं फिरायला जात होतीं. लग्न झालेलीं व लग्न न झालेलीं. गजबजलेल्या दुकानांतून संसारी स्त्रीपुरुष खरेदी करीत होते. आणि नुकतंच लग्न झालं असून, बायकोबरोबर ह्या अफाट शहरांत एकटा असून, वासू वणवण करीत होता. दुकानांतल्या पातळांच्या घड्या पाहात होता, भरलेल्या थिएटरवरून जात होता. पुलावर एकटाच शेंगा खात होता; आणि खानावळींत अर्धकच्चं अन्न चिवडीत होता.

खानावळींत जेवून वासू भाऊकाकांच्या बिऱ्हाडीं परतला. घरांतलीं जेवणं आटोपलीं होतीं व निजानीज होत होती. दोन खोल्यांच्या त्या बिऱ्हाडांत दाटीदाटीनें गाद्या घातल्या होत होत्या. वासूची कुणीं वास्तपुस्तहि केली नाहीं. काका-काकींना त्याचं आगमन पसंत नव्हतं. म्हातारीच्या शब्दाखातर, सुनेच्या सबबीवर सारं गप्प होतं. भाऊकाकांनीं त्याला पाहतांच तोंड फिरवलं. काकीनं भांडीं आदळलीं. द्वारकेला बिचारीला अजून उमगलं नव्हतं. आजेसासूला ती हरिविजय वाचून दाखवीत होती. सारा प्रकार पाहून वासू खजील झाला, खिन्न झाला. अपमानाचं शल्य त्याला बोचूं लागलं. ही परवड, ही विटंबना पाहून त्याला सुचेनासं झालं. पण द्वारका अजून सुरक्षित होती, खुषींत होती, हेंच मोठं समाधान होतं.

आपल्या पत्नीसाठीं वासूनं आपले विचार आवरले, विकार आवरले. कोपऱ्यांतील सतरंजी व घोंगडी घेऊन तो बाहेरच्या ओस्र्यावर आला व आडवा झाला. चांदण्याच्या प्रकाशांत व गार वाऱ्याच्या माऱ्यांत डोळे मिटून राहिला. त्याला

वाटलं, आतां वेश्यावस्तींतली बाजारपेठ फुटली असेल. रंग फासून व दिवे पेटवून खिडक्याखिडक्यांत बाया बसल्या असतील. ती पिंजऱ्याच्या पुढें बसणारी लुकडी, ती हिरव्या माडींत गाणं म्हणणारी काळी पोरगी, ती खूप गोंदलेली लठ्ठ बाई, ती पंजाबी पेहरावांतली, ती पदर न घेणारी, ती...वाड्यांत सुताराची सून दारावर धक्के बसतील या भयानं जागी असेल...द्वारकी मात्र त्या गोकुळांत, सासूच्या सहवासांत, समईपाशीं, सुरक्षित आहे...



पहाट होतांच ओस्र्यावर निजलेला वासू उठला. गेले तीन दिवस तो असा ओस्र्यावर, उघड्यावर निजत होता. गेल्या रात्रीं त्याला नीट झोपहि आली नव्हती. आंत म्हातारीच्या पुढ्यांत द्वारकी झोपलेली, तिकडे स्वतःच्या हक्काच्या बिऱ्हाडांत वळकटी गुंडाळून ठेवलेली, अन् हा असा ओस्र्यावर एकटा उसासे सोडीत पडलेला ! सकाळ संध्याकाळ द्वारकी स्वैंपाकघरांत गुंतलेली असल्यानें त्याला तिच्याशीं चार शब्दसुद्धां बोलायला मिळत नसत. दोन वेळचं जेवण बाहेर, दोन वेळचा चहाहि बाहेर...वासू जागा होतांच उदास झाला. स्वप्नांत तो निदान द्वारकीसह...

मागीलदारीं तोंड धुवून तो आला व कोट घेऊन तसाच बाहेर पडला. माजघर सारवणाऱ्या द्वारकीनें त्याच्याकडे पाहिलंही नाहीं. अन् घरांतल्या इतर माणसांनीं त्याच्याकडे तुच्छतेनं पाहिलं. वासूला वाटलं, खूप झाला खेळ ! द्वारकीला घेऊन सरळ आपल्या खोलीवर जावं. नकळत त्याचे पाय वेश्यावस्तीकडे वळले. पान-सुपारीची बैटक संपल्यानंतर जाजमावर चुरगळलेलीं फुलं, विड्यांचीं थोटकं, भरलेली पिकदाणी, रिकामीं तबकं उरावींत तसा तो रिकाम्या खिडक्यांचा, विझलेल्या दिव्यांचा, पानांच्या पिचक्यांनीं भरलेल्या गटारांचा मोहल्ला सकाळच्या उजेडांत भासत होता. वासू वेड्यासारखा भर रस्त्यावर उभा राहिला. त्याला तिथें स्वतंत्र, मोकळं वाटत होतं आणि परकं, तिऱ्हाइतासारखंहि भासत होतं. इथेंच त्याचा संसार होता; अन् नव्हताहि ! त्याच्या मनाची भयंकर ओढाताण होऊं लागली. आणि हें ध्यानांत येऊन डोकंहि दुखूं लागलं. दिंडीदरवाज्यांतून तो आंत आला. जिन्यांत शेणाचा गोळा घेऊन जाणारी सुताराची सून भेटतांच त्याला द्वारकेची आवेगानं आठवण झाली. खोलीचं कुलूप उघडून तो आंत आला. नवरदेवाचा पोषाख, लाडवाचा डबा, सासुरवाडीचा नारळ, जुजबी भांडीं, ट्रंक,

वळकटी, थंडगार चूल! वासूचं मन पेटून उठलं. मन आवरीत, तोल सांवरीत तो घरीं परतला. द्वारकी चुलीशीं बसलेली पाहून परत भडकला. दारांतूनच तिला त्यानें हाक मारली. ती हात पुशीत पुढें येतांच तो म्हणाला, "सकाळीं सांगायचं राहिलं!—आपल्याला जेवायला जायचंय. माझ्या मित्राकडे. चल लवकर—"

"पण सासूबाई —".

"सांग तिला—नि चल!"

द्वारकी आंत पळाली व वासू खिशांतल्या पैशांचा अंदाज घेऊं लागला. पैसे गेले तरी हरकत नाहीं, पण कारखान्याला बुट्टी मारून मजा करायची. 'जीवन'मध्यें जाऊन जेवायचं! द्वारकीला बाहेर यायला उशीर होतो आहे हें पाहून तो अस्वस्थ झाला. भालूकाकांचे छद्मी डोळे त्याच्यावर रोखत गेलेले पाहून तो अधिकच अधिरा झाला.

द्वारका आली. पदर नीट घेत म्हणाली, "चला. पण लवकर परतायचं. दुपारीं मुलं, साऱ्या बाया नि आजेसासूबाईसुद्धां तुळशीबागेंत जाणार आहेंत—"

वासूच्या कपाळावर आठी उमटली. मुकाट्यानं तो चालूं लागला. मोकळ्यावर आल्यावर, आपण बायकोबरोबर आहोंत या भावनेनं आठी गेली, व अंगाला गुद-गुल्या होत राहिल्या. ऐटींत टांग्याला बोलावून तो तिच्यासह बसला व घोड्याच्या दुडक्या चालीवर शीळ घालूं लागला.

मध्येंच द्वारकी दूर सरली. वासूनं विरस होऊन पाहिलं. ती शहारल्यासारखं करून म्हणाली, "रस्त्यांत काय हात धरतां—कुणी काय म्हणेल?—"

"इथें कोण पाहणार आहे? नि कोण विचारणार आहे—"

"मला लाज वाटते. आपल्या बिऱ्हाडीं गेल्यावर—"

पुन्हा लाज—पुन्हा बिऱ्हाड! वासू पुन्हा चिडला. टांगा थांबला तशीं उतरला, व बायकोसह 'जीवन' मध्यें आला.

"हॉटेलांत जेवायचं?—मित्राकडे म्हणालांत ना!" द्वारकी भांबावून, भेदरून म्हणाली.

वासूनं कपाळाला आठी घातली व कडवटपणानं म्हटलं,

"हॉटेलंच आमचे मित्र आहेत!—बारा वर्षं खानावळींत घालवलीं आहेत... मग काय तर! पांच दिवस झाले तुला येऊन, पण क्षणभर तरी निवांतपणं बोलाबसायला मिळालं का? सांग—"

खास खोलींत दोघंही निवांत बसलीं. द्वारकीचे डोळे भरून आले. नवरा रागावला—नाखूष झाला म्हणून! वासूला तिची चर्या पाहून वाईट वाटलं. तो म्हणाला,

" रागावलीस ? "

तिनं मान हलवली. पुढ्यांतल्या ताटांतला भात कालवला. घास घेतांच तोंड कडू केलं. नवऱ्याकडे प्रेमळपणं पहात ती म्हणाली,

" असलं अन्न खातां तुम्ही ? " तिल्याच जरा वेळ बोलवेना. मग एकाएकीं ती म्हणाली, " मी घरचा तांदूळ मागवीन. माझ्या हातानं स्वैंपाक करून वाढीन. कधीं जायचं हो आपण आपल्या बिऱ्हाडीं ? "

वासूच्या घशाखालीं घास उतरेना. त्याला वाटलं कीं...पण छे, अशा निर्व्याज, निष्पाप मुलीला तिकडे...तो म्हणाला, " कदाचित् पुढल्या आठवड्यांत आतेकडेच जावं लागेल तुला. तिच्याकडे कांहीं देवाधर्माचं आहे—"

' जीवन 'बाहेर आल्यावर वासू अधिक उदास झाला. द्वारकीला आणिक कुठें न्यायची ? घरींच परत पाठवावयाला हवी!...अन् ती गेल्यावर आपण काय करायचं ? सगळे तुळशीबागेंत जाणार म्हणून घराला कुलूप, खोलीवर जाणं तर कठिणच, अन् कारखान्याला टांग मारलेली ... ती शांत रखरखीत दुपार त्याला दुःसह झाली. त्यानें परत टांगा केला. द्वारकीच्या पाठीवर हात न टाकतां तो बसला. रस्त्यावरच्या पाट्या पाहात राहिला. पण टांगा धडधडत होता, द्वारकीची मांडी चिकटत होती. बाजूच्या सिनेमागृहावरचं भलं मोटं चित्र पाहून तो अधिकच वेडा झाला. वाळवंटावर बसलेल्या जोडप्याची अर्धनग्न आकृति. द्वारकेला तो म्हणाला, " सिनेमाला येणार आज ? "

" तुळशीबागेंत जायचंय ना ?—उद्यां जाऊं. कसला आहे ? "

" तो बघ ! संग्राम— "

" ई—किती घाण चित्र काढलं आहे— "

तिनं तोंड वळवलं व वासूचा चेहरा पडला. कुणीच कुणाकडे पाहीना, बोलेना. टांगा बोळाबोळांतून चालला होता. वासूचे विचार आडवीं तिडवीं वळणं घेत होते. आत्या काशीहून कधीं येईल ? बिनपगारी रजा घेऊन सासुरवाडीस राहतां येईल का ?...अंगठीवर पैसे मिळवून...

त्यानें दचकून पाहिलं तों टांगा वेश्यावस्तींतूनच चालला होता. तो भांबावला !

भर दुपारची एखादुसरी खिडकी उघडी होती. एकदोन बाया पिंजऱ्यापाशीं राखुंडीनें दांत काळे करीत होत्या. म्हातारी कुंटीण पानपट्टीवाल्याशीं गप्पा मारीत होती...गवळीवाड्याच्या दिंडींतून सुताराची सून कचऱ्याचा डबा बाहेर नेत होती. वासूनं दचकून द्वारकीकडे पाहिलं. ती नाकाला पदर लावून म्हणत होती, "कुठून घाणींतून चाललोंय आपण. ह्या बाया म्हणजे त्या तसल्या ना?—शी!"

तिच्या स्वरांत, हावभावांत, कमालीची किळस भरली होती. वासूला खेटरं मारल्यासारखं झालं. तो घाम पुसूं लागला. टांग्याची कड घट्ट धरूं लागला. टांगा कसबा पेठेंत पोंचेपर्यंत तो शून्यपणें बसला होता. भालूकाकांच्या दाराशीं द्वारकीला सोडून बाहेर पडल्यावर त्यानें सुस्कारा सोडला.

मग भर दुपारच्या रखरखाटांत भकास मनःस्थितींत वासू वाट फुटेल तिथें हिंडला. त्याचीं संसाराचीं स्वप्नं विरून गेलीं होतीं, खचून गेलीं होतीं. काय करावं तें त्याला कळत नव्हतं, नि कांहींच करूं नये असं वाटत होतं. पुलावर, पार्कमध्यें, थिएटराशीं, मोटरस्टँडभोंवतीं, बसत भटकत तो हिंड हिंड हिंडला. काल संध्यकाळीं, गेले सहा दिवस, तो असाच भटकत होता. दुसरी जागा मिळत नाहीं म्हणून—आहे त्या बिऱ्हाडीं जायला नको म्हणून!

उन्हं उतरलीं तेव्हां तो जरासा भानावर आला. उन्हानें त्याचं डोकं दुखूं लागलं होतं. हिंडून पाय दुखूं लागले होते. अंगांत ताप भरणार असं वाटूं लागलं होतं. बिऱ्हाडीं जाऊन पडून राहावं असं त्यानं ठरवलं. द्वारकी त्या घरीं खुषींत आहे, हेंच अखेर एक समाधान होतं! आतां दोन दिवसांनीं तिला घेऊन सासुरवाडीलाच जावं. जागा अजून तयार होत नाहीं म्हणून! तेथून वडगांवला धाडावं. तेथून...मग... पाहावं पुढं. नोकरी सोडूं, गांव सोडूं—पण नादानपणानं पत्नीला त्या उकिरड्यांत नेणं नको!

वासू स्वतःचं सांत्वन करीत आपल्या खोलीकडे निघाला. पण त्याच्या लक्षांत आलं कीं खोलीची किल्ली द्वारकीकडेच होती. जेवतांना तिनं सहज घेतली व तशीच जवळ ठेवली. परत द्यायची ती विसरली. तो वळला व घाईनें कसब्यांत आला. घरांतील सारीं जणं अजून तुळशीबागेंत गेलीं नसतीलच ह्या आशेवर! नाहीं तर दोन्ही बिऱ्हाडीं कुलुपं व संध्याकाळपर्यंत वणवण!

पण घराला कुलूप नव्हतं. दार आंतून बंद होतं. वासूनें सुस्कारा सोडला. मग

त्याला वाटलं, द्वारकी मागीलदारीं असेल, भालूकाका कचेरींत गेले असतील, पोरंबाळं बाहेर खेळत असतील. सरळ द्वारकीकडे जावं नि म्हणावं, जरा सुंठ दे— जरा कपाळ चोळ! इतर बायका असल्या म्हणून काय झालं? द्वारकी त्याची बायको होती! कपाळ दुखत होतं तरी तो खुलला. चोरपावलांनीं मागीलदारीं गेला. स्वैंपाकघराच्या खिडकींतून आंत डोकावूं लागला.

आंतलं नीट दिसत नव्हतं. पण सारा शुकशुकाट होता. सर्वजण तुळशीबागेंत गेलीं होतीं तर! वासूचं डोकं अधिकच दुखूं लागलं. तेवढ्यांत आंत खडखडलं. श्वास आवरून, दचकून तो पाहूं लागला. जरा वेळ नुसताच बांगड्यांचा किणकिणाट झाला. मग जरा घोगरी कुजबूज. वासू मान वाकवून, डोळे फाडून पाहूं लागला. भालूकाका माणिकशीं, बायकोच्या तरुण भाचीशीं लघळपणा करीत होते! अन् ती निर्लज्जपणें हसत होती!!—

वासूच्या दुखणाऱ्या डोक्यावर प्रचंड आघात झाले. मिटल्या डोळ्यांपुढें शेंकडों बांगड्या फुटल्या. सारं जग गरकन् फिरलं. कसबा पेठ, अठरा पेठा; सभ्य वस्ती, वेश्या वस्ती! मुठी वळत त्यानं दार ठोठावलं. दारावर लाथा घातल्या.

भालूकाकांनीं थंडपणं दार उघडलं. त्यांची मुर्दाड नजर पाहतांच वासू भडकून गेला. त्याला वाटलं, गळा दाबून ... पण तिरीमिरीनें तो आंत गेला. द्वारकीचीं दांडीवर वाळणारीं दोन्ही लुगडीं त्यानें ओढून घेतलीं. तिची ट्रंक उचलली व बेभानपणें तो बाहेर आला. गजबजलेल्या रस्त्यानें धापा टाकीत धावत सुटला. कसब्याच्या गणपतीपाशीं उघड्या टपाची टॅक्सी दिसतांच थबकला. टॅक्सींत सामान टाकून आंत चढला. पण मोटर सुरू व्हायच्या आधींच तुळशीबागेंतून परतणारी द्वारकी सासरच्या बायकापोरांसमवेत दिसली. त्यानें ओरडून तिला हाक मारली. द्वारकी दचकली. सारींच दचकलीं. पुढं झालेल्या द्वारकीचा दंड पकडून तो म्हणाला,

"चढ गाडींत. खोलीचा गिलावा झाला आहे. आपल्या घरीं जायचं आतां. आटप!"

द्वारकी त्याच्याकडे पाहात मोटरींत बसली. नवऱ्याचा विलक्षण अवतार पाहून ती विस्मयचकित झाली होती. आणि उघड्या टपाची ती गाडी संध्याकाळच्या गजबजाटां-तून पेटणाऱ्या दिव्यांच्या व रंगणाऱ्या खिडक्यांच्या वेश्यावस्तींत शिरत होती.

* * *

# आजोबा ४

मास्तरानीं हजेरीचा तक्ता हातीं घेतांच मुलं सरसावून बसलीं. वर्ग सुरू होतांच हजेरी देणं ही मोठी गंमतीची गोष्ट होती. डोळे बारीक करून मास्तर सावकाश नांवं वाचीत व मग मान वर करून त्या त्या नांवाच्या मुलाकडे रोखून पाहात. सगळीं नांवं सरांना पाठ होतीं व सर्व मुलं नीट माहीत होतीं. तरीहि प्रथमच नांव वाचतों आहोंत अशा आविर्भावानं ते वाचीत व मुलांकडे अनोळखीपणें पहात. मास्तरांचं हें करणं मुलांना मोठं कौतुकाचं वाटे. आणि आपलं नांव पुकारायची पाळी आली कीं सांवरून बसायचं, सरसावून बसायचं, हाताची घडी काढून आजूबाजूला बघत उभं राहायचं नि मग खणखणीतपणें 'हजर' म्हणून म्हणायचं ह्यांत तर केवढा तरी आनंद सांठला होता ! त्यांतहि तऱ्हेतऱ्हेच्या गंमती होत्या. 'किशोर महादेव साठे' म्हटलं कीं आठ वर्षांचा साठे फटकन् ओरडायचा. रबराची बाहुली एकदम दाबली कीं जसा आवाज काढते तसा. मग मुलं हसायचीं. कुमार गणेश गोडबोलेच्या नांवाला प्रत्युत्तर प्रयासानंच मिळे. शेंबूड सांवरणं नि स्वर काढणं कुमाराला एकदम जमत नसे. प्रत्येक पोराच्या बाबतींत अशीच गंमत घडे. आनंद आठवले, सुनील शिर्के, अजित देशपांडे, हेमंत फडणीस...

मास्तर एक एक नांव उच्चारीत होते आणि हजरचा गजर वर्गाच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत घसरत होता. कोपऱ्यांतल्या जागेवर बसलेल्या गडकरीच्या हाताची घडी मात्र अधिकच घट्ट होत होती. डोळ्यांत कसलीशी व्यथा वाढत होती. छडीचे सपसप् आवाज यावेत तसे हजर शब्दाचे उच्चार त्याला भासत होते. छे, ह्यांत गंमत नव्हती. नांव घेतलं जाणं हें औषध घेतलं जाण्यासारखं होतं. एखाद्या अपराध्यासारखा त्याचा चेहरा झाला होता. छोट्या ओठांना मुरड पडली होती व

नुकतंच वर येऊं पाहणारं नाक लाल पडलं होतं.

किशोर, कुमार, आनंद, सुनील, हेमंत...भाकरीच्या खेळांतल्या ठिकरीसारखी हजेरी गडकरीकडे येऊं लागली. त्याची छाती वरखालीं होऊं लागली. त्याचं नांव त्यालाच टक्कळपणें दिसूं लागलं. त्याच्या वहीवर, वर्गातल्या फळयावर, भिंतीवर, खिडकींतून येणाऱ्या प्रकाशझोतावर. मग मास्तरांना तेंच नांव तक्त्यांत दिसलेलं त्यानं पाहिलं. तो शरमून उभा राहिला. ‘ हणमंत भगवंत गडकरी ’ —मास्तर म्हणाले व कोपऱ्यांत पाहूं लागले. त्यानं अस्पष्टपणें ‘ हजर ’ म्हटलं व दमून तो खालीं बसला. वर्गातला सर्वांत गोड व हुशार मुलगा हजेरीच्या वेळेस असा कां पुटपुटतो व पांढरा पडतो हें मास्तरना नि मुलांना कळलं नाहीं. हजेरीचा टक्का कोपऱ्यांतल्या कोंडींतून सुटला व दुसऱ्या ओळींत फिरूं लागला. हणमंताची सुटका झाली. पण त्याच्या नांवाचा गजर त्याच्या कानांत घुमत राहिलाच. पाढे म्हणतांना, तासाची घंटा होतांना, कुणी कुणाला हाक मारतांना, आपल्या नांवाचा प्रतिध्वनि त्याला सतावीत राहिला...

शाळा सुटली नि पाठीवर दप्तर टाकून हणमंत घराकडे निघाला. दाबून ठेवलेल्या दुःखाची त्यालाच उबग आली होती. त्याला कुणी बोललं नव्हतं, चिडवलं नव्हतं. पण म्हणूनच तो भांबावून गेला होता. मुकुंद गुतेनं पुन्हा ‘ साल्या ’ म्हटलं असतं तर पुन्हा हणमंतानं त्याला पिटला असता. पण मुकुंदा घसरगुंडीवरून उड्या मारण्याच्या नादांत त्याच्याकडे पाहातहि नव्हता. अन् जिवलग दोस्त कुमार मात्र ‘ हणमंता–हणमंता ’ म्हणून बोलावीत होता.

कुमारच्या गळयांत गळा घालून तो घराकडे निघाला. आतां अधिक सोसवत नव्हतं. कुमारजवळ तरी मन मोकळं करणं जरूर होतं. जवळून जाणारी बर्फाच्या गोळयांची गाडी दृष्टीआड होतांच तो थबकला. कुमारला म्हणाला, ‘ तुझं नांव कुणीं ठेवलं रे ? ’

कुमारला विस्मय वाटला. हातांतली पट्टी पोटरीवर मारीत तो म्हणाला,

‘ कुणी म्हणजे ? आईनं ! आपलं बारसं होतं ना, तेव्हांच पाळण्यांत घालून–’

‘ ठाऊक आहे रे ! ’ हणमंता परत चालूं लागला. रस्त्यावरचे खडे बुटाच्या टोकानं उडवूं लागला. ‘ तुझं नांव किती छान आहे ! वर्गातल्या सगळयांचींच नांवं छान आहेत. अशोक, अजित, सुनील, किशोर, मदन...तो काळा, शेंबडा मदन !

कुमार, मग माझंच नांव कां रे हणमंत ठेवलं ? हणमंत, हणमू ! कसं जुनाट वाटतं नाहीं ?—'

' पण देवाचं नांव आहे. मारुतीसारखं—'

' मला नको देवाचं नांव. नांवापुरते तेवढे आम्ही देव होय ?—आप्पलपोटे आहांत तुम्ही सगळे—'

कुमार त्याची चीड पाहून चमकला. ' अरे, आम्हाला कां बोलतोस ? आम्हीं कांहीं तुझं नांव ठेवलं नाहीं. एवढं होतं तर आईवडिलांवर रागवायचंस. आम्हीं काय केलंय् —'

मुकुंदसारखं कुमारला पिटावं असं हणमंताला वाटलं. पण त्याला अवसान आलं नाहीं. शिवाय कुमार त्याचा दोस्त होता. त्याचं बरोबर होतं. घरचेच लोक वाईट म्हणून त्याचं नांव हणमंता ठेवलं होतं. ताईचं नांव माणिक, धाकट्या भावाचं नांव मुकेश, पोपटाचं नांवसुद्धां चंदू. अन् तो तेवढा हणमंता काय ? बंडल. बंडल नि डाकू आहेत सारीं मोटीं माणसं.

तो घरीं आला तो धुसमुसतच. वसूकन् पायांतून बूट काढून त्यानं दोन दिशांना फेकले. आजीनं त्याची चाहूल लागून हांक मारली, ' आलास हणमू ?' तो अधिकच उखडला. कोपऱ्यांत पाटीदप्तर फेकून तिरसटपणं म्हणाला, ' माझं नांव हणमंत नाहीं. माझं नांव कुमार आहे. नाहींतर किशोर. '

आवेगानं आजी त्याच्याकडे आली. त्याच्या जावळावरून हात फिरवीत म्हणाली, ' तूं कुमार हणमंताच आहेस. किशोर आहेस, कृष्णकन्हैया आहेस. जा राजा, वाटींत लाडू काढून ठेवलाय् तो खा—जा—'

हणमंतानं रागाच्या भरांत आजीला झिडकारून टाकलं. अशी समजूत पटायला तो लहान थोडाच होता आतां ? लाडवाच्या नांवानं तोंडाला पाणी सुटलं. पण आपण हणमंतच आहोंत ह्या जाणिवेनं डोळ्यांत परत पाणी तरारलं. जरा वेळ तो तसाच उभा राहिला. मग आजीचा खरखरीत व सुरकुतलेला हात दोन्ही पंजांत धरून एकदम म्हणाला,

" आजी, माझं नांव असं कां ग ठेवलं ? मला नाहीं आवडत. कुणीं ठेवलं नांव ? कां ठेवलं ? "

आजी झोपाळ्याला टेकली व त्याच्या खिशांतल्या गोट्या ठिकऱ्या काढून घेऊं लागली.

" सांग ना आजी ? मला नको हणमंता नांव ! "

" अरे ! " आजी आवंढा गिळून म्हणाली, " अशी रीत आहे. असंच असतं, बाळ—"

" कसली रीत ? नि काय असतं ? नको मला—"

" बाळा, त्यांचं नांव आहे तें ! तुझ्या आजोबांचं. आजोबांचं नांव नातवाला ठेवायची चाल असते बरं. आजोबांचं नांव आहे हें. तिकडचं ! त्यांची आठवण म्हणून...तूं तर नांवांतच काय, सर्वच बाबतींत त्यांची आठवण काढून देतोस. लहरी, हट्टी, बोलशील तसं करणारा; अन् खूप शहाणपणाचं बोलणारा—" आजीचा आवाज अगदीं कांपरा कांपरा झाला. तिच्या खोल डोळ्यांतून पाणी घसरलं नि तिच्या स्पर्शाला वेगळाच आपलेपणा आला. हणमंताच्या डोक्यावरून, गालांवरून, बाहूंवरून हात फिरवीत ती त्याला कुरवाळूं लागली. " त्यांनींच पुन्हा तुझ्या रूपानं ह्या घरांत जन्म घेतला. ते म्हणजेच तूं !—हणमंतराव !...माझं सर्वस्व, माझं सोनुलं..."

हणमंताला पोटाशीं धरून आजी लाडवाचे घास भरवूं लागली. तिचं मन पूर्वायुष्यांत भिरभिरत होतं आणि तिचे हात हणमंताच्या शरिराभोंवतीं आधार शोधीत होते. डोळ्यांतून पाणी झिरपत होतं नि हातांतले घास नातवाच्या मुखांत रिकामे होत होते. हणमंतानें दोन लाडू खाल्ले. फुलपात्रभर पाणी प्यायला. पण त्याला बरं वाटेना. पोटांत अगदीं रिकामं वाटूं लागलं अन् छातीवर कसलंसं दडपण आल्यासारखं झालं. आपल्या नांवाचा तिटकारा वाटण्याऐवजीं दहशत वाटल्यासारखं झालं. त्या जीर्ण झोपाळ्यांत, सुरकुतलेल्या चेहऱ्यांत व थरथरणाऱ्या हातांत तो इवलासा जीव अगदीं गुदमरून गेला.

आजी आपल्याच तंद्रींत आहेसं पाहून हणमंतानं हळूच पळ काढला. नाक पुसून तो मागीलदारीं आला. 'हणमू–हणमू' चंदू पोपटानें साद दिली. पोपट कुणाला हाक मारतो आहे हें कळेना. पोपटानं पंख फडफडवून त्याचं लक्ष वेधलं तेव्हां तो भानावर आला. आपल्या नांवाचा त्याला आतां तिटकारा वाटेना व आपलेपणाहि वाटेना. अंगठा तोंडांत धरून क्षणभर तो अगदीं स्तब्ध राहिला. मग त्याला काय वाटलं कोण जाणे, एकाएकीं त्यानें अंगठा जोरानं चावला. स्वतःचं

नाक ओढलं, कान फडफडवले. हो, तो मराठी शाळेंत जाणारा छोटा मुलगा होता. पाढे म्हणणारा, भोंवरा फिरवणारा !

विलक्षण थक्क होऊन तो पोपटाकडे पाहूं लागला. हा पोपट आजोबांनीं आणलेला आहे म्हणून तर तो आपल्याला साद देत नाहीं? मुका प्राणी म्हणे माणसांना माहीत नसणाऱ्या गोष्टी ओळखतो. पोपट तर गेल्या सात जन्मांची माहिती सांगतो. ताईच परवां ती पुराणांतली गोष्ट सांगत होती. हणमंता पिंजऱ्याआड झाला, पोपटापासून लपूं लागला.

त्याला एकदम आठवण झाली व तो शेजारच्या बबनच्या घरांत धावत गेला. बबनच्या घराच्या परसांत इमारतीचं सामान आणून टाकलेलं होतं. मातीचे ढीग, सिमिटाचीं पोतीं, लाकडांचे ओंडके, विटा नि सळया. लपालपी खेळायला छान होतं. सकाळींच बबननें 'च 'च्या भाषेंत त्याला तसं सांगून ठेवलं होतं. हणमंता सळयांवरून तोल सांवरीत चालला. विटांवरचीं इंग्रजी अक्षरं त्यानं वाचलीं व मग मातीच्या ढिगावर चढून तो चौफेर पाहूं लागला. किती उंच गेला होता तो. नि किती शूर दिसत होता.

घरांतून बबन्या बाहेर येत होता. मुटींतले दाणे चड्डीच्या खिशांत भरीत हणमंताकडे पाहात होता. त्याला पाहून हणमंता ओरडला, 'नो लपालपी—'

बबन्यानें प्रश्नांकित नजरेनं पाहिलं. हणमंत गुडघा वाकवून ऐटींत उभा राहिला. म्हणाला, 'आय् यू प्ले शिवाजी—' आजोबांना इंग्रजी येत नव्हतं हें तेवढ्यांत त्याला आठवलं नि कसलंसं खोल समाधान वाटलं. (शिवाजीलाहि इंग्रजी येत नव्हतं हेंहि मग ध्यानीं आलं व त्याची ऐट जरा उतरली.) बबन्याच्या चड्डीच्या फुगलेल्या खिशाकडे पाहात तो म्हणाला, 'आपण सिंहगडची लढाई खेळूं. तूं तानाजी, मी शिवाजी—"

'नाहीं, मी शिवाजी!' बबन्या गालांत जीभ फिरवीत म्हणाला.

'छट्, माझं नाक कसं शिवाजीसारखं आहे. शारदोत्सवांत मास्तर मलाच शिवाजी करणार आहेत. तुला तर—'

"मग मी खेळायलाच येणार नाहीं. अन् आमच्या सामानावर उड्या मारलेल्या बाबांना आवडत नाहींत. दूर हो तूं. जा आपल्या घरीं—"

हणमंता चिडला. बबन्याच्या नजरेला नजर देत तसाच उभा राहिला. बबन्या

घरांत गेला तरी हल्ला नाहीं. बबन्याची त्याला चीड आली. तो स्वतः शिवाजी शोभतो ह्यांत काय खोटं होतं ? हणमंताची मान मागें कलली. हनुवटी वर झुकली. गुडघा परत वाकला. ताईच्या पुस्तकांतला शिवाजी, दुकानांतला मातीचा शिवाजी असाच असतो ! क्षणभर हणमंता देहभान विसरला; शिवाजी बनला !

आपण शिवाजी, आपण आजोबा, आपण हणमंता !—हणमंता एकदम बावरून गेला. बबन्या परत बाहेर आलेला पाहतांच भानावर आला. छे, तो शिवाजी मुळींच नव्हता. त्याच्या आजोबांचे आजोबा शिवाजीच्या वेळीं किल्लेदार होते असें एकदां वडील म्हणाले होते तें त्याला आठवलं. तो शिवाजी नसेल, पण किल्लेदार तरी असलाच पाहिजे. पूर्वी; पूर्वीच्या एका जन्मीं ! पुन्हा हणमंताचं मन वितळूं लागलें. मातीचा ढीग मोठा होऊं लागला. तुळया उठूं लागल्या. विटांचा तट चढूं लागला. कागदाचा कापलेला किल्ला विस्तारूं लागला. हणमंताचं हृदय जडावूं लागलं. तो मोठा होऊं लागला. आजोबांच्याहून मोठा, गडाच्या मालकाएवढा मोठा ! खूप धडपडत, धापा टाकीत तो ओरडला,

“ चल—खेळूं लपंडाव ! मी राज्य घेतां—”

मग अर्धापाऊण तास खूप धांगडधिंगा झाला. लपतांना, उड्या मारतांना, धावतांना हणमंता बहरून गेला. त्याचं दुखलेलं, दबलेलं मन मोकळं झालं व नेहमींसारखा तो हसूं लागला, लपूं लागला. खेळून खेळून त्याला चेव आला. रक्त कढत झालं व मन मोहरून गेलं. असंच खेळत राहावं, युक्तीनें गंमतींत लपावं, वेगानं धावत सुटावं, आणि घरीं कधींच जाऊं नये, आईबाबांना, पुस्तकांना, शाळेला तोंडच दाखवूं नये, असं वाटत राहिलं.

बबन्याच्या बहिणीनें मध्येंच भोकाड पसरलं आणि खेळाचा बेरंग झाला. पळतां पळतां बबनचा धक्का लागून तिच्या हातांतली बाहुली पडली. ‘माझा सोन्या, माझा छकुला मेल्यानं पाडलान्. लागलं बघ बाळाला—’ तिनं गळा काढला. आणखी कांहीं तमाशा होण्यापूर्वीच हणमंता तेथून निसटला. मुकाट्यानें घराकडे गेला. त्या मूर्ख पोरीचा त्याला भारी राग आला. कसलं तें मातीचं बाहुलं ! म्हणे तिचा मुलगा. मातीचं बुटुकलं कधीं हाडामांसाचं मूल होतं ?—हणमंताला त्या फुटक्या खेळण्याचा, त्या रडक्या मुलीचा, वाढत्या संध्याकाळचा, धुळीनें मळलेल्या स्वतःच्या शरिराचा, साऱ्यासाऱ्याचा राग आला.

"काय चिरंजीव! कुठें उनाडक्या करायला गेलां होतांत?" दारांतच त्याचे डील ओरडले. बाबांचं असं बोलणं नेहमींचंच होतं. पण तरीही हणमंता थबकला. ांच्याबद्दल आयुष्यांत अकारण अशी अढी प्रथमच त्याच्या मनांत उत्पन्न झाली. ापण कुठें गेलों, कांहीं केलं तरी हे कोण आपल्याला दरडावणार? हे कां असं ंखळीनें बांधून ठेवल्यासारखं वागवणार—अन् आपण तरी कां ऐकणार? हणमंता ातःच्या फुरंगटण्यानें स्वतःच भेदरला. त्यानं रोखून वडिलांकडे पाहिलं. ते ाच्याकडे हसून पाहात होते. त्या दृष्टीनं तो विरघळला. बाबांच्याकडे त्यानें झेप कली. हातांची सांखळी करून त्यांच्या गळ्यांत तो लोंबकळूं लागला.

मग तो चुलीशीं गेला व भाकरी थापीत बसलेल्या आईपुढें फतकल घालीत णाला, "मला आधीं वाढ. मला भूक लागलीय्."

आईनें त्याला दूर केल्यासारखा आविर्भाव केला व समजावणीच्या स्वरांत म्हटलं, असा वेडेपणा करूं नको. आपल्या माणकूताईचं लग्न होणार आहे. नीट गायला हवं—"

लग्न म्हणजे लाडू, जिलब्या नि बँड हें हणमंताला ठाऊक होतं. पण आईचं लणं ऐकतांच तो अचानक म्हणाला, "म्हणजे मग ताईला बाळ होणार ना?"

पिठाचे हात मागें घेऊन आई थक्क होऊन पाहूं लागली. "कमाल आहे बाई र्ट्यांची. कुठें शिकतो कोण जाणे! बघतोस काय! घे, तें पान घे नि जेव एकदाचा. ाखाडसासरा आहेस माझा!"

"मग आहेंच—" हणमंत हसत म्हणाला. आपल्याला सगळं कळतं ह्याचा त्याला भिमान वाटला. बबन्याची बहीण बाहुल्यांशीं खेळते म्हणून तिचं लग्न करीत हींत, आपल्या ताईनें बाहुल्या केव्हांच फेकून दिल्या म्हणून तिचं लग्न होणार व ला खरं बाळ मिळणार, हें गुपित त्याच्या केव्हांच लक्षांत आलं होतं. आईपासून ानं तें लपवून ठेवलं होतं, इतकंच! आईकडे हलकेच पहात तो गंभीर झाला व स तसाच ठेवून म्हणाला,

"आई, तूं लहानपणीं बाहुलीशीं खेळलीस?"

"अरे, साऱ्याच मुली लहानपणीं खेळतात. मी तर लग्न होईपर्यंत खेळत होतें. ा पानाकडे. अन् अजून पाणी प्यायलाहि नाहींस—"

हणमंतानं समाधानानं पाण्याचे घोट घेतले. त्याला तें जुनाट, चिंध्यांचं बाहुलं

पाहायची तीव्रतेनं उत्सुकता वाटली. (आईचं जुनाट बाहुलंच तिच्यापुढें पाणी पीत होतं कीं!) पण मग तो दुसराच विचार करीत म्हणाला,

"आई, तुला आजोबा आवडत होते?"

"आटप मेल्या, किती बोलशील! ऊठ नि नीज जा."

हातावर पाणी ओतून हणमंता स्वैंपाकघराबाहेर पडला. आईनें त्याचा विरस केला. अन् त्याचे विचारहि भडकावून सोडले. त्याला बाबांच्याकडे जावंसं वाटलं. लहर लागली तर बाबा त्याच्याशीं खूप बोलत. वडिलांनीं एकहि पैसा ठेवला नाहीं हें देखील बाबा त्याच्याजवळ एकदां बोलले होते. हणमंताला तें आठवलं व वाईट वाटलं. वाटलं कीं बाबांचं बोट धरून त्यांना सांगावं, 'माझी चूक झाली. मी तुम्हाला खूप पैसे देईन.'

गाल फुगवीत, डोळे मोठे करीत व खेळून जेवून झोपेला आलेलं शरीर सांवरीत, तो बाबांची समजूत करायला निघाला. टेबलाला टेकून बाबा त्याच्या 'यो-यो'शीं खेळत होते. हणमंता उंबरठ्यांतच थबकला. दोन्ही हात पाठीशीं गुंतवून, वरखालीं जाणाऱ्या शुभ्र चकतीकडे टक लावून पहात राहिला. बाबा खेळत होते व तो पहात होता...कोण मूल नि कोण बाप? तो त्यांचा हणम्या होता कीं हणमंतराव होता? भिंतीवर आईनं विणलेली 'भगवंत हणमंत गडकरी' ही पाटी त्याला दिसत होती. त्यांतलं 'हणमंत' नांव टळक होई. पुढेंमागें उड्या घेई. यो-यो वर-खालीं फिरे. हणमंताचा इवला जीव सशासारखा भेदरून जाई, राक्षसासारखा विस्तारत राही. पाटीवरचं मधलं नांव, योयोची चकती, हणमंताचं हृदय—सारंच एकाच तालावर, एकसारखं वरखालीं होत राहिलं...

"काय रे, काय हवंय?" बाबा एकदम चमकून म्हणाले. हणमंताहि दचकला. जें विचारायचं ठरवलं होतं तें विसरला. मग त्याला काय वाटलं, कोण जाणे! म्हणाला, "बाबा, आजपासून मी आजीजवळ झोपणार नाहीं. आज—रोज—"

"बरं, बरं! आज काय लहर फिरलीय? झोप तर वर जाऊन. कंदील घे तो. नेशील का नीट? मी आलोंच—"

कंदील सांवरीत व जडावलेले डोळे उघडे ठेवायचा यत्न करीत हणमंता जिना चढून वर गेला. कोपऱ्यांत कंदील ठेवून तो सरळ गादीवर पसरला. विचार करून त्याचं डोकं आतां अगदीं दुखत होतं. केवढं नवं गुपित त्याला आज समजलं होतं!

आणि किती नवीन नवीन कल्पना त्याला सुचल्या होत्या! एखाद्या मोठ्या माणसासारखं तो बोलला होता, त्यानें विचार केला होता. छे, एकदम मॅट्रिकमध्यें गेल्यासारखं त्याला वाटत होतं.

एकाएकीं तो उठून बसला. त्याचे डोळे चमकले. कोपऱ्यांतल्या कंदिलाची वात त्यानें मोठी केली. ज्योत मोठी झाली. स्टुलावर उभं राहून त्यानें कंदील उचलला. हात उंचावून उजेड वर नेला. डोळे फाडून तो भिंतीवरच्या आजोबांच्या तसबिरीकडे पाहूं लागला. विस्मयानं, आदरानं, भीतीनं! तें तैलचित्र आज तो प्रथमच इतकं निरखून नि निराळ्या नजरेनं पाहात होता. छे! अगदीं अनोळखी, रस्त्यावरच्या, नाटकांतल्या इसमासारखा चेहरा होता तो! भलं मोठं पागोटं, ओठ झांकणाऱ्या मोठ्या मिशा, रागीट डोळे, फुगीर हनुवटी, कानांत भिकबाळी व मानेशीं चामखीळ. भीति वाटावी अशी मोठी व रागीट मुद्रा. हणमंताला क्षणभर भय वाटलं, आजीचं सांगणं खोटं वाटलं. एका हातानं त्यानं स्वतःचा कान, मान चाचपलीं...पण आजी खोटं कसं बोलेल? हणमंता नांव उगाचच कोण ठेवील?—तो पुन्हा फोटोकडे टक लावूं लागला. पागोट्याकडे, मिशांकडे, डोळ्यांकडे. ते डोळे हणमंताकडे पाहून हसरे झाले. हणमंता अधिकच डोळे फाडून पाहूं लागला. पागोटं तसंच्या तसं भिरभिरत त्याच्याकडे आलं. त्याच्या डोक्यावर अलगद बसलं! माशीसारखा चामखीळ उडला व हणमंताच्या मानेवर डसला. मग घणघणत भिकबाळी आली. फिसकारीत मिशा आल्या, त्याचें ओठ तोंड झाकूं लागल्या. आरशांत पहावं तसं हणमंता फोटोकडे पाहूं लागला. स्वतःच्या प्रतिबिंबाकडे, खऱ्या रूपाकडे!—क्षणभरानं त्याची दृष्टि अस्पष्ट झाली. फोटोच नीट दिसेना. जिगानं भरलेलं बाळ दिसावं तसा फोटो गिचमिडलेला दिसूं लागला. अंमळशानें तें लहान बाळहि धड दिसेना...जडपणीं हणमंता खालीं उतरला. कंदील कसाबसा खालीं ठेवून त्यानें गादीवर अंग टाकून दिलं. आपल्या अंगाचे तुकडे झाले आहेत असं त्याला वाटलं. हात, पाय नि डोकंहि फुटून गादीभर जणूं विखुरलं आहे! बबन्याच्या बहिणीची बाहुली त्याला आठवली. अन् मग वाटलं कीं आईची लहानपणची बाहुली तीच आपण!—आपण मोठे झालों, मेलों, फुटलों नि केवळ मातीची मोडकी बाहुली म्हणून इथें पडून राहिलों.

हणमंता भेदरला. त्यानं अंग आवरलं. हातपाय पोटाशीं घेऊन तो पडून राहिला.

खोलींतल्या काळोखानं त्याचीं बुबुळं बारकीं झालीं. कंदिलाच्या मोठ्या ज्योतीकडे टक लावून पहातांना त्याच्या डोळ्यांत पाणी तरारलं. डोक्यांत गुद्दे बसूं लागले. जणूं मास्तर मारीत होते व तो रडत होता. हजर हजर म्हणून अपराध्यासारखा म्हणत होता. जणूं चंदू पोपटच 'हणमू–हणमू' म्हणून डोक्यांत टकटकत होता. आपणच मातीचं चित्र, आपणच हणमंत, आपणच फोटोंतले आजोबा अन् आपणच तो जुना किल्लेवाला! सारं आपणच!—त्याला कांहींच उमगेना. चिमुकल्या तळव्यांनीं त्यानं तापलेलं कानशील दाबून धरलं. हे हात, हे केस, नाक, ओठ आपले एकट्याचे, स्वतःचे नाहींतच तर? शारदोत्सवांतल्यासारखं आपण नुसतं सोंगच घ्यायचं तर?—लहान मुलाचे कपडे, मग मोठ्या माणसांच्या मिशा, मग लढाईत तलवार फिरवीत मरायचं, अन् पुन्हा—मरणाच्या भीतीनं हणमंतानं डोळे मिटले, उघडले. मेलों तरी आपण पुन्हा येणारच. नवा हणमंता म्हणून!—पुन्हा ह्याच घरांत, असाच!—कसला खेळ हा? ह्या रहाटगाडग्यांतच आपण एकसारखे अडकले जाणार?—क्षणमात्र त्याला वाटलं, उठावं नि पळत सुटावं. त्या किल्लेदारानं, आजोबानं, आणिक कुणीं कुणीं त्यांच्याशीं सांखळी धरली होती ती तोडून टाकावी. दुसरं नांव घ्यावं. स्वतःचं, अगदीं स्वतंत्र आपलं असं, हातपाय नाकतोंड मिळवावं!—पण तो तसाच पडून राहिला. आजोबांच्या उपरण्याचं टोक धरून. चादरीची कड घट्ट धरून. त्याला कांहींच कळेनासं झालं. कधीं नाहीं तो गोंधळ डोक्यांत झाला. भीति वाटत होती. झोप येत होती. जळणाऱ्या डोळ्यांतून पाणी झिरपत होतं.

"एकटा कां रे निजलास सोन्या?" आजी त्याला शोधीतच तेथें आली. आजीचा आवाज ऐकतांच हणमंत क्षणमात्र कावराबावरा झाला. विचारांचे योयो डोक्यांत वर खालीं फिरले. पण मग त्याला हुंदका आला. "आजी, थोपट मला!" तो उद्गारला व आजीच्या उबेंत शिरला. लाल कानशिलावर सुरकुतलेला पंजा पडतांच तो तत्काळ झोपेच्या आधीन झाला. त्याचीं कोडीं, कल्पना, विचार, व्यथा, सारीं संपलीं. स्वप्नांच्या गमतीदार सृष्टींत तो विहरूं लागला. मायेच्या चौघडीवर मृदुपणें हसत राहिला. पुटपुटत राहिला, 'ए हणम्या, पागोटं उडवीन तुझं! ए किल्ल्यांतल्या आजोबा—'

* * *

# कामचक्र ५

तो तिच्यापासून हलकेच दूर झाला.

आपण तिच्यापासून दूर झालों आहोंत हें त्याच्या बराच काळ ध्यानांतच आलं नाहीं. अंथरुणावर डोळे मिटून आपण शून्यपणें पडलों आहोंत ह्याचीहि त्याला दखल नव्हती. खालचें अंथरूण, आपले अवयव, भोंवतालचा अंधार—कशाचीच त्याला जाणीव नव्हती. त्याचं शिणलेलं शरीर ओंडक्यासारखं आडवं झालं होतं. आणि हृदय शुद्धिबुद्धीच्या सर्व सीमा पार करून सार्थकतेंत विलीन झालं होतं. तृप्तीच्या कोशांत तो लपेटून गेला होता. पूर्णत्वाच्या पोकळींत पूर्णपणं वितळून गेला होता.

किती तरी वेळ तो तसाच शांत, शून्य होता. समाधिस्थ योग्यासारखा, कृतकृत्य वीरासारखा. मग त्याला शुद्ध आली. एखाद्या जलदीपासारखं त्याचं हृदय जीवन-प्रवाहावर हलकेच तरंगत आलं. खोल पडसादांना परत सुमधुर स्वरांचा आधार मिळाला व त्याच्या मेंदूत संगीताचं संमेलन सुरू होऊं लागलं. उघडलेल्या अत्तराच्या कुपीसारख्या त्याच्या नाकपुड्या उग्र दर्प सोडूं लागल्या. भूमेंतून बाहेर येणाऱ्या कोंबासारखी त्याच्या डोळ्यांतून दृष्टि बाहेर डोकावूं लागली. त्या जागृतीनं नि शांतीनं, तृप्तीनं नि क्लेशानं त्याला परत ग्लानि आली. उंची मद्य भरपूर प्रमाणांत घेतलं अथवा तरवारीचे चार हात केले कीं जी सुखनिद्रा येते तिनं तो वेढला गेला.

पहाट होईपर्यंत तो तसाच झोपून राहिला होता.

कुठलासा कीटक त्याच्या नाकाच्या शेंड्याला दंश करूं लागला आणि त्या झिण-झिणण्यानें त्याला जाग आली. लाल पडलेलं नाक चोळवटत त्यानें डोळे उघडले, मिटले, उघडले. कपाळावर रेघा उमटल्या. बुबुळं चुरचुरलीं. गादीवरची चुरगळ-

लेली चादर, सभोवार झुलणारी, झेपावणारी मच्छरदाणी, त्यांतून दिसणारे फर्नि-चरचे टोकळे, उभ्या भिंती, अस्पष्ट प्रकाश पहातांच त्याचं मन भांबावून गेलं. कुशीवर वळतांना अंग दुखल्यागत झालं. स्वतःच्या हृदयाचा अंदाज येईना; आणि एखाद्या तप्त विस्तीर्ण वाळवंटांत आपल्या शरिराचा सांगाडा एकटा पडला आहे असा भास होत राहिला.

तसंच पडल्या पडल्या बऱ्याच अवधीनें तो नीट जागा झाला. किती वाजले असतील ह्याची दूरवर येणाऱ्या आवाजांवरून व जवळ आलेल्या उजेडावरून त्यानें कल्पना केली. सकाळ झाली होती. उठायचं म्हटलं तर उशीरच झाला होता. ‘ चहा झालाय् ’ म्हणून आत्तां बायको उठवायला येईल, अन् असंच निजून राहिलं तर कचेरीला जायला उशीर होईल.

बायको...कचेरी...तो दचकला. डोळे किलकिले करून त्यानें कोंपऱ्यांत टेबलावरच्या फायलींकडे पाहिलं. संध्याकाळीं ऑफिसांतून आणतांना बांधलेली लाल फितीची गांठ तशीच होती. घरीं येतांना एक मासिक विकत घेतलं होतं तेंहि वर पडलं होतं. काम संपवलं नाहीं अन् मासिक तर चाळलंहि नाहीं. त्याला आश्चर्य वाटलं. विचित्र वाटलं, शरमल्यासारखं वाटलं. कालची रात्र त्यानें फुकट दवडली. फुकट !—आपल्या मनाचा संभ्रम कसा सांवरावा, कळेना त्याला.

काल रात्रीचे प्रसंग तो आठवूं लागला....जेवण झाल्यावर सुपारी शोधीत तो खोलीभर हिंडत होता. मटाराच्या टेसदार उसळीमुळें जेवण जरा जादा झालं होतं. अंगावर सुस्ती येत होती; पण बारा वाजेपर्यंत जागून कचेरींतून आणलेलं काम पुरं करायचा बेत तो तडीस नेणार होता. सुपारी खात शतपावली करायची, पांच मिनिटं नवं मासिक चाळायचं, अन् मग टेबलाशीं फायली घेऊन बसायचं तें बारापर्यंत ! पण सुपारी संपली होती. शेजारच्या ब्लॉकमधल्या नानांकडे तो खांड मागायला गेला. गप्पा मारीत न बसतां दारांतूनच सुपारी घेऊन परतायचं हा हिशेब करीत ! पण नानांनीं नेहमींप्रमाणें पांढरी सुपारी न देतां सुगंधी पुडी दिली. त्यांतले मसाले, जिनतान, जिभेवर, कंठांत विरघळतां विरघळतां किती वेळ गेला तेंच कळलं नाहीं. शतपावली सोडून तो व्हरांड्यांत केव्हां खडा झाला तेंहि त्याला समजलं नाहीं. सुपारीचा सुवास संपला तोंच समोरून रातराणीचा गंध दरवळत रंध्रारंध्रांत घुसला. त्याला फुलांचं वेड नव्हतं, पण त्या वासानं तो भारावला

गेला. खोलींत वळला व टेबलावरच्या निळया दिव्याचा मंद उजेड पहात राहिला. टवटवलेल्या वृत्ती त्या निळया चांदव्यापुढं उचंबळून आल्या. हातांतला अडकित्ता खुर्चीच्या उशींत रुतला. त्या उशीवरचीं अक्षरं वाचतांच तो आंतघरांत गेला. बायको कुठेंच दिसेना. क्षणमात्र तो कावराबावरा झाला. पण कपाटाआड ती उभी होती. पाठमोरी ! तिला तशी पाहून तो अधिकच अस्वस्थ बनला. विरजण लावून ती वळली. आपल्या डोळयांतली अधीरता अपराध्यासारखी लपवून तो हसत उद्गारला, " आटोपलं नाहीं अजून ? " ती काय म्हणाली तिकडे त्याचं लक्ष नव्हतं. स्वैंपाक-घर बंद करून, तांब्या-भांडं घेऊन ती बाहेर आली व खुर्चीवर टेकली. तो पलंगावर बसला व बोलूं लागला. हसून, फुलून...

कुशी बदलत काल रात्रीं काय बडबडलों ह्याची तो आठवण करूं लागला. कसल्या तरी वायफळ गप्पा, फुटकळ विनोद. त्याला नक्की संवाद स्मरेनात. पण आपण मूर्खासारखं बडबडत होतों हें मात्र उमगलं. तिच्या नव्या ब्लाऊजची स्तुति, तिच्या बहिणीच्या नव्या बाळाची स्तुति. तिनं कांहीं तरी विधान केलं व आपण तें पटकन् मान्य केलं. कांहीं तरी काढून आपण रुसवा धरला नि तिला काकुळतीला आणलं. त्याला शब्द स्मरेनात, पण हालचाली स्पष्ट दिसल्या. सहजच म्हणून त्यानें दारं-खिडक्या बंद केल्या. ती बोलण्याच्या भरांत होती हें पाहून हलकेच तिला खुर्चीवरून उठवून पलंगावर, स्वतःजवळ बसवलं. तिची आर्जवी मुद्रा पाहून अधिकच रुसव्याचं ढोंग केलं...त्याला साऱ्या हालचाली सुसंगत आठवेनात, पण त्याभोवतीं भरलेली भावना स्पष्ट दिसली. अधीर झालेले अवयव, उकळलेलं उसळलेलं रक्त, वासनेनें व्याकुळ झालेले डोळे, मंद होत जाणाऱ्या दिव्याचा प्रकाश, खालीं येत जाणारी मच्छरदाणी, दूर जाणाऱ्या जड वस्तू व वेगानें जवळ येणारा मीलनाचा क्षण !...

क्षणमात्र त्यानें डोळे मिटले. त्या धुंदीच्या आठवणीनें क्षणकाल त्याचं मन भरून गेलं व लगेच तितक्याच वेगानें ओसरून गेलं. आतां त्या बेहोषींत तो बुडून जाऊं शकत नव्हता. त्या स्मृतीनं उलट त्याचं हृदय शहारलं. एखाद्या तिऱ्हाइतासारखी ती घटना तो न्याहाळूं लागला. काय वेड्यासारखं, विदूषकासारखं आपण वागलों ! एवढी कसली ही धुंदी, बेहोषी ?—त्याचं लग्न होऊन दीड एक वर्ष होत आलं होतं. कुतूहलाचे कढ आटोपले होते. अमर्यादतेचा पूर ओसरला होता. पण अजून तो शारीरिक भुकेचा गुलाम होऊन राहिला होता. काल, आदल्याच आठवड्यांत,

गेलं दीड वर्ष, वारंवार ! आणि हें पुढेंहि असंच वरचेवर चालू राहणार ! त्याला कसंसंच झालं. उशी डोक्यावर व पाय पोटाशीं घेऊन तो पालथा पडला. पुन्हां झोप घेण्याचा यत्न करूं लागला.

वेळ जात होता, सकाळ वाढत होती. मासिकाच्या पानांच्या पत्रावळी फडफडत होत्या. फायलींच्या फितींची गांठ करकचली होती. अडकित्ता खुर्चींत उघडा पडला होता व सुपारीची रिकामी पुडी दाराच्या सापटींत फाटून गेली होती. निळा दिवा नाहींसा झाला होता आणि सूर्याचे कवडसे जागजागीं चमकत होते. मिटलेल्या पापण्यांतून, डोक्यावरच्या उशींतून त्याला हें सारं जाणवत होतं अन् तो अधिकाधिक खिन्न होत होता. उठायचा तर उत्साहच वाटत नव्हता. आजचीं कामं करायचा कंटाळा आला होता व कालचीं कामं तशींच टाकलीं ह्याचा खेद वाटत होता. तसं त्यानं पाप मुळींच केलं नव्हतं. कुठला अत्याचार, अनाचार केला नव्हता. नेहमींचीच, नैसर्गिक गोष्ट केली होती. ती त्याची लग्नाची बायको होती व तो तरुण होता. पण...पण म्हणून काय झालं ? त्यासाठीं निकडीचीं, महत्त्वाचीं कामं दूर सारायचीं ? त्यांची आठवणदेखील न करण्याइतकं उल्लू व्हायचं ? लाचार बनायचं, खोटं हसायचं, कळकट विनोद करायचे, फांसे टाकायचे व शिकार पकडायची ? शरीराची प्रत्येक पेशी व मेंदूतल्या साऱ्या मज्जा पेटवून द्यायच्या ? ती प्रचंड शक्ति त्याला परत चिरडण्याऐवजीं आतां थक्क करूं लागली. डोक्यांत वासनेच्या वणव्याऐवजीं दुःखाचे घण पडूं लागले. केवढी पाशवी शक्ति आपल्या भावनेवर, बुद्धीवर नियंत्रण चालवते; अंमळ विसाव्यानं परत पाश आवळूं लागते; आणि आपण पुढचा, प्रगत मार्ग चढायचं सोडून परत वासनेच्या वाटेवर वळवळत राहतों. केवढं भीषण ! ... अटळ, अतर्क्य.

“ आज उठायचं नाहीं वाटतं ? केव्हांचा चहा झालाय्. ” डोक्यावरची उशी उडवीत त्याची बायको म्हणाली. तो दचकून उठला व तारवटलेल्या डोळ्यांनीं बायकोकडे बघूं लागला. पदर बांधलेला व ओचे वर घेतलेले. केसांच्या बटा मागं गुंतवून टाकलेल्या व स्वच्छ चेहऱ्यावर कुंकवाची टिकली टेकलेली. घरकामांत गर्क असलेली ती इवलीशी, सडपातळ व साधी आकृति पाहतांच त्याला कालच्या वर्तनाचा अधिकच विस्मय वाटला. लहानपणीं त्याला उठवणारी आई, चहा देणारी बहीण अशाच अवतारांत, घाईत भेटत असत. तशीच ही पत्नी. तिचा ब्लाऊजहि

काल्चाच होता. सर्व स्त्रिया वापरतात तसलाच—साधा, सामान्य! पण त्या ब्लाऊजचें काल तो कौतुक काय करीत होता, तिच्या केसांच्या वळणांकडे, चेहऱ्यावरच्या रेषांकडे पाहून वेडा काय होत होता! कुठल्या कळकट कोट्या करीत होता. कां करीत होता हें सारं ढोंग? कां, कशाला?

तोंड धुतांना त्याला आपल्या कालच्या वर्तनाची शिसारी आली. आरशांत आपला चेहरा पहातांच अधिकच शरमल्यासारखं झालं. ह्याच तोंडानें बावळटा-सारखीं खोटीं संभाषणं केलीं. ह्या डोळ्यांनीं केवळ वासनाच पाहिली. बायकोनें त्याला बशींत चहा ओतून दिला व ती आपुलकीनें कांहींसं म्हणाली. तिचा प्रेमळ-पणा पाहून त्याला कसंसंच झालं. कोट्या, विनोदी उत्तरं, आर्जवी विचारपूस कांहींच स्फुरेना. मुकाट्यानं चहा पिऊन तो बाहेरच्या खोलींत आला. कांपऱ्या बोटांनीं त्यानं मासिक चाळलं. तत्त्वज्ञानावर एक दीर्घ लेख आला होता. त्याच्या आवडत्या कवीच्या कविताहि छापून आल्या होत्या. काल रात्रीं निळसर प्रकाशाच्या शिडकाव्यांत काव्य वाचतांना केवढा स्वर्गीय आनंद लाभला असता. आतां कविता वाचायला टवटवी वाटत नव्हती आणि वेळहि नव्हता. फायली उघडून पहायलाहि सवड नव्हती. काल कागदपत्रं चाळलीं असतीं तर आज कचेरींतलं केवढं महत्त्वाचं काम निपटतां आलं असतं! अरेरे, आपण काव्याला मुकलों व कर्तव्यालाहि मुकलों. नुसते संसारांत, पलंगांत गुंतून गेलों. वासनेपायीं आयुष्य वायां दवडीत बसलों......

त्यानं हात चोळले, डोके चोळले, अस्वस्थपणं खोलींत फेऱ्या घातल्या. वैवाहिक संबंध त्याला नेहमींच पवित्र वाटत होते; त्यापासून लाभणारं सुख सदा स्वर्गीयच वाटत होतं. पण त्याला आजकाल वाटूं लागलं होतं कीं, ह्यांत फार वेळ जात आहे आपला. सारं सुंदर होतं, स्वर्गीय होतं खरं, पण तें नेहमींचंच झालं, नियमित येणारं झालं. आज तर ही भावना त्याला तीव्रतेनं ग्रासूं लागली. तोच तोच खेळ आपण उगाचच खेळत राहिलों. अन् तो डाव खेळला जावा म्हणून कपट करावं लागतं, खोट्या विनोदाचं नाटक करावं लागतं, शिळ्या स्वप्नांचा साज चढवावा लागतो. खरं म्हणजे ह्यांतली गंमत गेली नि संवय उरली. गंमत गेली नि संवय उरली.

त्या क्षणीं त्याला स्वतःची व स्वतःभोवतीं मांडलेल्या संसाराची इतकी शरम वाटली, शिसारी आली कीं कुठें तरी कायमचं निघून जावं असं तीव्रतेनें

वाटलं. निळा दिवा, शिळं मासिक, चुरगळलेली चादर, ओघळलेली मच्छरदाणी. उशीवरच्या विणलेल्या 'गोड सोबत' शब्दांवर अडकित्ता वार करून राहिलेला होताच. आणि आंतघरांतल्या आरशापुढें बायको उभी राहून त्या वेड लावणाऱ्या केसांच्या वळणांतून गुंतवळ काढीत होती. हें सारं पहातांच त्याला विरक्तीचा विलक्षण झटका आला. पण काय करावं, कळेना ! अखेर तो निघाला. दाढीचा साबण, अंगाचा साबण संपला होता तो आणायला बाहेर पडला.

शय्यागृहांतून, संसाराच्या खोड्यांतून बाहेर पडल्यावर त्याला बरं वाटलं. शेजारच्या नानांचा कुत्रा त्याच्या अंगावर उड्या मारीत आला व मग एकदम दुसऱ्या कुठल्या तरी कुत्र्यावर भुंकत गेला. त्याला गंमत वाटली; व पाहतां पाहतां तो गंभीर झाला. कुत्र्याची जात, एकूण सारीं जनावरंच त्याला आदरणीय वाटूं लागलीं. मानवासारखं सतत तिन्ही त्रिकाळ शारीरिक भुकेचं चक्र त्या चार पायांच्या प्राण्यांच्या मागं लागलेलं नव्हतं. मनुष्यजातच अकारण अन् अक्षयीं ह्या रहाट-गाडग्यांत गटांगळ्या खात होती. सोळा वर्षांपासून साठ वर्षांपर्यंत. तीनशें पासष्ट दिवस. साबण घ्यायला तो दुकानांत शिरला तरी हाच विचार त्याच्या मनांत वावरत होता. साबणाच्या जाहिरातीवरील उघड्या स्त्रियांचीं चित्रं पाहून तो अधिकच उन्मळून गेला. स्वच्छतेच्या, सौंदर्याच्या नांवाखालीं स्त्रीदेहाचें प्रदर्शन. स्त्रीसुखाचं आवाहन. अकस्मात् त्याच्या डोळ्यांपुढें अनेक उघडीं वाघडीं चित्रं चमकून गेलीं. जागजागीं लिहिलेल्या शिव्या व विकलं जाणारं तत्सम वाङ्मय आठवलं. विकृतीचा, वासनेचा केवढा बाजार, उकिरडा पसरला होता चौफेर. केवढी प्रचंड, अखंड, शक्ति मोकाट सुटलेली होती ! पुरुष जातीला हा भयंकर शापच मिळाला होता जणूं ! वासनेच्या विहिरींत पुरुष सदाचा डुंबत होता. आणि ह्या जाहिराती, हें वाङ्मय, चित्रं, चालत्या पुतळ्या त्यांत त्याला पूर्णपणें डुंबवीत होत्या. केवढा भयंकर डाव ! न थांबणारा, न संपणारा......पण तो मात्र आतां अलिप्त राहणार होता. पुन्हां या वाटेकडे वळणार नव्हता. त्याच त्या, सामान्य, क्षुद्र गोष्टींत सुख मानणार नव्हता. त्या मोहापासून मुक्त होणार होता.

तो घरीं परतला तेव्हां बायको बाहेरच्या खोलीची साफसुफी करीत होती. मच्छरदाणी माघारीं गेली होती व शुभ्र चादर पलंगावर पसरली होती. अडकित्ता उचलून ठेवला होता, सुपारीची रिकामी पुडी नाहींशी झाली होती. खोलीभर नजर

टाकतांच त्याला बरं वाटलं. एखाद्या कर्तृत्ववान् व्यासंगी पुरुषाची खोली शोभत होती ती. पदव्यांच्या तसबिरी, फायलींची चळत, जुने ग्रंथ व ताजें मासिक. पण ती पत्नी ! तिला पाहतांच तो बावरला. त्याला अपराध्यासारखं झालं. आठदहा तासांपूर्वीच दोघांनीं एकत्र येऊन कांहीं क्षण स्वर्गसुखांत व्यतीत केले होते. आणि आतां मात्र तो एकटा त्या क्षणांचा जमाखर्च मांडीत होता; त्या घटनेवर टीका करीत होता—ह्यांत तिचा अपमान तर नव्हता ? त्याचा क्षुद्रपणा तर प्रकट होत नव्हता ?—पण आतां कसलाच इलाज नव्हता. झालं तें झालं. आतां तो नव्या निश्चयानं आयुष्य घालविणार होता. तिची गोष्ट निराळी. तिच्यासारखं संसारसुख हें ध्येय त्याचं नव्हतं. अन् त्यांत पुन्हा पुन्हा रमणारा तो लंपट गृहस्थ नव्हता.

त्यानें कोरं पातं घेऊन दाढी केली. खूपसं कढत पाणी घेऊन, खूपसा साबणाचा फेस फासून मनसोक्त स्नान केलं. मलीन शरीर स्वच्छ झालं. मनाला झळाळी आली. वैराग्यानं, विरक्तीनं आलेलं औदासीन्य ओसरून गेलं. नव्या मनानें, नव्या निश्चयानें तो कामाला लागला. त्यानें फायली खोलल्या व झटकन् कागद चाळले. तेवढ्यांत एक महत्त्वाचा मुद्दा एका कागदावर आढळला. लाल पेन्सिलीनें त्यानें त्यांवर खूण केली. आपल्या तीक्ष्ण बुद्धीचा त्याला अभिमान वाटला. उगाच कागदपत्रांत डोकं घालून बसणारा तो कुणी साधा कारकून नव्हता. शास्त्रीय उपकरणांची विक्री करणाऱ्या कंपनीचा दुय्यम मॅनेजर होता !

घाईनं त्यानं चार घांस खाल्ले. त्याची बायको बडबडत होती आणि त्याच्या डोक्यांत नव्या हॉस्पिटलला उपकरणं कशीं पुरवायचीं ह्याचा विचार चालला होता. हातावर पाणी ओतून तो बाहेर आला व कपडे करूं लागला. पानदान घेऊन बायको लगोलग आली. त्यानें एक लवंग चघळली व थुंकून टाकली. सुपारीचा तोबरा भरीत बायको म्हणाली, " संध्याकाळीं शॉपिंगला जायचं ना आपण ? मला थोडं कापड घ्यायचं आहे ! "

त्या क्षणीं त्याला ब्रह्मांड आठवलं. काल रात्रीं तिला कापड आणून द्यायचं कबूल केलं होतं. काल रात्रीं विलक्षण लाचारपणा, गाढवपणा केला होता ! तो एकदम म्हणाला, " मला आज संध्याकाळीं कामाला जायचंय् ग ! तुला येईन म्हटलं होतं, पण—तूं असं कर, शेजारच्या कुसुमबरोबर......"

तो कसंबसं कांहींतरी बडबडला व त्यानं आरशांत चेहरा लपवीत टायची गांठ

ओढली. आपल्या वर्तनाचा त्याला खेद वाटला, पण लगेच त्यानें तोल सांवरला. संध्याकाळीं जायचं कबूल करायचं म्हणजे परत बायकोभोंवतीं गोंडा घोळायला सुरुवात करायची. तिच्याबरोबर मिरवत जायचं, तिचं लाडिक बोलणं ऐकत राहायचं, तिनं निवडलेल्या कापडाचें कौतुक करायचं. मग येतांना वेणी, अंधार पडला कीं हातांत हात... छट् ! त्यानं टरवलं कीं, आजपासून संध्याकाळीं ग्रंथालयांत जायचं. घरापासून दीड मैल चालावं लागलं तरी चालेल, पण तिथं जाऊन तत्त्वज्ञानाचं सगळं कपाट संपवींत बसायचं. नोकरीमुळं आपल्या आवडत्या विषयावरचीं पुस्तकं वाचायला वेळ होत नाहीं. खरं म्हणजे संसारामुळें, बायकोमुळें, वेळ होत नाहीं ! पण आतां रोज तास दोन तास तरी वाचन करायचं. क्लबांतदेखील जायचं नाहीं. तिथं गप्पा चालतात, अन् त्यामुळं मन अधिकच उत्तान होतं. मागच्या आठवड्यांत त्यानें विरक्ति येऊन, संसारसुखाचा वीट येऊन, असाच निश्चय केला होता. पण क्लबांत पत्त्यांच्या डावांत पैसे मिळाले. तेथल्या सिगरेटींनीं, चहाचिवड्यांनीं व गटारगप्पांनीं मन उत्तेजित झालं आणि घरीं येतांच त्याचा निर्धार कोसळून गेला... आतां असं करायचं नाहीं. कचेरींत खूप काम करायचं नि ग्रंथालयांत खूप वाचायचं. बस्स !

स्नान केल्यावर, टायची गांठ घट्ट बांधतांच व फायलींचा गठ्ठा खाकोटींत घेतांक्षणींच त्याचं मन काल्च्या वासनेपासून, भावनेपासून सुटलं व झोका घेत दुसऱ्या दिशेस झुकलं. तितक्याच आवेगानं, तितक्याच वेगानें ! बायको जेवतांना लाडांत बडबडत होती व तो 'क्ष' किरणांच्या यंत्राची किंमत आठवीत होता. तिनं पुढं केलेल्या पानदानांतून त्यानें केवळ लवंग उचलली. तिला म्हणाला, "मला संध्याकाळीं वेळ नाहीं!" आणि हें करतांना त्याची कानशिलापासची शीर स्पष्ट दिसूं लागली. किंचित् टक्कल खुलून दिसूं लागलं. त्या रुक्ष वागण्यावर, बोलण्यावर टायची गांठ घट्ट बसली. फायलींचा गठ्ठा घेतांच तो एखाद्या फर्मचा खराखुरा व्यवस्थापक वाटूं लागला. मग तो तिला दाराजवळ जवळ न घेतां, रस्त्यावरून रुमाल न दाखवितां, भारदस्तपणं बसकडे गेला.

कचेरींत कामाचे ढीग पडले होते. परदेशाहून नवे कॅटलॉग आले होते. प्रयोगशाळेंतून उपकरणांचे नवे नमुने आले होते. नव्या मागण्या, जुनीं बिलं—असंख्य प्रकारचा पत्रव्यवहार पसरला होता. तो एकसारखं काम करीत होता, पत्रं लिहीत

होता, फोनवरून बाजारभाव विचारीत होता, निरनिराळ्या एजंटांच्या भेटी घेऊन सौदे ठरवीत होता. काम, काम ! आज एक तप तो जी तपश्चर्या करीत होता तीच पुढं चालू झाली होती. त्या कष्टाळू स्वभावामुळेंच तो आज मोठ्या पदावर व मोठ्या पगारावर चढला होता. त्या कष्ट करण्याच्या, धडपड्या, उत्साही स्वभावामुळेंच त्याला आयुष्यांत एक प्रकारचा आनंद लाभत होता; त्यांतच तो आतां बुडून गेला होता. कर्तव्य केल्याचा आनंद, प्रगति झाल्याची तृप्ति !

संध्याकाळीं सहा वाजले तेव्हां तो कचेरींतून बाहेर पडला. मित्रांना टाळून व मोटर कधीं घ्यायला मिळेल ह्याचा विचार करीत घरीं गेला. घराला कुलूप होतं ! शेजारीं किल्ली ठेवून बायको बाजारहाट करायला गेली होती. तो दार उघडून आंत गेला व चहा करून प्यायला. बायको घरीं नसल्याचं त्याला विशेष जाणवलं नाहीं. खरं म्हणजे इतका वेळ त्याला बायकोची आठवणच उरली नव्हती. बायकोची उणीवच भासली नव्हती.

घराला परत कुलूप लावून तो बाहेर पडला. ग्रंथालयाकडे निघाला. ग्रंथालय चांगलं दीडएक मैल दूर होतं. शहर मागं टाकून, पूल ओलांडून जावं लागे, पण तो मोठ्या मजेंत चालला होता. शहराबाहेर येतांच सारं कसं शांत, मोकळं मोकळं होतं. आजुबाजूला पिकं डोलत होतीं व दूर डोंगर खडे होते. अशा निर्भर निसर्गाजवळ तो कित्येक दिवसांत आला नव्हता. उगाचच शहरांत, संसारांत कोंडून गेला होता. आतां तो रोज ह्या मोकळ्या वातावरणांत मनसोक्त भटकणार होता. आणि समोर तर ग्रंथालयाची इमारत. ओढ लागून तो आंत गेला. तत्त्वज्ञानाचीं पुस्तकं पाहूं लागला. नवनव्या लेखकांनीं निरनिराळ्या विषयांवर लिहिलेलीं कित्येक नवीं पुस्तकं आलेलीं होतीं. त्याला या पुस्तकांची दादहि नव्हती. त्यानें बरींचशीं पुस्तकं पाहिलीं, पालथीं घातलीं. मासिकं चाळलीं, वर्तमानपत्रं उलथलीं. दिवेलावणी झाल्यावर तो भरल्या मनानं घरीं परतला. बरोबर रात्रीं वाचायला एक पुस्तकहि त्यानें घेतलं होतं. इथलीं सर्व पुस्तकं तो एकामागून एक वाचून काढणार होता. आपल्या ज्ञानांत भर घालणार होता. आत्मोन्नति करणार होता.

बायको त्याच्यासाठीं जेवायची थांबली होती. त्यानें गप्पा मारीत जेवण उरकलं. बायकोशीं त्याचं भांडण नव्हतं. त्याचा वाद वासनेशीं होता. जेवल्यावर सुपारी चघळीत त्यानें कचेरींतून आणलेले कॅटलॉग चाळले. मग निळा दिवा लावून

ग्रंथालयांतून आणलेलं तत्त्वज्ञानावरचं पुस्तक वाचीत तो बसला. केवढा वेळचा तो त्या विषयांत गुंगून गेला होता. त्यानें पाहिलं तों अकरा वाजून गेले होते. बायको कामधाम आटोपून केव्हांच झोपीं गेली होती. पलंगावर पडलेल्या तिच्या आकृती-कडे त्यानं निरखून पाहिलं. तिच्या चेहऱ्यावर मंद स्मित तरळत होतं. डावा हात खालीं ओघळला होता व पदर बाजूला पडला होता. अंबाड्यांतलं फूल मात्र अजून तसंच होतं. टाकठीक व टवटवीत! तिच्या अस्ताव्यस्त आकृतीकडे त्यानें निर्विकारपणें पाहिलं. मग पाणी पिऊन, दिवा मालवून तो उरलेल्या अंथरुणांत आडवा झाला. तात्काळ गाढ झोपीं गेला.

सकाळीं तो लवकर जागा झाला. 'क्ष' किरणांच्या यंत्राचा सौदा, परदेशाहून माल मागविण्याचा परमिट्, बँकेचा ड्राफ्ट, संध्याकाळची सहल, नव्या पुस्तकाची मागणी—दिवसाच्या कार्यक्रमाची मोठी यादी त्याच्यापुढं उभी राहिली. आजची, उद्यांची, रोजची. पैशाची आणि प्रगतीची. शास्त्रीय उपकरणांचा व्यापारी व तत्त्व-ज्ञानाचा उपासक असा व्यासंगी पुरुष होता तो! तो खुलला. भरभर सकाळ संपवून कचेरीला गेला. दिवसभर श्रमून हॉस्पिटलला हजारों रुपयांचा माल त्यानं पुरवला. संध्याकाळीं उत्साहानं चालत गेला व पुस्तकांच्या कपाटांत डोकं घालून बसला. दुसऱ्या दिवशीं कचेरींत सूक्ष्मदर्शक यंत्रांचा सौदा त्यानें केला व संध्याकाळीं ग्रंथा-लयांत स्वतःच एक पुस्तक लिहायचा बेत तो करूं लागला. कचेरी व ग्रंथालय त्याचा दिवस व्यापूं लागलीं. रात्रीं भरपूर झोप, दुपारभर काम व संध्याकाळीं वाचन...

त्या दिवशीं संध्याकाळीं तो भारदस्तपणें ग्रंथालयाकडे चालत निघाला. कचेरींत त्यानें नेहमींसारखं खूप काम केलं होतं. टपालाची विल्हेवाट लावण्याची नवी व्यवस्था आखून दिली होती. टाइप करायचं टाकून सारा वेळ नखं रंगवीत बसणाऱ्या मिस् भरुचाला दंड केला होता. त्यामुळं कचेरींत शिस्त राहणार होती व त्याचा दराराहि वाढणार होता. घरीं बायकोशीं व तिच्याकडे आलेल्या तिच्या छोट्या भाचीशीं थोडा वेळ बोलून तो घराबाहेर पडला. तत्त्वज्ञानावरचं एक नवं मासिक आलं होतं तें पहायची त्याला विशेष उत्सुकता होती. झपाझप पावलं टाकीत तो बाजारांतून, पुलावरून पलीकडे आला व ग्रंथालयाच्या रस्त्याकडे जाण्यासाठीं चौक ओलांडूं लागला. चटकन् ग्रंथालयांत पोंचायचं व पुस्तक बदलून पंख्याखालीं बसायचं असं ठरवीत! त्यानं घड्याळ पाहिलं, टायची गांठ

सैल केली व फूटपाथ सोडला. परंतु त्याला थांबावं लागलं. समोरून एक उघडी घोडागाडी वेगानं येत होती. गाडी दौडत आली व वळसा घेऊन त्याच्याजवळून गेली. पुलावरून गेली व शहराच्या गजबजाटांत अदृश्य झाली. तो भानावर आला. गाडी गेली तरी आपण तसेंच भर रस्त्यावर अवघडून उभे आहोंत ह्याचा त्याला विस्मय वाटला. घाईनें त्यानें रस्ता ओलांडला. गाडी गेलेल्या दिशेकडे पुन्हा पुन्हा वळून पहात तो पुढें चालूं लागला.

पंचवीस-तीस पावलं गेल्यावर तो पुन्हा थबकला. आपण चालायचे थांबलों हेंहि त्याच्या लक्षांत बऱ्याच अवधीनें आलं. पण लक्षांत आलं तरी तो हलला नाहीं. आजुबाजूला पहात उभा राहिला. संध्याकाळ झाली होती नि कसा छान वारा सुटला होता. नवे, तुरळक बंगले सूर्यास्ताच्या झळाळीनें रंगले होते. खुद्द क्षितिजाच्या प्रांगणांत सूर्यास्ताचा रंगसडा शिंपडला जात होता. पिकांचे तुरे डोलत होते व थंडीचे गुच्छ अंगाला गुदगुल्या करीत होते. ही हवा व हीं दृश्यें दूर सारून पुस्तकांच्या कपाटांत कशाला कोंडायचं ? जरा वेळ असं उभं राहून हें सुख लुटणंच मौजेचं होतं !

तो तसाच बाजूच्या गुलमोहराच्या झाडाशीं उभा राहिला. भरलेल्या मनानें त्यानें जरा डोळे मिटले. डोळे मिटतांच त्याच्या ध्यानांत आलं कीं आपले पाय दुखूं लागले आहेत. डोळे उघडून तो हॉटेल शोधूं लागला. बाजूलाच इराण्याचं उपाहारगृह होतं. तिकडे तो गेला. रस्ता ओलांडतांना त्याला मघांचीच उघडी गाडी आठवली. आणि त्यांत बसलेल्या दोन पंजाबी तरुणी. त्यांच्या उभार आकृती. त्याच्या अगदीं जवळून फडफडत गेलेला त्यांचा सफेत दुपट्टा !

हॉटेलांतल्या कोपऱ्यांत बसून त्यानें कॉफी मागितली. कॉफीचे कढत घुटके घेत तो समोरच्या आरशांत पाहूं लागला. केस सारखे करीत त्यानें टकलाचा तुकडा लपवला, डोळे किलकिले केले व हनुवटीवरून हात फिरविला. तेवढ्यांत बाजूच्या खास खोलींतून एक जोडपं बाहेर पडलं. त्यांतल्या तरुणीनें कसला तरी मादक सेंट चोपडला होता. त्याचा वास त्याच्या नाकांत घुसला. डोक्यांत घुमला. हॉटेलांतले दिवे आधीं लागले होतेच. थोड्या वेळानं वरची झगझगीत निऑन साइनहि नाचूं लागली. त्या उजेडानं तो दचकला, विलक्षण अस्वस्थ झाला. बिल चुकतं करून बाहेर आला.

आतां ग्रंथालयांत जाण्यांत अर्थ नव्हता. अंधार वाढत होता व दिवे पेटत होते. खरं म्हणजे फार उशीर नव्हता झाला; निदान पुस्तक बदलून लगेच परततां येणं

शक्य होतं. पण घरची ओढ आवरतां येत नव्हती. तसंच उभं राहून त्यानें सिगरेट शिलगावली, दोन झुरके मारून फेकून दिली. त्याला काय करावं, कुठं जावं, कळेना! तसाच तो वेड्यासारखा उभा राहिला.

हळुहळू त्याला हृदयांतल्या खळबळीचा अंदाज आला, अन् तो भयंकर दचकला! आज साऱ्या दिवसांत, गेल्या दोन दिवसांत त्याच्या मनांत कुठलाहि वेडा विचार उद्भवला नव्हता. दोन दिवस तो केवळ हजारों रुपयांचा व्यवहार करीत होता व तत्त्वज्ञानाचीं पानं पालथीं घालीत होता. कुठलंहि उत्तेजित वाङ्मय, चित्र त्यानं पाहिलं नव्हतं. आदल्या आठवड्यांत क्लबांत पत्ते कुटून व गप्पा झोडून तो वहावला होता, तशीहि सबब आज नव्हती. उलट कचेरींत कामचुकारपणा केल्याबद्दल मिस् भरुचाला त्यानें ताणलं होतं. मग आत्तांच कां असं घडावं, असं वाटावं?

स्वतःच्या उलटतपासणीऐवजीं त्याला भरुचाचा चेहराच फक्त आठवूं लागला. भोळ्याभाबड्या गोंडस मुलीला तो उगाचच बोलला होता. अठरा वर्षांची तरुणी नखांना रंग लावील नाहीं तर काय करील?—त्याला स्वतःचाच राग आला. पण मग वाटूं लागलं कीं, तिच्यावर आपण चिडलों म्हणून तर आपली वासना उसळून येत नाहीं?—त्याला पुन्हा स्वतःचा राग आला. तसाच फुरंगटून तो निघाला. ग्रंथालयांत जाऊन पुस्तक बदलायचं व नवं मासिक घ्यायचं! परवांच केलेला निश्चय टिकत नाहीं म्हणजे काय? सारे दोन दिवस तर झाले होते. इतका लंपटपणा करून कसं चालेल? तो सामान्य, सुखलोलुप इसम थोडाच होता?

तेवढ्यांत समोरच्या बंगलींतला रेडियो गाऊं लागला. बांसरीचे, फिड्लचे, अनेक वाद्यांचे आवाज एकत्र होऊन उठले व त्या भरघोस मिश्रणांतून कुणा गायिकेचा गोड गळा फिरूं लागला. तें सुमधुर संगीत ऐकतांच त्याच्या अंगावर रोमांच उठले. अनेक सूर त्याच्याभोंवतीं फिरूं लागले. अनेक दुपट्टे त्याच्यापुढं फडफडूं लागले. तो पुढं निघालेला थबकला, वळला. घरच्या रस्त्यानं धावूं लागला. वाटेंत एक गाडी करून त्यांत बसला. वेगानें त्याला घरीं जायला मिळालं खरं; पण वेगानें धावणाऱ्या गाडीमुळें त्याचे विकारहि वाढले.

विरक्तीनं दूर गेलेलं त्याचं मन समाधींतून हललं, उठलं. सुरावरून, वाऱ्यावरून, दुपट्ट्यावरून, दिव्यावरून वहात गेलं. टायची गांठ सैल करतांना, सूर्यास्ताचं रंगमिश्रण पाहतांच, उग्र सेंटचा वास नाकांत जातांक्षणींच त्याचे विचार झुलूं

लागले, झेप घेऊं लागले. आसक्तीनें, ओढीनें. थोड्याशा थंडीनेंहि तो भारावला; व बाजारी संगीतानें विद्ध झाला. एखाद्या नुकत्याच विवाह झालेल्या, नुकत्याच प्रेमांत पडलेल्या अधिऱ्या तरुणासारखा तो आपल्या संसाराकडे, स्त्रीकडे धाव घेऊं लागला!

दाराची घंटा दाबतांच त्याचं मन घणघणून गेलं. बांगड्यांचे, कुजबुजींचे, चुंबनांचे—स्मृतींतले अनेक संमिश्र स्वर त्याच्या हृदयांत निनादले. रेडियोंतली रेकॉर्ड परत कानांत वाजूं लागली. थंडीनें काकडून तो घरांत घुसायला धडपडूं लागला. गड्यानें दार उघडलेलं पाहून त्याचा विरस झाला. 'बाई कुठायत?' तो विचारणार होता, पण तसाच तो आंतघरांत गेला. कपाटाआड ती उभी होती. पाठमोरी!

त्याला भूक नव्हती, पण तिला बरं वाटावं म्हणून त्यानें चार घास खाल्ले. जेवण्यापेक्षां बडबडणंच अधिक चालू होतं. सगळ्या वायफळ गप्पा, फुटकळ विनोद. अन् तिनं आणलेल्या कापडाची स्तुति. किती सुंदर कापड होतं तें! तिलाच शोभेल असं. तिच्या कपाळावर खेळणाऱ्या बटांमुळें कुठलहि कापड तिला खुलून दिसलं असतं. सगळी स्तुति, गप्पा, कोट्या संपल्या तरी ती संथपणें जेवत होती. तो कंटाळला व बाहेरच्या खोलींत आला.

बाहेर अस्पष्ट अंधार होता. पानदान सांपडत नव्हतं नि टेबलावर टाकलेलं पुस्तक एकसारखं दिमत होतं. त्याला वेड्यासारखं झालं. पुन्हा तो...आपल्या वर्तनाची, विचाराची त्याला क्षणमात्र शरम वाटली. क्षणमात्रच! मग लगेच तो विकारानें, वासनेनें भारून गेला. आतां परत फिरणं नव्हतं. आतां दुसरं दिसत नव्हतं. एकच हवं होतं. हवंच होतं! अधीरतेनें त्यानें निळा दिवा लावला व पुस्तक वरच्या फळीवर फेकलं. कसला व्यासंग नि कसलं वाचन? दिवसभर कष्ट करून व विचित्र यंत्र विकून काय फायदा? कचेरी, क्लब, ग्रंथालय—सारं वरवरचं आहे. वैवाहिक जीवन हेंच काय तें एक सत्य आहे. शारीरिक सौख्य हाच खरा विसांवा आहे. तें सौख्य वारंवार लाभतं हेंच मानवाला मोठं वरदान आहे. त्याचाच तो पुन्हा पुन्हा उपभोग घेणार होता. प्रौढपणाचं सोंग करून संसारसुखापासून, स्वस्त्रीपासून दूर पळणार नव्हता.

त्यानं हातांतला अडकित्ता दूर टाकला व पलंगाशीं ताटकळत तो उभा राहिला. त्याला आतां टायपिस्टचीं नखं, दुपट्ट्याचं टोक, रेंगाळणारा सेंट, नाचणारी निऑन

साइन—कांहींच, कोणीच आठवेना. फक्त पत्नीची प्रतिमा दिसत राहिली. किती युगांत तो तिला भेटला नव्हता ! तिच्या आगमनासाठीं तो अति आतुर झाला. ती कशी येईल, कशी दिसेल, तिच्याशीं कुठली कोटी करायची, कुठला विनोद करायचा...पाहतां पाहतां तो पेटून निघाला. त्याचा मेंदू, हृदय, शरिराच्या साऱ्या पेशी व रक्ताचा प्रत्येक थेंब एकाच भावनेनें व्यापून गेला. त्या तृप्तीसाठीं तो पराकोटीचा व्याकुळ झाला.

* * *

# प्रतिभा प्रधान ६

**प्रस्ताव :**

मुंबईहून सकाळीं सुटलेली जनता गाडी पुणें स्टेशनवर अकराचे सुमारास आली. उतरणाऱ्या अनेक प्रवाशांत एक तरुण मुलगी होती. सांवळीशी व सड-पातळ. अपऱ्या नाकाची, पण तीक्ष्ण नजरेची. तिनें बराच नखरा केला होता; पण हातांतली जुनाट थैली तिची ऐट टरूं देत नव्हती. ती स्टेशनबाहेर आली व इकडे-तिकडे बघत अखेर एका टांगेवाल्याकडे गेली.

"चला बाई, सेवासदनालाच जायचंय् ना ?"

"नाहीं. मला फिल्म स्टुडियोंत..."

"स्टुडियो ? म्हंजी 'परभात', कीं 'डेक्कन', कीं हा जवळचा, नवा निघालेला 'सुंदर स्टुडियो' ?"

"जवळचा ? मग तिकडेच चल. काय घेशील ?"

पुणेरी टांगेवाल्याशीं घासाघीस न करतां ती टांग्यांत बसली. त्या नव्या कंपनींतच नशिबाला कौल लावायचं तिनें ठरवलं. थैली जवळ घेतली. रुमालानं तोंड टिपलं. दुतर्फा निरखून पाहात ती 'सुंदर स्टुडियों'त शिरली. स्टुडियोच्या गुरख्यापासून मालकाच्या हुजऱ्यापर्यंत धापा टाकीत, धीर धरीत गेली.

'प्रतिभा प्रधान. नुकतीच बी. ए. झालेली. मुंबईत राहणारी!' मालक खुलला. तिची मुलाखत लांबवावी अशी लालसा त्याला निर्माण झाली. एक्स्ट्रॉ मुली, नट्या नि नायकिणी नेहमींच्याच होत्या. पण ही ग्रॅज्युएट गर्ल! मात्र मालकाला अवधि मिळाला नाहीं. कंपनीची हिरॉइन् तेवढ्यांत तिथं आली व मालकाला नेऊं लागली.

मालकानें मग पाहुण्या बाईंची बोळवण दिग्दर्शकाकडे केली. मित्रांसमवेत सेट्वर सिग्रेटी फुंकत बसलेला दिग्दर्शक, त्या कोवळ्या व वेंधळ्या मुलीला पाहून विचारांत पडला. कॉलेजमध्यें काढलेले कांहीं दिवस त्याला आठवले व वाटले...पण मित्रांच्या अड्ड्यांतून त्याला उठतां येईना. त्यानें सहदिग्दर्शकाकडे बोट दाखवलं. सहदिग्दर्शक छोकरा तिला घेऊन बाजूच्या कागदी बागेंत गेला. त्यानें तिला तात्पुरतीं आश्वासनं दिलीं. पुन्हा भेट घेण्याचें पक्कं केलं व वेळ नव्हता म्हणून तिला मॅनेजरच्या स्वाधीन केलं. मॅनेजरला नवं पांखरूं, नवा खेळ मिळाल्यासारखं झालं. कंपनीच्या मोठ्या गाडींतून तो तिला घेऊन हिंडला. थिएटरवरून, बँकेसमोरून, मालकाच्या बंगल्या-पुढून त्यानें तिला फिरवून आणलं व स्वतःचं महत्त्व पटवलं. पण पुढचं कांहीं जमेना. ती संथ, सामान्य, तशीच मानी व मितभाषिणी मुलगी त्याला नकोशी झाली. कंटाळून त्यानं तिला अखेर कथालेखकाच्या घरीं आणलं. लेखकमजकुरांना एका बाजूला घेऊन तो म्हणाला,

"मंगळवेढेकरसाहेब, एक पाहुणी आणली आहे. नेहमीं आमची टिंगल करतां नि म्हणतां, 'आम्हाला चान्स द्या' म्हणून! घ्या आतां. तुमच्यापैकींच आहे ती—"

"आमच्यापैकीं? मी नाहीं समजलों."

"सबूर. तुमची ओळखच देतों करून."

मॅनेजर तिला घेऊन आंत आला. कथालेखकाला खुणवीत व प्रतिभा प्रधानला चुचकारीत त्यानं एकमेकांची ओळख करून दिली. अन् मित्रकार्य केल्याचा आव आणीत तो तिथून सटकला.

**प्रतिभा :**

प्रतिभा प्रधान घरीं आली तेव्हां संध्याकाळ संपून गेली होती अन् मी अगदीं दमून गेलों होतों. एका निर्बुद्ध निर्मात्याला पटकथेंतल्या अनेक आकर्षक अन् नावीन्यपूर्ण जागा समजावून सांगून माझी जीभ जडावून गेली होती; व त्याच्या-जवळ चाळे करीत बसलेल्या चित्रचंद्रिकेकडे दुर्लक्ष करण्याचा आव आणून डोळे दुखूं लागले होते. चरितार्थासाठीं चित्रपटलेखनाचा व्याप करावा लागतो ह्याबद्दल दैवाला दोष देत मी बिऱ्हाडीं परतलों आणि हें सहावारींतलं सांवळं संकट पुढें टाकलं! ह्या कुरूप, कळकट पोरट्या कशाला सिनेमाच्या झगझगाटाला मोहतात,

तें कळेना मला. मॅनेजरच्या मूर्खपणामुळें मला नाइलाजानं तिला घरांत घ्यावं लागलं, आणि मॅनेजर शूटिंगची सबब सांगून निघून गेल्यामुळें तिच्याशीं बोलत बसावं लागलं.

सिगरेटचा रिकामा डबा खेळवीत मीं म्हटलं, "तुम्ही माझ्याकडे कशाला आलांत? मी कुठल्याहि कंपनीचा चालक नाहीं. मॅनेजर अगर दिग्दर्शकच तुम्हाला उपयोगीं पडतील. मी काय मदत करणार?"

"तुम्हीच मला मदत करूं शकाल" हातांतल्या थैलीशीं चाळा करीत ती म्हणाली. मीं बोलतांना तिच्या कपाळाला आठ्या पडल्या होत्या. पण उत्तर देतांना उलट ती आपलेपणानं अन् आत्मविश्वासानं पाहात राहिली.

माझं आश्चर्य ओसरण्याच्या आधींच ती पुढें म्हणाली, "तुम्ही मातबर लेखक आहांत. मीं सिनेमासाठीं कथा लिहिली आहे."

माझं आश्चर्य आतां निराळ्या अर्थानं वाढत गेलं. मुली चित्रपटकथेच्या छंदांत पडत नाहींत असं नाहीं. आणि तशा मुली बहुधा कुरूपच असतात. पण ही...ही... तिच्याकडे पाहातच राहिलों. थैलींतून तिनें कागद काढले. शाळेच्या आटवड्याच्या परीक्षेच्या उत्तरपत्रिका असतात तसे कागद. ते पुढें करीत ती म्हणाली,

"ह्या पहा. तीन कथा आहेत. एक सामाजिक, एक पौराणिक नि एक ऐतिहासिक."

मला हसावं कीं रडावं, कळेना. हात मागें घेत मीं म्हटलं, "मला कशाला दाखवतां?"

-ती पुढें सरकली. वेंधळेपणानं उद्गारली, "ऑं?"

"म्हटलं, मी कांहीं प्रोड्यूसर नाहीं. मला हें दाखवून काय फायदा?"

निराशेची एक छटा तिच्या चेहऱ्यावर तरळून गेली. पण तिनें घसा साफ केला व अधीरतेनं म्हटलं,

"तुम्ही हें वाचून पाहाल काय? सुधारणा सुचवाल काय?—खूप मेहनत करून मीं लिहून काढलं आहे. हें खपेल का कुणाकडे?—खपलं जावं असं सारं ह्यांत आहे."

मी कांहीं बोलणार होतों, तेवढ्यांत ती ऐकायला म्हणून आणखी जवळ आली.

माझ्याकडे आशाळभूतपणें पाहात राहिली. मीं कसंबसं म्हटलं, "ठीक आहे. मी वाचीन नि मॅनेजरबरोबर परवां पाठवून देईन कागद. तुम्ही नका तसदी—"

"तसदी कसली ?..."

"नको, मी पोंचवीन कागद." मी उठलों नि तिलाहि उठावं लागलं. दाराशीं येतांच तिनें नमस्कार केला. मला वाटलं, जाण्यापूर्वी ती एखादा सूचक शब्द वा कटाक्ष टाकील. पण तिच्या कोरड्या नमस्कारांत केवळ शालीनताच होती. मलाच माझ्या तुटकपणाची शरम वाटली. मूर्ख मुलगी असली तरी ती मदतीच्या आशेनं माझ्याकडे आली होती, आणि मी तिला भिक्षेकऱ्यासारखी हुसकावीत होतों. मीं तिला म्हटलं,

"पुण्यांत कुठं उतरलां आहांत ?"

"उतरलें कुठेंच नाहीं. आजच मुंबईहून आलें. माझ्या मैत्रिणीची एक मैत्रीण राहते इथं कसबा पेठेंत. तिकडे जातें—"

मला तिची आणिक कणव आली. "एकट्या कुठें शोधत हिंडणार? रात्रहि खूप झाली आहे. मी येऊं का सोबत ?"

"सोबत ?—" ती शुष्क हसली. "सोबत काय करायची आहे ? अन् आपल्याला कां तसदी ! दिली आहे तसदी तेवढी खूप झाली. खरंच, माझं लिखाण खपवाल का कुठं ?"

मी पुन्हा अस्वस्थ झालों. तिचा निरोप घेतला. जेवण करून झोपण्याचं ठरवलं. झोपेची अति आवश्यकता होती. प्रधान पोरीचे कथानकाचे कागद हातीं धरतांच मला तत्काळ झोप आली...

पलंगाखालीं पडलेले ते कागद नंतर तिथें तसेच धूळ खात राहिले. पुढें मला त्यांचं स्मरणहि राहिलं नाहीं. ते मॅनेजरला परत द्यायचीहि आठवण राहिली नाहीं. अन् ती वेडी मुलगी परत धरणं धरील ह्याचीहि शुद्ध राहिली नाहीं ...

चारपांच दिवसांनीं अगदीं सकाळींच ती घरीं आली. मला जवळजवळ झोपेंतूनच उठावं लागलं. अन् ते कागद पलंगाखालीं पडलेले होते. तिला काय अभिप्राय द्यावा ह्याचा विचार करीत मीं तोंड धुतलं. चहाचे पेले घेऊन खोलींत आलों.

पलंगाखालीं पसरलेले कागद गोळा करून ती ते क्रमांकवार लावीत होती !

मला शरमल्यासारखं झालं. तिच्या गोष्टींची ठरवल्यापेक्षां जरा जास्त स्तुति करणं आतां भाग होतं. आणि चहा पाजून लवकर बोळवणं करणंहि ! मी कप पुढें करीत म्हटलं, "वाचल्या तुमच्या गोष्टी—"

"अँ ? चहा ना ? चहा घेत नाहीं मी." तिनें कप हातीं घेतला नि बाजूच्या तिपाईवर ठेवला.

"लेखिका, त्यांतून मुंबईची, नि चहा घेत नाहीं ?"

"तशी मी मुंबईची नाहीं, नि लेखिकाहि नाहीं.—पण कसं वाटलं लिखाण ? खरं सांगा हं ! खपेल का ? निदान एक कथा तरी ?"

मीं चहाचा कप तोंडाला लावला. ती अति आतुर मुद्रेनें माझ्याकडे पाहात राहिली. निकाल ऐकणाऱ्या परीक्षेंतल्या उमेदवाराची आकुलता तिच्या खोल पण खंबीर नेत्रांत दाटली होती. आणि तिच्या आवाजांत कमालीचा कंप भरला होता. माझ्या एका चित्रकथेंतल्या नायिकेनं एका ठिकाणीं असाच संवाद म्हणून भावना हेलावल्या होत्या. मी कढत घुटके घेत होतों व ती तशीच अचल नेत्रांनीं पाहात होती. पाहतां पाहतां मला तिची दया आली. होतकरू, धडपडणाऱ्या लेखकांचा एक तांडा मनश्चक्षूंपुढून गेला. भोळ्याभाबड्या व गरजू मुलींचा एक घोळका डोक्यांत घोळ घालूं लागला. ह्या मुलीला बेगडी उत्तेजन द्यावं कीं कठोर वस्तुस्थिति सांगावी, हें समजेना मला ! वस्तुस्थिति सांगावी तर हिचा विरस होईल; खोटं उत्तेजन द्यावं तर ही वाहावत जाईल...माझा चहाचा कप भरभर रिकामा होत होता आणि तिचे डोळे मात्र मोठेमोठे होत होते.

कप खालीं ठेवून रुमालांत तोंड लपवीत मीं म्हटलं, "आणिक काय काय लेखन करतां आपण ?"

"तसं कांहीं नाहीं. हाच पहिला प्रयत्न. पण—पण आतां लिहिणार आहे. लघुकथा, रहस्यकथा..."

एकदम चित्रकथेवर उडी घेणारी ही होतकरू लेखिका पाहून मला हसूं आवरणं कठिण झालं. चित्रकथेशीं चुंबाचुंबी करणारे कलमदार काव्याच्या, कथेच्या मांडवाखालून गेलेले असतात. पण ह्या पोरीचं सारंच न्यारं होतं. माझं मिष्किल हास्य तिला जणूं उमगलं व ती मोठ्यानं म्हणाली,

"काल दिग्दर्शक म्हणत होते, कीं ऐतिहासिक कथेची कल्पना फार छान आहे."

" दिग्दर्शक ? " मीं दचकून म्हटलं.

" हो, वेळ मोकळा होता. भेटलें मी त्यांना. वानवडीला गेलों होतों आम्ही. "

मी चकित झालों, चाट पडलों. दिग्दर्शकानें स्वतःच्या मोटारींतून तिला नेलं, तासभर कथानक ऐकून घेतलं, फेरफार सुचवले व पुढील महिन्यांत पिक्चरचं काम सुरू करायचं कबूल केलं, इत्यादि इतिहास ती सांगत होती. आणि ह्या मुलीचं काय होणार ह्या विचारांत मी गुरफटलों होतों. ज्या दिग्दर्शकाचं चालू चित्रच अपुरं राहण्याचं चिन्ह दिसत होतं, ज्याची स्वतःची सायकलसुद्धां नव्हती आणि जो...मला तरी लक्षणं ठीक दिसेनात. मला मॅनेजरची त्या दिवशींची मुद्रा आठवली, शब्द आठवले व त्यांचा अर्थ पुरा उमगला. ह्या मूर्ख मुलीला बनवायचा त्यांचा बेत पाहून राग आला. ' एक्स्ट्रॉ 'त काम करणाऱ्या पोरी प्रत्यहीं बनतातच, पण कथालेखिका म्हणून आलेली ही मुलगी अशी फसवली जाऊं नये असं मला वाटलं.

"—अन् आज सहदिग्दर्शकांनीं बोलावलं आहे. " तिनें समारोप केला. कोनाड्यांतल्या पालथ्या ठेवलेल्या घड्याळाकडे टक लावून पाहणारी तिची नजर माझ्याकडे वळली. मी बोलणार हें बघतांच ती पुढें वांकली.

" दिग्दर्शक तुमची गोष्ट घेणार म्हणतां तर मग प्रश्नच मिटला ! मग माझ्याकडे—"

" तसं नाहीं. पण मला तुमचा सल्ला हवा आहे. पटकथा कशी लिहायची, पैसे कसे कसे घ्यायचे...मीं ऐकलं कीं लोक पैसे बुडवतात. किती मिळतात हो पैसे ? दोन हजार रुपये तरी ? "

मीं तिला मध्येंच थांबवलं. ह्या मुलीला सूर्यप्रकाश दाखवणं इष्ट होतं. कठोरपणें मीं म्हटलं, " हें पाहा, तुम्ही माझा सल्ला विचारतां आहांत म्हणून सांगतों. राग येऊं देऊं नका, पण तुम्ही चित्रपटकथेच्या नादीं लागूं नका. तें तुम्हाला जमणार नाहीं. तुमचा वेळ फुकट जाईल, अन् कवडीहि मिळणार नाहीं. "

नेहमींप्रमाणें कपाळाला आठ्या घालून ती ऐकत होती. अन् हळूहळू तिच्या चेहऱ्यावर निराशेची रेषाहि उमटत होती. धीर धरीत ती म्हणाली,

" कां—कां नाहीं जमणार मला ? अन् कां नाहीं पैसे मिळणार ? "

" ती एक गुंतागुंतीची गोष्ट आहे. ह्या धंद्यांत सिनेमास्टोरी लिहिणं नि खपवणं

ही एक अद्‌भुत किमया आहे. इथले इन मिन तीन लेखक तुमचं काम होऊं देणार नाहींत. जे लोक तुम्हाला भेटले आहेत त्यांच्यापाशीं दानत नाहीं, नि द्रव्यहि नाहीं."

"पण मला तर त्यांनीं—"

"अहो, त्याच दिग्दर्शकानं पुढच्या पिक्चरचा माझ्याशींहि करार केलेला आहे. हें पाहा. तुमची कथा खरोखरच खपत असेल तर आनंद आहे. पण तुम्हाला वाटतं तितकं इथलं जग सुधं नाहीं !...आणिक इतर अनेक गोष्टी उघड सांगायला हव्यात काय ?—"

मी थांबलों व तिच्याकडे पाहात राहिलों. तिनें नजर वळविली व हातांतल्या पर्सकडे, पायांतल्या चपलांकडे फिरविली. ती निरुत्साही झाली, निराश झाली हें तर स्पष्टच होतं. पण आतां ती अधिक सावध, सुरक्षित राहील ह्या भावनेनें मी फुलून गेलों. हिच्या डोक्यांतलं हें वेड आतां जाईल नि...

तेवढ्यांत ती उठली आणि म्हणाली,

"थँक्स्. मी जातें तर !"

"तुम्हाला राग आला असेल—"

"काय—काय ?"

मीं उभें राहात परत म्हटलं, "तुम्हाला राग आला असेल. वाटलं असेल कीं तुमची कथा खपूं नये अशी कारवाई मी—"

"छेः छेः !" ती स्पष्टपणें म्हणाली, "तुम्ही तसे नाहींत हें मला पटलं आहे. ह्या तीनचार दिवसांत इतकं स्पष्ट, सरळ नि मोजकं तुम्हीच बोललां आहांत माझ्याशीं. म्हणून तुमचे आभार मानतें. पण—पण मी अजून प्रयत्न करणार आहें. अन् मला आशा आहे."—दारांत परत वळून ती म्हणाली, "अहो, तीनचार हजार रुपये मिळायची संधि अशी कशी सोडायची एकदम ?"

प्रतिभा गेली. ती दिसेनाशी होईपर्यंत मी दाराच्या चौकटींत उभा होतों. झपझप जाणारी तिची लहानखोर आकृति कितीतरी वेळ नजरेपुढून जाईना. तिनें नाहीं म्हटलं, पण ती रागावली असणार ह्यांत काय संशय ? चित्रकथा-लेखिका व्हायच्या तिच्या स्वप्नांना मीं तडा लावला होता, कुठलंहि दाक्षिण्य न दर्शवितां

तिचा हिरमोड केला होता. आतां ही घरीं परतेल नि अभ्यास करतांना, स्वैंपाक करतांना व पुढें संसारांत नि पोराबाळांत वावरतांना जेव्हां आठवण होईल तेव्हां माझ्या नांवानं बोटं मोडील. तसं घडलं तरी चिंता नाहीं, परंतु ही हट्टानें जर त्या दिग्दर्शकाच्या नादीं लागली तर तिला पैसा मिळणार नाहीं, कीर्ति फार वेगळ्या तऱ्हेनें मिळेल, आणि माझे शब्द आठवून पोळत राहावं लागेल. मीं तिनें न घेतलेला थंड चहा ओतून टाकला. पालथं घड्याळ उभं केलं व लेखणी घेऊन बसलों. प्रतिभा प्रधानचा पुन्हा पुन्हा आठवणारा चेहरा दूर सारीत कामास लागलों. मात्र मनांत सारखं वाटत होतं कीं, कधीं काळीं ती परत भेटावी अन् तिनं म्हणावं...

सुमारें पंधरावीस दिवसांनीं कँप भागांत प्रतिभा प्रधान मला परत अचानक दिसली. बसच्या रांगेंत ती उभी होती. तशीच थैली घेतलेली, विटकं पातळ नेसलेली, केसांचे फुगे काढलेली, कपाळावर आठ्या रेखलेली नि खोल डोळे कुठें तरी रोखून उभी असलेली. ती दृष्टीस पडतांच मी दचकलों. माझा सल्ला न ऐकतांच ही मूर्ख मुलगी अजून पुण्यांत आहे तर !—म्हणजेच 'सुंदर स्टुडियों' तल्या शिकाऱ्यांच्या तावडींत आहे तर !...मला वाईट वाटलं. चीडहि आली. तिला तसंच टाळून मी निघून जाणार होतों. पण तिचा तो किंचित् उदास, किंचित् कठोर चेहरा पाहतांच पाय थबकले. मला काय वाटलं कुणास ठाऊक, मी मुद्दामच बसच्या रांगेपुढून रेंगाळत गेलों.

तिनें मला पाहिलं व अभिवादन केलं. "अजून पुण्यांतच ?—" मीं म्हटलं. पण तिला ऐकूं आलं नाहीं. मीं पुन्हा प्रश्न केला. पण उत्तर देण्याऐवजीं रांग सोडून ती बाहेर आली. आम्ही दोघं फूटपाथवरून चालूं लागलों.

"अजून पुण्यांतच ? काय स्टोरी खपली वाटतं ?"

आतां तिला नीट ऐकूं आलं. तिचा चेहरा खर्रकन् उतरला. कशीबशी ती हसली व म्हणाली, "स्टोरी खपली नाहीं. तुम्ही म्हणालांत तेंच खरं होतं. ह्या लोकांनीं मला नुसतंच झुलवलं. स्टोरी कुणालाच नको होती. नुसतं...जाऊं दे, तुम्ही म्हणालांत तेव्हां मला पटलं नव्हतं असं नाहीं. पण प्रयत्नांची शिकस्त करणं जरूर होतं. नव्हे, तेवढाच एक मार्ग होता. वाटे, न जाणों, खपली कथा नि मिळाले दोनतीन हजार—"

वा ! ही बाई तर मोठी व्यवहारी होती. केवळ कलावंताचं वागणं नव्हतं तिचं.

दर खेपेला पैशाचा उल्लेख ती न चुकतां करी ! मला तें आवडलं. तिच्याशीं गप्पा माराव्यात असं वाटूं लागलं. सिनेमाच्या मोहांतून ही सुटली ! आणि आतां ही पुन्हा भेटायचीहि नाहीं. मीं म्हटलं,

"चला आपण आइस्क्रीम घेऊं."

'काफे स्माइल' मध्यें एका कोपऱ्यांत आम्ही बसलों. आइस्क्रीमची ऑर्डर देऊन मीं कांहीं तरी बोलायचं म्हणून म्हटलं,

"तुम्ही लिहिण्याचा छंद मात्र सोडूं नका. लघुकथा—"

"लिहिण्याचा छंद मला मुळींच नव्हता. सांगितलं ना, तें कागद भरकटले, तोच माझा पहिला अपराध म्हणून."

ती हसली. रिकाम्या खुर्चीत पर्स टाकून तिनें आइस्क्रीमचा पेला पुढ्यांत घेतला. मी नुसता पाहात राहिलों. हिला लेखनाची आवड नाहीं, मग आहे तरी काय ? मीं विचारलं,

"मग या नादांत कां पडलांत ? प्रसिद्धि ? कीं ह्या मोहसृष्टीची भूल ?"

"कसली भूल नि कसली प्रसिद्धि हो ! मला पैसे पाहिजेत. पांचएक हजार रुपये तांतडीनं हवे आहेत. साधी बी. ए. मी. शिकवण्या करून जेमतेम पोट भरतें. कुणी नात्यागोत्याचंहि फारसं नाहीं. एवढी रक्कम कुठून आणूं ? कुणी म्हणालं, सिनेमा-कथेला भरमसाट पैसे मिळतात. म्हटलं, पहावं.—नाथमाधव, हार्डी नि वाल्मीकि लायब्ररींतून आणले. नि हे कागद खरडून काढले."

ती परत हसली. मी हसलों नाहीं. हसण्यासारखं होतं तरी हसलों नाहीं. हळूहळू मला त्यांत हसण्यासारखं कांहीं दिसेना. दारिद्र्यानं दबलेली ही अठरावीस वर्षांची लुकडी मुलगी पुण्यांत चित्रपटकथा विकण्यासाठीं धडपडते, हें फार वेगळं वाटलं. विचार करण्यासारखं वाटलं. कौतुकास्पद वाटलं, करुणास्पदहि वाटलं.

विरघळणारं आइस्क्रीम निरखीत मीं म्हटलं, "पण तुम्ही एकट्या राहतां ना ? मग कशाला हवेत पैसे ?—वडिलांचं कर्ज ?—"

"कर्जबिर्ज कांहीं नाहीं. तशी मी सुखी आहें."

"मग ?"

प्रतिभा प्रधान न बोलतां नुसती आइस्क्रीम खात राहिली. मी अधीरतेनें

तिच्याकडे पाहात राहिलों. तिच्या वागण्यामागचं, तळमळीमागचं कारण उमगून घ्यायला उतावीळ झालों. केवढं गूढ माझ्या समोर होतं. सिनेमासृष्टींत नाना नमुने पाहणाऱ्याला व स्वतःला कथालेखक म्हणवणाऱ्यालादेखील ही एवढीशी मुलगी स्तिमित करीत होती!

मध्येंच खाणं थांबवून तिनें तळहातांतल्या रुमालानं ओठ टिपले. दारांतून तिची दृष्टि दूरवर गेली, कुठें तरी क्षणभर स्थिरावली. मग तिचा चेहरा लाल झाला. माझ्याकडे तिनें पाहिलं व मनापासून म्हटलं,

"लक्षांत आलं नाहीं तुमच्या?—तुम्ही बोलतां तेव्हां मी जवळ येतें; बऱ्याच वेळेला पुन्हापुन्हा प्रश्न करतें. मी—मला नीट ऐकूं येत नाहीं...मी बहिरी आहें."

खरंच, मी बोलतांना ही पुढें वांकते, 'आँ' म्हणून वेंधळेपणानें विचारते, कपाळाला आठ्या घालते. तिचं असं खुळ्यासारखं वागणं ह्या व्यंगामुळें आहे तर!—तरी पण बहिरेपणाचा नि तिच्या धडपडीचा, पैशाच्या अडचणीचा संबंध समजेना मला. मीं म्हटलं,

"थोडंसं ऐकूं येत नाहीं, एवढंच ना?"

"एवढंच ना काय! मला तर हा भयंकर शाप वाटतो—" ती उसळून म्हणाली; व मग मागें सरकून रुमालाची घडी घालूं लागली.

जरा वेळ कुणीच कांहीं बोललं नाहीं. मी बुचकळ्यांत पडलों आहें हें तिनें ओळखलं. हॉटेलांतील वर्दळ जरा कमी होतांच ती पुढें वांकून सांगूं लागली,

"ह्या व्यंगापायीं मी किती सहन करतें, कल्पना नाहीं तुम्हाला. हिणवणं, हेटाळणी होणं हें तर लहानपणापासूनच आहे. पण इतर अडचणीहि उभ्या आहेत. वय वाढत गेलं तसतसा हा त्रासहि वाढत गेला. वर्गांत लेक्चर्स ऐकत राहायचीं म्हणजे एक दिव्यच असतं. दोनतीन पीरिअड्स् झाले कीं अगदीं थकून जायची मी. शिक्षण नकोसं झालं. बाहेरहि तेंच. सिनेमासारखी करमणूक नकोशी व्हायची. हे बोलके सिनेमे म्हणजे माझ्या मुळावरच आलेले. दोन तास सिनेमा पाहिला कीं डोकेदुखीनं आणिक दोन तास भंडावून जायची मी. वाचायचं तरी किती नि हिंडायचं तरी कुठें?—जो तो माझ्याशीं बोलतांना आवाज चढवतो, मला ऐकूं जावं म्हणून धडपडतो. मला त्यांच्या हालचालींवरून जाणवतं नि शरमल्यासारखं होतं. कांहीं तर ऐकूं येणार नाहीं ह्या कल्पनेनं बेधडक वाटेल तें बडबडतात...अन

नोकरी करीन म्हटलं तर सारीच अडचण... जाऊं द्या ! मला जगाची सहानुभूति नको, नि जगाकडून सवलतीहि नकोत...विषय निघाला म्हणून बोललें." तिनें बोलणं थांबवलं व बिल द्यायला पर्स उचलली.

"छेः छेः, पैसे मी देणार. मीं बोलावलं आहे तुम्हाला." मीं बिलाचा कागद ओढून घेतला. "अन् माफ करा हं, तुम्हाला दुखवलं असलं तर—"

"नाहीं. तुम्ही तर माझ्याशीं खूप चांगले वागलांत. दोन स्त्री-पुरुष एकत्र आले कीं इतके चांगले वागूं शकतील ह्यावर माझा विश्वास बसणं दिवसेंदिवस अवघड होत चाललंय्. विशेषतः माझ्या कानाच्या—"

पुन्हा तिनें आपली व्यथा सांगायला सुरुवात केली. स्वतःचा अपराध नसतांना नशिबीं आलेल्या शारीरिक दोषाबद्दल माणूस हळहळतो, तेंच तिचं हळहळणं होतं. पण त्यांत केवळ रडकेपणा, हताशपणा नव्हता. व्यंगाविरुद्ध झगडायची, दैवाविरुद्ध बंड करायची धडपड दिसत होती. तिची तळमळ, तळतळाट पाहून माझं संवेदनाक्षम मन चमकून गेलं. तिची सांवळी, सुमार सौंदर्याची आकृति मी केव्हांच विसरलों होतों. पण तिचं खुळं वेंधळं, वागणंहि आतां मला आठवत नव्हतं. हें तिचं वागणं-बोलणं, रूप-रंग केवढा तरी गहिरा होता ! तेजस्वी होता !

आम्हीं हॉटेल सोडून रस्ता ओलांडला. न बोलतां शून्यपणें चालत राहिलों. मोकळ्या हवेंत आल्यावर मला पैसे मिळवण्याचे तिचे प्रयत्न पुन्हा स्मरले. ही हुषार, शहाणी मुलगी पैशाच्या मागें कां आहे, नि त्यासाठीं असं वेड्यासारखं कां वागते ह्याचं परत कोडं पडलं. पण तें उलगडण्याचं धाडस होईना. तसाच मी तिच्याबरोबर पुढें चाललों. समोर सार्वजनिक बाग होती. आम्हीं एकमेकांकडे पाहिलं आणि आंत शिरलों.

स्वच्छशी जागा पाहून मीं बैठक मारली. तिची समजूत करण्याकरितां म्हटलं, "प्रतिभाबाई, तुम्ही उगाचच त्रागा करीत आहांत, असं वाटतं मला. ज्या गोष्टी तुमच्या हातांत नाहींत, ज्यांत तुमची कांहीं चूक नाहीं त्याबद्दल त्रागा करण्यांत काय अर्थ ? अन् असलं जरा व्यंग..."

"व्यंग असलेल्यांना जगायचा अधिकार नाहीं !" ती तशीच उभ्यानं म्हणाली, "जें जग इतकं सुंदर, स्वच्छ आहे तें ह्या अशा लोकांनींच खराब केलं आहे !"

मी दचकलों. ती खालीं बसेपर्यंत गप्प राहिलों. ती समोर बसल्यावर हळूच म्हटलं,

" अहो, ह्यापेक्षां अधिक मोठीं व्यंगं असलेलीं माणसं सुखासमाधानानं राहतात. अन् मी म्हणतों, एवढं कुठें बिघडतं ऐकूं कमी आलं तर?"

"सौऱ्यांना हेंच वाटतं. राहिलीस बहिरी तर कुठें बिघडलं?—असेल कुणी आंधळं अगर लंगडं तर कुठें अडलं एवढं? महारोगी, अर्धांगानें आंखडलेले, एवढंच काय, पण उपाशी, भिकारी, कुणींहि जगावं—काय हरकत आहे? अशीं व्यंगं वागवून लोक लाचारपणें जगतात. मनुष्यजात इतकी नादान बनली आहे खरी. हेंच आपलं आजचं तत्त्वज्ञान आहे.—" तिनं मध्येंच बोलणं बंद केलं. पण तिचे ओठ थरथरत होते. हात हिरवळ तोडीत होते.

हीच, हीच का ती पोर?—किर्रर संध्याकाळीं माझ्या घरीं आली नि आठ-वड्याचे पेपर पुढें करून म्हणाली, 'मीं कथा लिहिल्या आहेत.' हीच का ती स्टुडियोंत चकरा घालणारी, दिग्दर्शकावर विश्वास ठेवणारी मूर्ख मुलगी?—आज ही तर मला एक वेगळंच तत्त्वज्ञान ऐकवीत होती. एक नवाच साक्षात्कार घडवीत होती...

अंमळशानं प्रतिभा म्हणाली, "मी सांगतें तुम्हाला, मला असं राहायचं नाहीं. मी खूप खटपट करतें, हें व्यंग कमी व्हावं म्हणून. औषधं झालीं, मसाज झाले, इन्जेक्शनं झालीं. प्रत्येक क्षण व प्रत्येक नाणं ह्यापायीं झिजवूं पाहतें. हल्लीं हें पाहा—"

बोलतांबोलतां तिनें डाव्या कानांवरचा केसांचा फुगा मागें सारला. मला वाटलं होतं, कीं फुगे पुढें काढण्याची केवळ फॅशन आहे तिची. पण त्यांतून तिनं एक तार काढून दाखवली.—" बारीकसं खड्याएवढं यंत्र कानांत बसवतें. केसांतून तार लपवून, पोटाशीं बॅटरी ठेवली आहे तिथें जोडतें. पण परवडत नाहीं. महिना वीसपंचवीस रुपये खर्चावे लागतात." हळूच पदर सरकवून तिनें निऱ्यांशीं ठेवलेली बॅटरी दाखवायलाहि कमी केलं नाहीं.

मी थक्क होऊन पाहात राहिलों. मग मला हळूहळू अंदाज आला. आतुरतेनं मीं विचारलं, " पांच हजार एवढ्यासाठींच का?"

" माझा हा बहिरेपणाचा रोग वाढत जाऊन लवकरच मी ठार बहिरी होणार आहें. दिवसेंदिवस हें मला जाणवतं आहे.—ह्या रोगावर कुठला इलाज मीं शिल्लक ठेवलेला नाहीं. आतां एकच उपाय उरला आहे. कानांत, अगदीं आंत शस्त्रक्रिया

करायची. पण ती अति अवघड आहे. अन् इथें होत नाहीं. फक्त जर्मनींतच करतात. काय वाटेल तें झालं तरी मला जर्मनीला जायला हवं. ऑपरेशन करायला हवं. पण पैसे...!" उजळलेला, ढवळलेला तिचा चेहरा परत निवळूं लागला, निराश होऊं लागला. मी भारावलों होतों, दिपलों होतों. आजूबाजूला बागडणाऱ्या मुलांइतकीच ही मांडी मोडून बसलेली मुलगी निष्पाप नि भोंवतालच्या वृक्षलतां-इतकीच अद्‌भुत वाटत होती. आणि आतां मागचे, मावळतीचे रंग तिला दैवी रूप देत होते...

प्रतिभा प्रधान आणखी दोन दिवस पुण्यांत राहिली. दिग्दर्शक नि निर्माते नुसत्या थापा मारीत आहेत, हें तिला पुरेपूर पटलं तेव्हांच तिनें चिवटपणा सोडला. तिचे विचार व तिचं वागणं ह्यांत विचित्र व्यस्तपणा आला होता. एक जिवंत, तडफदार तत्त्वज्ञान उराशीं बाळगणारी पोर खुळ्यासारखी वाटेल त्या ठिकाणीं जाते हें कसंसंच होतं. पण त्याला इलाज नव्हता. तिला पैसे हवे होते, अन् पैशांचं सोंग सजवण्याइतकी कला तिच्याजवळ नव्हती.

मी स्टेशनवर तिला निरोप द्यायला गेलों. तिला मी कांहींच मदत करूं शकलों नाहीं, ह्याचं मला वाईट वाटत होतं. पण मी तरी काय करणार? माझीच परवड होत होती. मला कानासाठीं पांच हजार रुपये नको होते, पोटासाठीं पन्नास रुपये पाहिजे होते. तेवढे मिळवणंहि हल्लीं मुष्कील झालं होतं. तिला पोट भरणं जड वाटत नसे. म्हणे, 'मी शिकवण्या करून, नोकरी करून महिन्याचे पैसे मिळवीन. वाईट इतकंच कीं, शिल्लक उरत नाहीं. अन् शिल्लक सांठेपर्यंत मी पार बहिरी होईन—'

स्टेशनवर तिनं मला कोका-कोला देऊन आइस्क्रीमची परतफेड केली. आम्हीं ड्रिंक संपवून फलाटावर फेरी मारली. मध्येंच तिला मीं वर्तमानपत्र घेऊन दिलीं. पहिल्याच पानावरच्या कोड्याच्या जाहिराती पाहून आम्हा दोघांना हसूं आलं. कोड्यांतल्या बक्षिसाच्या आशेनं आजवर असंख्य पैसे संपवले होते, हें कालच तिनें मला रंगवून सांगितलं होतं. कोडीं सोडवलीं, शिकवण्या केल्या, कल्चर्ड दागिने विकले...पैसे...पैसे मात्र मिळाले नाहींत कुठेंच !

प्रतिभा परत डब्यांत बसली. गाडीची वेळ झाली, नि माझं आंतडं तुटलं. कुठून तरी पांच हजार रुपये आणावे आणि ह्या पोरीला देऊन टाकावे असं मला

एकदम वाटलं. पैसे...पैसे !...माझं मन परत ठकठकूं लागलं. माझ्या आयुष्यांत अचानक आलेली प्रतिभा प्रधान माझ्या डोळ्यांपुढून दूर जाऊं लागली...

किती तरी दिवस मला तिची आठवण येई. जी मुलगी भेटली तेव्हां संकटा-सारखी वाटली, सामान्य, नव्हे, मूर्ख वाटली, तिनें बंडखोर, तरुण रक्ताचा अगदीं वेगळाच नमुना दाखवून नामुर्ष्कीचं नादान जिणं जगणाऱ्या शेकडों लोकांहून आपण सजीव आहोंत हें दाखवलं. भोवतालीं सारेच लोक सत्त्वहीन बनले होते. सारखी तडजोड करीत होते. सारं सहन करीत होते. त्यांत ही मुलगी भलतीच तेजस्वी होती ह्यांत काय संदेह !—अन् अशा अलौकिक गुणापायींच तिला मूर्खा-सारखं वागावं लागत होतं, नव्हे ती मूर्ख ठरत होती, हें किती विचित्र !...किती तरी दिवस मला तिची आठवण यायची. वाटायचं, सुंदर असती तर तिनें कुठला मार्ग स्वीकारला असता ? अगदीं अशिक्षित असती तर काय केलं असतं ? काय होणार हिचं ?—कधीं पैसे मिळणार हिला ?—मिळतील का ?—का ही अशीच वर्षानुवर्षं...

**पुनश्च :**

दोन वर्षांनंतरची गोष्ट. शांतारामबापूंना कथानक हवं होतं असं कळलं म्हणून मी मुंबईस गेलों होतों. 'राजकमल'कडे जातांना वाटेंतच ट्रॅममध्यें प्रतिभा प्रधान दिसली.

मी पाहातच राहिलों. तसंच विटकं पातळ, फुगीर केस, किरकोळ यष्टि व रोखलेले डोळे. मला पाहतांच ती हसली. जवळ जागा होतांच तिनें मला अगत्यानें बोलावून घेतलं.

"केव्हां आलांत ?—काय बातमी ?"

"आजच आलों. शांतारामबापूंनीं बोलावलं आहे."

"ओऽहो ! अभिनंदन हं."

"तें जाऊं द्या. तुमचं काय ? दोन वर्षांत पत्ता नाहीं तुमचा."

"मी नुकतीच जयपूरहून आलें." मीं प्रश्नांकित चेहरा करतांच ती पुढें म्हणाली, "तिथें एक सरदारकन्या होती, तिला संस्कृत शिकवायचं होतं—"

"मग ?"

"जेमतेम चार महिने शिकविलं. ते पगार बुडवूं लागले म्हणून परतलें."

मी कांहींच बोल्लों नाहीं. तिचं व्यंग वाढत होतं हें मला जाणवत होतं. अन् तिची धडपडहि कमी होत नव्हती, हेंहि उघड होतं.

"मग आतां ?" मीं न राहवून विचारलं.

"आतां सिनेमांत—"

"म्हणजे ?—मी नाहीं समजलों."

"सिनेमांत 'प्ले-ब्लॅक'चा प्रयत्न करणार आहें. ही काय, भावगीताच्या क्लासला निघालें आहें. गाणं शिकतें आहे हल्लीं. जरा ताल-सूर साधला कीं 'प्ले-बॅक' साठीं प्रयत्न करणार आहें. लता मंगेशकरला दर गाण्याला दोन हजार मिळतात; आपल्याला दोनशें तर खरे ! एका पिक्चरमध्यें हिरॉइनला सहा गाणीं असतात ना ? तुमच्या स्टोरींत किती आहेत ?"

वांकडी मान करून ती विचारीत होती. भरडा आवाज मंजुळ करण्याच्या खटपटीनें ती जास्तच वेंधळी वाटत होती. आणि तिचं नाक अधिकच अपरं भासत होतं.

* * *

# पुरुषस्य दुःखम्— ७

स्वैंपाकघरामागच्या आडव्या चिंचोळ्या बोळांत एका बाजूला बंब, ढलप्यांचा ढीग व रद्दीचं पोतं ठेवलं होतं; आणि दुसऱ्या बाजूला शामूचं बिऱ्हाड होतं. भिंतीला देवीचं एक जुनाट चित्र चिकटवलं होतं. खिळ्याला खळीचा सदरा व तेलकट टोपी लटकत होती. खिडकीच्या कट्ट्यावर फाटलेली जीर्ण गादी गोणपाटांत गुंडाळून ठेवली होती. त्यावर कोपर रेलवून शामू उभा होता, खिडकींतून बाहेर पाहात होता.

बाहेर वर्दळ शांत झाली होती आणि उन्हं वाढत होतीं. घरामागचा चिंचोळा रस्ता गुदमरून गेला होता व त्यापलिकडचा डांबरी राजमार्ग तळपत होता. घरांतलीं जेवणं आटोपून झाकपाक केव्हांच सरली होती. स्वैंपाकघरांतून मावशीबाईचं घोरणं, त्यापलिकडल्या माजघरांतल्या घड्याळाची टिक्‌टिक् व दूरच्या दिवाणखान्यांतल्या रेडियोंतली गडबड जेमतेम ऐकूं येत होती.

शामू खिडकीशीं अवघडून उभा होता. घरांतले मंद आवाज व बाहेरचा खरखरीत उजेड ह्यांच्या सांपटींत सांपडला होता. 'गजलक्ष्मी आरोग्य भुवन'च्या दाराशीं उभी केलेली पाटी त्याच्या डोळ्यांपुढें तीनतीनदां येत होती. सकाळीं तो कोपऱ्यावर कोथिंबीर आणायला गेला तेव्हां खडूनें लिहिलेला तो फळा त्याला दिसला. किती तरी वेळ व किती तरी वेळां त्यानें तीं अक्षरें वाचलीं. कोथिंबीर आणायला व स्वैंपाकाला उशीर झाला म्हणून वहिनीसाहेब चरफडल्या तरी त्याला चिंता वाटली नाहीं. स्वैंपाक करतांना, वाढतांना व नंतर स्वतः जेवतांनाहि त्याला जाहिरात दिसत होती, बोलावीत होती. वांग्याबटाट्याचा रस्सा भुरकायचंही भान त्याला नव्हतं. तो रस्सा म्हणजे त्याचा हातखंडा होता. बाबासाहेबांना तो फार

आवडे व ते नेहमीं शामूची त्याबद्दल तारीफ करीत. पण आतां त्याला स्वयंपाकांत स्वारस्य वाटत नव्हतं. मोठ्या कढईतल्या उकळणाऱ्या तेलांत उसळणारीं लाल भजीं डोळ्यापुढें नाचत होतीं. उपेट, डोसा, थेरवडा, इडली दिसत होती. इथल्या दहा माणसांच्या नि स्टेनलेस स्टीलच्या भांड्यांतला त्याचा जीव उडून गेला होता, व मोठीं तपेलीं, ओगराळीं, वाडगे नि गलासांत गुंतून गेला होता. सर्व आवराआवर झाली कीं तो धान्य निवडणं, वाळत घालणं वगैरे कामं करीत राही. पण आज त्याचं कुठेंच लक्ष नव्हतं. मावशीबाई आडव्या होतांच तो बोळांतल्या आपल्या झोपायच्या जागीं आला, व न झोपतां खिडकीशीं उभा राहिला.

'हुषार व अनुभवी आचारी पाहिजे—' गजलक्ष्मी आरोग्य भुवन पुढच्या जाहिरातींतलीं तीं जादूचीं अक्षरं शामू सारखा पुटपुटत होता. आचारी पाहिजे, आचारी पाहिजे, आचारी...जेवण भरपूर व पगारही भरपूर असणार! शामूला हॉटेलच्या गल्ल्याशीं बसणाऱ्या मालकाची मुद्रा आठवली. काळीकभिन्न, गंधाचे पट्टे ओढलेली, कानांत फुलं अडकवलेली. शामू दचकला. त्या राक्षसापुढें उभं राहून नौकरी मागायची त्याला भीति वाटली. तेथलीं टारगट पोरटीं, उर्मट गिऱ्हाइकं, कपबश्यांचा खडखडाट, शिव्यागाळी...शामू शहारला. त्या फळ्यावरचीं अक्षरें त्यानें मनांतून पुसण्याचा प्रयत्न केला. पण तीं तशींच फरफाटे खात राहिलीं. आचारी पाहिजे, आचारी...

"शामू—" चिरक्या आवाजांतली वहिनीसाहेबांची आरोळी ऐकतांच शामू एकदम थरथरला. ह्या आवाजानें अन् ह्या आकृतीनें त्याचं आयुष्य आजवर अडकवून टाकलं होतं. दुपारच्या शांततेंत वहिनीसाहेबांची हाक ऐकून शामूला वाटलं कीं बाईसाहेबांनीं आपल्याला पकडलं! आपल्या मनांतलं वादळ ओळखलें. तो घाईनें खिडकीपासून दूर झाला. आपण नौकरी सोडणार नाहीं, कुठें जाणार नाहीं, हें सांगण्यास सिद्ध झाला.

"शामू—" वहिनीसाहेब तेवढ्यांत बोळांत येऊन थडकल्या. "कुठें गेला होतास—अन् मेल्या, दाढी करतो आहेस कीं काय—" खिडकींतल्या आरशाकडे पाहात त्या किंचाळल्या. "सांगितलं ना, घरांत दाढी करायची नाहीं म्हणून. पैसे मागत जा नि बाहेर सलूनांत जात जा म्हणून—"

"नाहीं—मी नुसता उभा होतों—" चाचरत शामू म्हणाला. आठ दिवसांपूर्वी

केराच्या टोपलींत टाकलं गेलेलं दाढीचं सामान त्याला आठवलं. अपराधी मुद्रेनें तो हळूच बाईच्या हनुवटीवर उगवलेला केस पाहात राहिला.

"मी समाजांत जातें आहें. रात्र होईल घरीं यायला. फ्लावरची भाजी कर. अन् साहेबांसाठीं टमाटो नि कांदा कापून ठेव. काल विसरला होतास—"

वहिनीसाहेब पर्स सांवरीत गेल्या. त्यांच्या पदराची सळसळ, पावडरचा घमघमाट, करडी नजर शामूपुढें तरळत राहिली. अन् मग तो त्यांच्या हनुवटीवर आजकाल दिसणारा आगंतुक केस डोळ्यापुढें येऊं लागला...दाढी, दाढी... बाबासाहेबांनीं व भाऊसाहेबांनीं दाढीला गरम पाणी मागितलं कीं शामू खुलून जायचा. घरांतल्या त्या दोघा पुरुषांचं कुठलंही काम करायला तो नेहमींच खुष असे. भाऊसाहेबांनींच त्याला दाढीचा जुना ब्रश बहाल केला होता. मग मोठा धीर करून शामूनं बोहऱ्याच्या दुकानांतून वस्तरा विकत आणला होता. धुण्याचा साबण व जवळचा आरशाचा तेलकट तुकडा हाताशीं होताच. हल्लीं दर आठवड्याला दाढी करणं भाग होतं. पंचविशी पार पडल्यानंतर कां होईना, पण आतां गाल व हनुवटी हिरवट होऊं लागली होती. तो पुरुष होता; मोटा मनुष्य होता.—शामू परत खुलून गेला. परत तो आरशाशीं गेला व आपला मुखडा पाहात हनुवटी कुरवाळूं लागला. गालावर उटलेल्या पुरळावर बोटं फिरवूं लागला. पुरुष, आचारी, हुषार आचारी, आचारी पाहिजे...परत त्याचं मन झेप घेऊं लागलं. आरशांतला त्याचा चेहरा भाऊसाहेबांच्या श्रीमंती चेहऱ्याशीं, गजलक्ष्मीच्या मालकाच्या तामसी मुद्रेशीं टक लावूं लागला.

"मेल्या—तीनतीनदां काय आरशांत पाहतोस—" मावशीबाई म्हणाल्या व शामू परत शहारला. आरसा वळकटीशीं लपवून बंबाशीं ओणवा झाला. छे—मावशीबाई नुसत्या घोरत होत्या. ही टीका त्यांनीं मागें एकदां केली होती. ताई-साहेबांचें फणीकरंड्याचें आवरून ठेवतांना शामू आरशांत पाहात बसला म्हणून त्या बोलल्या होत्या...शामू दारांतून आंत बघूं लागला. उशाशीं चौघडी घेऊन बाईसाहेबांची ती मावशी घोरत होती. तपकीर धरलेली चिमटी तशीच होती व पोटाशीं वाघाची मावशी होती. मावशींनीं कधीं एकदां उच्चारलेले शब्द आत्तां आपल्याला आठवावेत ह्याचा त्याला विस्मय वाटला. गंजीफ्रॉकच्या आंतलं जानवं ठीक करीत तो दाराशीं आला. मावशी केवढ्यांदां तरी घोरत होत्या. ही बाई सारखी खाते, सर्वांशीं लाचारीनें वागते व शामूवर हुकमत गाजवते...शामूला

एकदम आपल्या आईची अंधुक आटवण झाली. अंधुकच! अशीच ती संतापी होती; नि सोंवळी होती. कुणाकडे तरी स्वैंपाक करीत असंच आयुष्य कंठून ती केव्हांतरी आटोपली होती. लहानगा शामू निरनिराळ्या नातेवाइकांकडे आसरा घेत अखेर एका खानावळींत नोकरीला राहिला. तेथें एकदां मालकांनीं मरमर मारलं तेव्हां तो तेथून सटकला व ह्या घरीं चिकटला. तेव्हांपासून आज एक तप तो वहिनी-साहेबांच्या हुकमतीखालीं, मावशीबाईंच्या हाताखालीं जगत होता. ह्या घरांत, ह्या स्वैंपाकघरांत राहात होता. इथली चूल पेटवीत होता, ताटं विसळीत होता....

कितीतरी वेळ शामू तसाच उभा होता. मावशीकडे, मांजरीकडे, चुलीकडे, फडताळाकडे पाहात. पाहतां पाहतां त्याचं मन खिन्न झालं. ह्या खोलीचा, ह्या खोड्याचा त्याला आतां वीट आला होता. लाजही वाटत होती. भांडीं, भांडीं सगळीकडे! नानाप्रकारचीं, नाजूक भांडीं. स्टेनलेसचीं, पितळेचीं, कांचेचीं. नुसतीं भांडींच नाहींत केवळ. साऱ्याच नाजूक नि स्त्रियांच्या वस्तू! फडताळावर फणीकरंड्याचें होतं. शेजारींच भिंतीवर कुंकवाचे डाग व कोपऱ्यांत केसांचे गुंतवळ. चुलींत, अन्नांत तें लांब, तेलकट, क्वचित् कुरळे केस वारंवार येत. खेरीज खुंटीला वहिनीसाहेबांचें व बाईसाहेबांचें गंगावन होतेंच. इवलेसे हातरुमाल, काढून ठेव-लेल्या कांचोळ्या, दांडीवरचीं लुगडीं. रिबनी, आंकडे, बांगड्यांचे तुकडे ह्यांनीं भरलेला केर. ताईसाहेबांची लिपस्टिक, वहिनीसाहेबांची पर्स, मावशीबाईंचा मुकटा. इश्श्य, अय्या, होका, बाईबाई, ह्यांचे फुगे. सारखं वेण्या घालणं, लुगडीं बदलणं, बऱ्याच बायका मिळून खिदळणं, नसलेल्या बाईबद्दल कुजकं बोलणं... जेवणघर व स्वैंपाकघर ह्या वातावरणानं नुसतं रंगून निघालं होतं. आणि मागच्या, बोळीच्या दारांतून शामू तें पुन्हा पुन्हा पहात होता. त्यांत तो एक तप न्हाऊन, निथळून निघाला होता...पण आतां मात्र तें आटवून, जाणवून, थरथरत होता. शहारत होता. हुषार व अनुभवी आचारी पाहिजे ह्या जाहिरातीला लोंबकळूं पाहात होता.

खरंच, काय हरकत आहे ही नोकरी सोडून तिथें गेलं तर? काय हरकत आहे? शामूच्या मनांत हा प्रश्न पुन्हा पुन्हा टकटकूं लागला. किती वर्षं ह्या घरांत राहायचं? बारा पंधरा वर्षं दवडलीं. अजून स्वतःचं बिऱ्हाड नाहीं, चार धोतरं धड नाहींत. बारा वर्षांत सिनेमा सारा दोनतीनदां पाहिला; नि जत्रा–तमाशा तर मुळींच नाहीं. किती वर्षं आतां अशींच काढायचीं? असं झिजायचं, एकटं राहायचं? स्वतःचा संसार, लग्न...

लग्नाच्या कल्पनेनं शामू चमकला, चक्र लाजला. होय, आजकाल त्याला लग्न करावंसं वाटत होतं. त्याला आरशांत पाहावंसं वाटे, दाढी करावीशी वाटे, लग्न करावंसं वाटे. इतक्या उशिरानें कां होईना, अंधुकपणें कां होईना, पण त्याच्या अंगावर लग्नाच्या कल्पनेनें रोमांच उठत. बाबासाहेबांनीं त्याला वाढतांना गंजीफ्रॉक घालत जायला सांगितलं तेव्हां त्याला ही संवेदना झाली. मावशीबाई "बायकांत काय बसतोस सारा वेळ—लुब्रा मेला—" म्हणून म्हणाल्या तेव्हांच त्याला हें वाटूं लागलं. कुणीतरी चुणचुणीत, सुगरण...समोरच्या आडव्या मावशीबाई अदृश्य झाल्या व तिथें ताईसाहेबांची मैत्रीण मिरा उभी राहिली. 'शामराव, जरा पाणी द्या हो प्यायला—' कपोलावरचा घाम पुशीत ती घाईनें म्हणाली. शामराव अं!—शामूनें तत्परतेनं फुलपात्रभर पाणी दिलं. नक्षीच्या बांगड्यांनीं भरलेला गोंडस, गोरा हात फुलपात्र घ्यायला वर झाला. मग चिंचोळी हनुवटी वर गेली. लाडिक गळा सारखा दिसत राहिला. पाण्याची नितळ धार त्यांतून वहात गेली. शामूच्या शरीरभर कढत रक्त वहात राहिलं...शामूला गेल्या महिन्यांतला हा प्रसंग पुन्हा स्मरला. पुन्हा तो शहारून गेला. मिरासारखी कुणी मोहक—! शामूला आपल्या भावनेची भीति वाटली. मावशीबाई तेवढ्यांत फटाफट शिंकल्या व परत घोरूं लागल्या. दाराआड झालेला शामू कपाळावरचा घाम पुसूं लागला. छे छे, आपल्याला कोण मुलगी देणार? आपलं कसलं लग्न होणार?—आपल्याला ह्या बायका झेपणार नाहींत. आपलं त्यांच्याशीं पटणारही नाहीं! आपण लग्नाला लायक नाहीं, अगदींच बावळट, बुळे आहांत हें मत मावशीबाईनीं अनेकवार बोलून दाखवलं होतं. तें शामूला स्मरलं. पुन्हा पटलं. बायकांच्यांत वागून व बायकांचं त्याच्याबद्दलचं बोलणं ऐकून त्याचीही आतां तीच समजूत झाली. लग्न नको, नकोच, पण नवी नौकरी मात्र हवी. ह्या स्त्रियांच्या दुस्वासांतून सुटण्यासाठीं तरी नवी नौकरी हवी! शामू परत गजलक्ष्मीचा धावा करूं लागला. दारांतून मावशीबाईकडे एकवार पाहात खिडकीकडे परतूं लागला. त्याला वाटलं, खिडकीकडे जाण्याऐवजीं पुढच्या दारीं, पुढच्या दारांतून बाहेर जावं. 'गजलक्ष्मी आरोग्य भुवना'कडे धाव घ्यावी. म्हणावं—द्याल तो पगार घेईन, पडेल तें काम करीन, पण मालक, मला नौकरीवर ठेवा. ह्या स्त्रीराज्यांतून, बायकांच्या वेढ्यांतून मला सोडवा, मला वांचवा—'

"शामू, झोपलास कीं काय? आज कांहींच काम केलं नाहींस. अन् तीन

वाजले. चहा टाक. डोकं ठिकाणावर नाहीं कीं काय?—" नाकांत तपकीर कोंब्रीत मावशी किंचाळल्या. शामूचा आवेश ओसरून गेला. तो आपोआप घरांत लुगुलुगु गेला. स्वैंपाकघरांत कामाला सुरवात केली कीं तो आपोआप माना वेळावीत असे, मुरकत चालत असे. त्याच्या ह्या लकबीवर घरच्या बायका खूष असत; अन् नवखे लोक हसत असत. शामूला हल्लीं ह्याची जाणीव झाली होती. त्यानें बळेंच छाती पुढें काढून मान ताठ करून चालायचा बोलायचा यत्नहि केला होता. पण त्याची संवय सुटणं आतां अशक्य होतं. आजूबाजूच्या बायकी वस्तू, बायकी हावभाव ह्यांनीं त्याला केव्हांच कायमचं वळण लावलं होतं.

शामूनें चहाचं सामान काढलं. दुभत्याच्या कपाटांत सर्व ठीक आहे कीं नाहीं तें गृहिणीच्या तत्परतेनं पाहिलं. मावशींची चौघडी उचलून ठेवली व त्यांची चांदीची कपबशी काढली. मावशींचं काम करणं म्हणजे त्याला आजकाल कमीपणाचं वाटे. मावशींचेच केवळ नाहीं, तर ताईसाहेबांचे व वहिनीसाहेबांचे हुकूमहि त्याला आतां अपमानास्पद वाटूं लागले होते. स्त्रियांनीं त्याच्यासारख्या पुरुषाला कामं सांगायचीं ही केवढी शरमेची गोष्ट होती! ताईसाहेब अभ्यास करतां करतां मध्येंच येत व ओरडत, "शामू—माझं ओव्हलटीन—" शामू मनांतून संतापे, पण घाईनें ओव्हलटीनचा डबा उघडूं लागे. ताईसाहेबांनीं निःशंकपणें न्हाणींतून बाहेर यावं व शामूला फणीकरंड्याचं आणायला सांगावं ह्याहून लाजिरवाणी गोष्ट कुठली नशिबीं असणार! त्यांच्या मैत्रिणी आल्या कीं शामूला सर्वांच्या देखत त्या खायला करायला सांगत, बशा विसळायला सांगत! आणि वहिनीसाहेबांचं तर सारंच न्यारं होतं. शामू, चटणी वाट; शामू, भाजींत मीठ कमी कसं पडलं? शामू, खरकटीं भांडीं मोरीवर ठेव...एक ना दोन! संवयीनुसार शामू सारे शब्द झेली व हरेक काम उरकी. पण आजकाल त्याचं मन टसटसूं लागलं होतं. बायकांनीं आपल्याला कामं सांगायचीं, हुकूम करायचे? एका पुरुषाला?—अन् आपण ते मानायचे, बायकांसारखी कामं करायचीं? पुरुष असून?—आतां वहिनीसाहेबांसमोर शेंगा निवडणं नको वाटे. चटणी वाटायला सांगितली कीं अंगाचा भडका उडे. चार बायका स्वैंपाक-घरांत जमल्या कीं बाहेर जावंसं वाटे. गव्हले अगर पापड करायला घातले कीं साळकायामाळकायांच्या कोंडाळ्यांत तर त्याला गुदमरल्यागत होई.

—सर्वांत चीड येई ती जेवण करतांना! जेवणघरांत टेबलावर बाबासाहेब, बाईसाहेब, ताईसाहेब व भाऊसाहेब भोजन करीत. त्यांना वाढून झालं कीं उष्टीं

गोळा करून स्वैंपाकघरांत दुसरी पंगत बसे. बाजूलाच मावशीबाई व बहुतेक वारीं भटजींची बायको सवाष्ण म्हणून आलेली. एक आश्रिताची लेकुरवाळी स्त्री, एक विकेशा विधवा व एक...एक...शामूला आजकाल अन्न गोड लागत नसे. मावशींनीं आग्रह केला तर आणिकच विचित्र वाटे. येवढं करूनही त्या बायांची बडबड चाले व शामू एखाद्या सासुरवाशिणीसारखा मुंडी खालून मुकाट जेवी.

शामूनं मावशीबाईंचा चहा त्यांच्या पुढ्यांत ठेवला, स्वतःचा कानफुटक्या कपांत झाकून ठेवला व तयार केलेला ट्रे घेऊन तो बाहेरच्या खोल्यांकडे निघाला. भाऊ-साहेब आज घरीं होते व मित्रमंडळी जमवून रेडियोवर क्रिकेट मॅच ऐकत होते. बाहेरच्या खोल्यांकडे, भाऊसाहेबांच्या खोलीकडे जातांना शामू नेहमींच अधिरा, आनंदित होई...चुलीच्या व भांड्यांच्या कोंडाळ्यांतून, अन्नाच्या व बायकांच्या वासांतून तो बाहेर पडला व ट्रे सांवरीत भाऊसाहेबांकडे आला. चहा पाहतांच भाऊसाहेब खूष होतील, 'ब्रव्हो शामराव' म्हणून शीळ घालतील ह्या कल्पनेनें त्यानें स्वतःशींच मुरका मारला. मॅच ऐकत मित्रमंडळ बसलं होतं तिथें त्यानें चहा ठेवला. सारीं तरुण पोरं खुललीं, चहाकडे धावलीं. शामूला नाचावंसं वाटलं. काय त्या पोरट्यांचे पोशाख नि ऐट ! फुलाफुलांचे बुशकोट, वळवलेले केस, हातांतलीं घड्याळं, फाउंटनपेन्स, रुमाल. अन् काय त्यांची इंग्रजींत, तोंडांतल्या तोंडांत बोलायची ढब. शामूला क्षणभर वाटलं कीं आपणही तसेच सुंदर, स्वच्छ कपडे घालून त्या पुरुषांत मिसळावं. पण लगेच त्यांच्या गप्पा ऐकून तो लाजला. लाजून खोलीबाहेर आला. तरुणांनीं असल्या चहाटळ चर्चा चालवाव्यात ह्याचा त्याला विस्मय वाटला. अन् विलक्षण शरमहि. ते शब्द नि त्या कोट्या ऐकून त्याला कसंसंच झालं. बायकांबद्दल कांहींबाहीं बोलणं !...मुलं मग मॅच ऐकण्यांत मग्न झालीं. शामूनं मॅच पाहिलीहि नव्हती. ल्हानपणीं तो थोडासा विटीदांडू खेळला होता. अन् आजकाल समोरच्या घरांत मुली ठिकरीचा अगर खोखोचा खेळ खेळत तेवढंच त्याच्या पाहण्यांत होतं....

जड पावलांनीं तो भाऊसाहेबांचे खोलीपासून दूर झाला. भाऊसाहेबांची खोली, त्यांचे कपडे, दाढीचं सामान, टेनिसची बॅट, पुस्तकं, सायकल, बूट ह्याबद्दल त्याला अतिशय प्रेम होतं. स्वतः भाऊसाहेबांचेबद्दल तर अपार भक्ति होती. त्यांचं कुठलंही काम तो उतावीळपणं, आनंदानं करी. त्यांच्या पानांत तुपाचा चमचा भरून वाढी, व त्यांचा चहा त्यांना हवा तसा पातळ बनवी. इतकी निष्ठेनं चाकरी तो फक्त बाबा-

साहेबांची करी. कुठल्याही पुरुषाचीं कामं करण्यांतच खरा आनंद होता... आतां देखील तो बाबासाहेबांच्या खोलीशीं भारावून थबकला. खुंटीवरचा डगला, जाकीट, उपरणं लीनतेनें पाहूं लागला. कोपऱ्यांतली काठी व जोडा, टेबलावरचे कागद व चंची, पुरुषाच्या असंख्य खुणा खोलीभर विखुरल्या होत्या! शामू खांदे खालीं करीत व माना वेळावीत त्या पाहात राहिला...मग तेथूनही तो वळला. खिन्नपणें स्वैंपाकघरांत शिरला. आपल्या जगांत आला.

केव्हांतरी मामा आले होते, मावशींच्या बरोबर गप्पा मारीत होते. मामांना पाहतांच शामू दचकला. मामांचा त्याला हल्लीं अतोनात तिटकारा वाटे. लुगड्यांचा धंदा करणारा हा वहिनीसाहेबांचा सावत्रभाऊ मोठा लुतरा होता. सारखा बायकांत बसे, बायकी बोले. बोलत नसतांना टोळे उडवायची व बोलत असतांना मांडीवर चापटी मारायची त्याला संवय होती. शामूचं व त्याचं वाकडं होतं. अकारणच!... आत्तांही तो गुरगुरतच मामांकडे पाहूं लागला. मामांची कपबशी त्यानें फणकाऱ्यानेंच विसळून टाकली. मावशी पुराणाला निघाल्या त्यांच्यासह मामाहि बाहेर पडले. शामूनें सुटकेचा सुस्कारा सोडला.

"जाऊं नको रे कुठं—घरांत कुणी नाहीं. दुधाकडे नीट बघ—" मावशी बजावून गेल्या. घरांतल्या साऱ्या बायका आतां बाहेर होत्या व शामू स्वैंपाकघरांत एकटा उरला होता. क्षणभर त्याला शांत, स्वस्थ वाटलं. आजूबाजूला स्त्री नव्हती. बांगड्या वाजवणारी, पदर सांवरणारी, किरकिर करणारी, हुकूम सोडणारी कुणी स्त्री नव्हती! तो स्त्रियांपासून स्वतंत्र होता. पुरुष होता....अन् आतां तर त्याला तें स्वैंपाकघरहि नकोसं झालं. तीं भांडीं, गंगावनं, कुंकवाच्या बाटल्या, कांचोळ्या नि आगवळ—सारं चुलींत जाळून टाकावं व कुठेंतरी पळून जावं असं वाटूं लागलं. कुठेंतरी काय, त्या गजलक्ष्मी आरोग्य भुवनांतच!

"शाम्या—" त्याच्या खांद्याला स्पर्श करीत भाऊसाहेब एकदम आले नि म्हणाले, "शाम्या, लेका एक काम कर.—हा रुपया घे नि कोपऱ्यावरून कॅप्स्टनचं पाकीट आण. पळ. अन् हें बघ, लपून हं! बोंब मारूं नको. अन् कॅप्स्टन् बरं का—"

शामूचा चेहरा उजळून निघाला. भाऊसाहेबांचं काम. तें सुद्धां बाहेर जायचं नि चोरून करायचं. तो तें बेमालूम करणार ह्यांत काय संशय!—अन् 'कॅप्स्टन' नांव त्याच्या ध्यानांत राहणार नाहीं काय? तो काय बावळ्या, बायल्या थोडाच होता?

अंगांत एकुलता एक शर्ट अडकवून व वर खोचलेलं धोतर खालीं सोडून शामू लगबगीनें बाहेर पडला. मुरडत, माना वेळावत रस्त्याच्या कडेकडेनें चालूं लागला. सिगरेट आणायला जायचं म्हणजे केवढं पुरुषार्थाचं काम होतं. तें तो धाडसानं करणार होता. अशींच मोटीं कामं त्याला करायचीं होतीं. पँट बुशकोट घालून तो एकदां सायकलवरही बसणार होता. अन् महत्त्वाचं म्हणजे कधीं तरी तो बँकेंत जाणार होता. बँकेंत पैशाच्या व्यवहारासाठीं जाणं म्हणजे पुरुषार्थाची परमावधि होती!

पानपट्टीवाल्याकडून कॅप्स्टनचं पाकीट त्यानें बिनचूक खरीदलं, व स्वतःवर खूष होऊन तो परतला. एकाएकीं त्याच्या मनांत कल्पना आली. मुठींतली मोड चाचपीत तो 'गजलक्ष्मी आरोग्य भुवना'कडे पाहूं लागला. सांगूं भाऊसाहेबांना कीं एक आणा मीं घेतला. ते कांहीं म्हणणार नाहींत; वहिनीसाहेबांना सांगणार नाहींत—त्यानें विचार केला. अन् वहिनीसाहेबांची कदर करण्याचं आतां कारण नव्हतं. आतां तो गजलक्ष्मीमध्यें आचारी होणार होता. पुरुषांच्या राज्यांत प्रवेश करणार होता.

दबकत, धीर धरीत तो 'गजलक्ष्मी आरोग्य भुवना'शीं आला. दाराजवळच्या फळ्यावरचीं पांढरीं अक्षरं टळक होऊं लागली. मोठीं होऊं लागलीं. आचारी पाहिजे—शामू पुटपुटला व गल्ल्याकडे पाहूं लागला. तिथें मालक नव्हता. शामू चुळबुळला. माना वेळावीत, मागें पाहात, अखेर आंत शिरला. दाराजवळच्या खुर्चीवर टेकला व चहा मागवूं लागला. उद्यांपासून तो येथें चहा करणार होता व बाहेर पाटवणार होता. हीं टेबलं, ह्या कपबश्या, किटल्या, पातेलीं, चुलीं, म्हणजे त्याचा संसार होणार होता. शामू डोळे फाडून भोवतालीं पाहूं लागला.

तेवढ्यांत चहाचा कळकट कप एका तशाच कळकट इसमानें दणदिशीं टेबलावर आपटला. तो लाल डोळ्याचा, काळा पंचा नेसलेला, केसाळ नोकर पाहून शामूला कसंसंच झालं. ह्या लोकांच्या संगतींत आपण राहायचं? हॉटेलांतलीं टेबलं पुसणारीं पोरंही तशींच गलिच्छ दिसत होतीं. ह्या घाणेरड्या, टारगट लोकांत मिसळण्याची त्याला भीति वाटली. तो कधीं कुणा समवयस्क लोकांत, कुणा पुरुषांत मिसळला नव्हता. आणि असल्या घाणेरड्या कपांतून असलं चहाचं पाणी प्यायला नव्हता. कानतुटका का असेना, पण स्वच्छ, सुबकसा कप तो वापरी. स्वच्छ चुलीशीं बसून शांतपणें चहा घेई. इथें कोण धूर, धुरळा, वर्दळ. शामू कावराबावरा होऊन बघत राहिला.

जराशानें त्याच्याच टेबलाशीं चारपांच इसम येऊन बसले. पावमिसळ चापूं लागले. शामू आपल्या भावी भाऊसाहेब बाबासाहेबांकडे पाहूं लागला. अंमळशानें त्या इसमांनीं पाणी मागवलं; व पाणीवाल्या पोराच्या गालावर टिचकी मारली. शामू चमकला; शरमला. खालीं मान घालून घाईनें उठला. जातांना त्यानें मान वळवून आंत नजर टाकली. चुलीमागें आचारी लोक विड्या फुंकीत उकिडवे बसले होते. खड्यांचा जुगार खेळत होते. त्यांचीं उघडीं, घामट, बेढब शरीरं पाहून शामूला किळस आली. असल्या आडदांड लोकांत तो कसा सामावणार?—हे नराधम त्याची थट्टामस्करी करतील, बेअब्रू करतील. गजलक्ष्मीच्या मालकाकडे न पाहतांच शामू पैसे टेबलावर टाकून बाहेर आला. त्याला घराची ओढ लागली. तें स्वैंपाकघर, जेवणघर, फडताळं, भांडीं, कांचोळ्या, गंगावनं, गोरींगोबरीं नि नाजूक-नखरेल शरीरं त्याला सारखीं दिसूं लागलीं. त्यासाठीं तो वेडापिसा झाला.

भाऊसाहेब दारांत वाटच पाहात होते. "किती उशीर हा!—अन् आणलंस कां पाकीट?—" शामूनें मुकाट्यानं पाकीट पुढें केलं. भाऊसाहेबांनीं घाईनं पाकीट घेतलं, फोडलं. मोड न पाहतांच खिशांत टाकली. दार बंद करून एकदम शामूला म्हटलं, "शाबास—हें घे बक्षिस. ओढ—ओढ बेट्या सिगरेट—"

"नको—नको ना—" शामू मान वेळावून म्हणाला.

"हत् लेका. अगदींच बुळ्या आहेस—" भाऊसाहेब म्हणाले. मग त्यांनीं सिगरेट शिलगावली व धुराचा मोठा लोट शामूच्या तोंडावर सोडला. शामू गुदमरून गेला. हातानें धूर दूर करीत आंतघरांत धावला.

सिगरेटचा धूर घशांत, नाकांत नि डोळ्यापुढें येत होता आणि शामू मूढपणें स्वैंपाकघरांत उभा होता. स्वैंपाकघरांत येतांच त्याला सुटल्यासारखं, आधार आल्या-सारखं वाटलं. त्या बाह्य जगापासून, व्यसनी, वात्रट, अफाट, पुरुषी विश्वापासून तो वांचला गेला होता; व आतां ह्या नाजूक, नक्षीदार स्त्रीराज्यांत सुरक्षित होता. पण मग येथें आल्यावर त्याला काय करावं, कळेना. त्याच्या मनानें परत उचल खाल्ली. त्याचे हात दाढीचे खुंट चाचपूं लागले. कोरड पडलेल्या घशांत ताईसाहेबांची मैत्रीण मिरा पाण्याची धार ओतूं लागली. 'आचारी पाहिजे—'चीं अक्षरं चारी भिंतीवर उमटूं लागलीं. त्याला वेड्यासारखं झालं. स्वैंपाकघराबाहेर, घराबाहेर तर जायला हवं; पण कसं जायचं?—इथले बांगड्यांचे, कपबश्यांचे आवाज, कांचोळ्यांचे, गंगावनांचे

वास, मृदु, मुलायम शरिरांचा सहवास सोडून कसं जगायचं ?? तो कावराबावरा झाला, कासावीस झाला.

एकदम तो उठला. कपाटांतून त्यानें सुरी काढली, मुठींत घट्ट धरून तो सुरीची तळपती धार लाल डोळ्यांनीं पाहूं लागला—मग शिंकाळें ओढून त्यानें कांदे टमाटे काढले. वहिनीसाहेबांच्या आज्ञेनुसार बाबासाहेबांसाठीं तो कांद्याचे काप करूं लागला.

* * *

# हुबेहूब

८

खडकगांव. एक खेडं. ओल्या अडगळींत एखादी कावळ्याची छत्री उगवावी तसं टेकड्यांच्या गिचमिडाटांत पांचपंचवीस घरांचं बनलेलं गांव! गांवाच्या एका कडेला शुष्क, नागमोडी ओढा व दुसऱ्या कडेला निवडुंगाचं रान. गांवांत एक शंकराचं देऊळ व म्हसोबाचे तीनचार दगड. चावडी, शाळा, वैद्य, गुरव वगैरे जरुरीच्या गोष्टी. ब्राह्मणामहारांचीं ठराविक घरं. गुजराचा दुमजली वाडा हीच काय ती वैशिष्ट्यपूर्ण बाब तिथें होती. बाकी सारं नेहमींचं; नि तेंही सामान्य. शहरापासून, सुधारणांपासून दूर असलेली ती वस्ती खुरटल्यासारखी, कोंडल्यासारखी कशी तरी जगत होती.

खडकगांवांत नानीनें प्रथम पाऊल टाकलं तेव्हां सासरचं हें स्वरूप पाहून ती जरा नाराज झाली. पन्नास मैलांपलीकडे असलेल्या एका खेड्यांतलीच होती ती. पण तिचा गांव एखाद्या मुसमुसलेल्या रोपट्याप्रमाणें होता. गांवाभोवतीं आंबराया नि बागा आणि गांवांत आठवड्याचा मोठा बाजार. सदा सळसळणारी गंगा गांवाला वेढा देऊन बसली होती; आणि नदीच्या पुलावरून शहराकडची मोटार गांवांत येजा करीत असे. नदींत डुंबत, आंबराईत बागडत अन् बाजारांत येणाऱ्या मोटारबसकडे पाहात नानीनें सोळा वर्षे दवडलीं होतीं. गांवाची वेस प्रथम ओलांडली ती मंगळसूत्र बांधल्यावरच. खडकगांवच्या दादू देशमुखाशीं तिचं लग्न झालं. आपण नव्या जगांत, नव्या जागीं जाणार, स्वतःचा संसार थाटणार, म्हणून नानी वेडावून गेली होती. तिचा नवरा तर तिचीच दृष्ट लागण्यासारखा होता. उणापुरा उंच, धिप्पाड आणि आकर्षक. लाजायचं विसरून, संधि सांपडेल तेव्हां नानी नवऱ्याकडे पाहात राही. त्याची भव्य मुद्रा, तीक्ष्ण डोळे, करारी हनुवटी!

त्याची मान नि मनगटंही केवढीं भरदार होतीं. जत्रेंतल्या कुस्त्यांतून तिनें पाहिलेल्या पहिलवानांपेक्षां तो रगेल, पण रेखीव दिसे. तिच्या मैत्रिणींच्या पोशाखी, फाटक्या पतिराजांपेक्षां तिचा देव खूपच हेवा वाटण्यासारखा, हवासा वाटण्यासारखा होता. नव्या आयुष्यासाठीं व असल्या नवऱ्यासाठीं नानीनं माहेरहून निघतांना आपलीं ओघळणारीं आसवं आवरलीं. दूर असलेल्या माहेरीं वारंवार यायला मिळणार नाहीं, सासरीं एकट्या सासूजवळ व अल्पशा मिळवतींत संसार सजजावा लागणार, ह्याची तिनें खंत मानली नाहीं. गजबजलेल्या बाजारांतून व मोहरलेल्या आंब्रायांतून हिंडून तिचं मन आसुसलं होतं. कांहीं तरी नवं, नवलाईचं, निराळं घडावं म्हणून तडफडत होतं. आणि अखेर तें तिच्या हातांत आलं होतं. तिच्या हातांतल्या गोट-पाटल्यांत, गळ्यांतल्या काळ्या मण्यांत. लग्नाच्या वऱ्हाडासह, करवलीसह ती सासरीं, खडकगांवला निघाली. बाजारांतून सुटणाऱ्या, नदी ओलांडून क्षितिजाकडे धाव घेणाऱ्या मोटारबसमध्यें नवऱ्याजवळ बसून निघाली.

पण तास दीड तास प्रवास केल्यावर रस्त्याच्या एका फाट्यापाशीं बस थांबली. लग्नाचं वऱ्हाड उतरलं. बस गेली व धुरळा उडत राहिला. बाजूला खड्या असलेल्या बैलगाड्यांतून ढकलत ढकलत प्रवास पुढें सुरू झाला. रुक्ष प्रदेशांतून, खडकाळ भागांतून, गाड्या खडकगांवाकडे निघाल्या. आजूबाजूला सारं ओसाड, उजाड दिसतांच नानीला खिन्न वाटूं लागलं. नवराहि दुसऱ्या बैलगाडींत बसलेला. मग खडकगांव आलं. पडका तट, कोरडा ओढा, खुजीं घरं पाहतांच नानीचं तोंड कडू झालं. मायेच्या, माहेरच्या माणसांच्या आठवणींनीं डोळे डबडबले. लग्नाचे पाहुणे परतले, करवली माघारीं गेली, कीं कसे दिवस काढायचे ह्या काळजीनें तिला कांहीं कळेनासं झालं.

लग्नाला जमलेले लोक पांगले, करवलीहि निघून गेली. जुनाट घराच्या एका भागांतल्या तीन खोल्यांत नानीनें आपला संसार सुरू केला. नवरा नि सासू यांशिवाय तिसरं कुणीच नव्हतं. सासूची दृष्टि अधू झालेली. तिन्हीत्रिकाळ ती देवाशीं माळ ओढीत बसलेली असे. मुलाशीं अगर सुनेशीं फारशी बोलत नसे. घरांतल्या व्यवहारांत अजिबात लक्ष घालीत नसे. सासूचं असलं वागणं नानीला विचित्र वाटलं. सासू छळील, धाक लावील, तिच्या तालावर, मनाच्या कलावर, आपल्याला सासरीं वागावं लागेल अशी तिची कल्पना होती. पण सासू असून नसल्यासारखीच आहे हें पाहून तिला कसंतरीच झालं. सकाळची सडारांगोळी

करतांना, डाळतांदूळ घेतांना, चुकल्यासारखं वाटे. सासूनें स्वैंपाकावर नजर ठेवावी, आपल्या वागण्यावर निदान चोरून लक्ष ठेवावं असं तिला वाटे. पण सासू वर मान करूनहि पाहात नसे. तिच्या कठोर मुद्रेसाठीं, कुजक्या बोलण्यासाठीं नानी कोण वाट पाहात होती. सासूच्या दुस्वासाशिवाय सजलेला संसार तिला अगदींच अळणी वाटूं लागला. आडावर, स्वैंपाकघरांत, ओसरीवर वावरतांना तिला एकाकी, अधांतरीं असल्यासारखं झालं.

दादू गांवांतल्या गुजराकडे कामाला होता. हिशेबाच्या वह्या लिहिणं, वसुलीचे कागद पहाणं, पत्रं लिहिणं, असलीं कामं तो करी. दुपारीं जेवायला येई व जरा वामकुक्षी करून, पुन्हा शेटजींकडे जाई, तों संध्याकाळ उलटून गेल्यावर परते. दोन वेळां जेवायला व दोन वेळां झोपायला नवरा घरीं असे आणि तेवढाच काळ नानीला मोलाचा वाटे. पाहुणेरावळे गेल्यावर नानीकडे स्वैंपाक संपूर्णपणें आला. पतीला काय आवडतं ह्याची तिनं सासूजवळ, स्वतः दादूजवळ विचारपूस केली. मेथीची भाजी, लसूण घातलेलं पिठलं, अळूच्या वड्या—छे, नवऱ्याला कसलेच चोचले ठाऊक नव्हते. सारंच चालत असे अन् कशावांचूनहि अडत नसे. नानीला नवऱ्याचा तो गुण आवडला. पण आपला सुग्रणपणा दाखवायला संधि नाहीं, पतीला तऱ्हातऱ्हा खायला करून घालण्याचं सुख नाहीं, हें पाहून ती खट्टू झाली. गुजराच्या घरून आल्यावर तो अंघोळ करून जेवायला बसे. नानी स्वतः त्याच्याबरोबर बसूं लागली. पाटाचा काटकोन करून, कधीं पाणी पिण्याचं भांडं एकच ठेवून! दादू कित्येकदां शेटजींकडे सकाळीं दूधपाक घेई, कधीं दुपारची शेवगांठी अगर मोहनथाळ खाई. अन् मग नानीचा भात संपण्यापूर्वीच पानावरून उठून जाई. उष्टंखरकटं तसंच टाकून सुपारीचं खांड पुढें करावं तर स्वारी आधींच ओसरीवर घोरत पडलेली! हातांतली सुपारी नकळत कोनाड्यांत ठेवीत, बांधलेला पदर मोकळा करीत, नानी त्याच्या शांत निद्रित आकृतीकडे पाहात राही. खरंच, किती शांत, सुधा, सरळ मनाचा होता तिचा नवरा! खडकगांवांतले बहुतेक पुरुष गांजेकस, गप्पिष्ट, टवाळखोर, टाळकुटे होते म्हणे! त्या मानानें तिचा नवरा खूपच चांगला होता. ती त्याच्या भव्य मुद्रेकडे बघत राही. जाड भुंवया नि डाव्या कानशिलाशीं उभी काळी खूण. धारदार टोकाशीं जरा बांक आलेलं नाक. कानांच्या चिकटलेल्या पाळ्या. हनुवटीच्या मध्यभागीं पडणारा खड्डा. भरदार छातीवर स्वस्तिक करणारे केसाळ बाहू. पहाटे पदर सांवरून शय्या सोडतांना ती हीच आकृति, हेंच रूप टक लावून डोळ्यांत

सांठवी. प्रतिक्षणीं तो तिला अधिकाधिक आवडे. दूर खेपेला मन अनावर होऊन तिला त्याच्या कुशींत शिरावंसं वाटे, त्याचे पाय चुरावेसे वाटत. पण त्याची समाधि भंगेल म्हणून ती हलकेच दूर होई. खरकटीं भांडीं अगर धुण्याचे पिळे पुढ्यांत घेऊन वेड्यासारखी बसे.

पहिला दर्प नि पहिलं दूरत्व कमी झाल्यावर टक लावून पाहात बसणाऱ्या नानीच्या मनांत अनेक असंतुष्ट विचार उगवूं लागले. तिला वाटूं लागलं कीं, आपला नवरा भव्य देहाचा नि विशाल मनाचा खराच, पण एकदां तरी त्यानें घाईनें जेवण उरकून न उठतां तसंच पाटावर घोटाळावं, बायकोचं जेवण होईपर्यंत गप्पा मारीत बसावं. संध्याकाळीं शेटजींकडून लवकर परतावं. बायकोनं बागेंत लावलेली वेल पहावी. कधीं तरी अंघोळीला फार गरम पाणी दिलं म्हणून डोक्यांत राख घालावी. कधींतरी जीव गुदमरून जाईल इतके मुके घ्यावेत ! त्याचा मोटाड देह तिला पोकळ पुतळ्यासारखा, केवळ सावलीसारखा वाटूं लागला. सिंहासारखा त्याचा जबडा संथपणें भात-वरण खाऊं लागला कीं, तिला अन्न गोड लागत नसे. त्याचा धिप्पाड देह ओसरीवर विडी ओढीत बसला, अंथरुणावर घोरत पडला कीं तिच्या कपाळाला आठी पडे व अस्वस्थपणामुळें झोप उडून जाई.

पण ती त्याला बदलूं शकत नव्हती. डिवचूं शकत नव्हती. हळूहळू त्याच्या चालचलणुकींत तिची चाकोरी मिसळून गेली. नवऱ्याभोवतीं बागडायचं, नवऱ्यासह नवं विश्व उभारायचं, हे विचार तिनें माहेरच्या आंबरायांतल्या मोहरांत, नदीच्या पाण्यांतल्या भोवऱ्यांत पाहिले होते, ते लुप्त झाले. सासूसारखी, नवऱ्यासारखी, ती शांत, सुस्त बनूं लागली. निमूटपणें काम करूं लागली. आला तो दिवस मूढपणें दवडूं लागली.

चुलीच्या जाळाजवळ नि ओसरीच्या पायरीपाशीं बसून ती आपल्या आयुष्याचा विचार करी. घरांत असं उजाड, तर बाहेर साराच अंधार. आजूबाजूच्या घरांतल्या बायांशींहि तिचं सूत जमेना. शंकराच्या देवळांत ती मोठ्या अधीरतेनें पुराण ऐकायला गेली. पण पुराणिकबुवांचं रडगाणं गांवाच्या सुतकी स्वरूपाला साजेसंच होतं. दादूची बायको म्हणून शेटजींच्या घरीं तिला बोलावणं येई. कधीं जेवायला, कधीं कशाला. कमरेच्या किल्ल्यांशीं सारा वेळ खेळणारी व सारा वेळ एका जागीं बसलेली शेटाणी पाहून तिला शिसारी आली. गुजराच्या विधवा बहिणीचा तिला ओढा वाटला, पण बहीणच अबोल होती. यनमाला व कांचनमाला—दोन्ही मुली छान

होत्या. त्यांच्या साड्या, त्यांचे दागिने पाहात बसण्यांतच केवढी मजा असे!—पण 'मुनीमाची बायडी' ही भावना त्या दोघी दाखवूं लागल्या अन् नानीला अधिक सलगी करणं जड झालं. सकाळसंध्याकाळ ती गुजराकडे जाई. फुलं द्यायला, ताक आणायला. तिथल्या बायका सारा वेळ झोपाळ्यावर, गादीवर, रसोईंत नुसत्या बसून असत. सारा वेळ झोंपत अगर खात बसत. त्यांचे ते गरगरीत देह, सुस्त चेहरे, खादाडपणा नि गर्विष्ठपणा पाहून नानीला कसंसंच होई. तरी देखील दादू दृष्टीस पडतो म्हणून ती वारंवार वाड्यावर जाई. बाहेरच्या बैठकीशींच तो बसलेला असे. खालीं मान घालून लांबलचक नि लठ्ठ वह्यांत वळणदार अक्षरांत जमाखर्च लिहीत असे. घरांत एकटं बसून वेड्यासारखं झालं कीं वाड्यावर येऊन नवऱ्याचं दर्शन घेणं हा तिचा चाळाच होऊन बसला होता. पण पुढं तेंहि कमी झालं. दृष्ट लागण्यासारखा, दरारा वाटण्यासारखा तिचा दादू, दारांत टांगलेल्या पोपटाप्रमाणें सारा वेळ तिथें बसून असतो, हें तिला आवडेनासं झालं. पोपट निदान बोलतो, त्याचं कौतुक होतं. आपला नवरा कधीं मान वर करीत नाहीं, कुणाशीं बोलत नाहीं. त्याला तसं पाहणं नानीला अवघड वाटे. ती वाड्यावर जाणं टाळूं लागली. घरांत एकटं राहणंही संवयीचं होऊं लागलं होतं. सारा वेळ ती स्वैंपाकघरांत चुलीच्या जाळाशीं डोळे मिटून बसून राही. शून्यपणें दूरवर पाहात ओसरीच्या पायरीवर उभी राही.

माहेरच्या महत्त्वाच्या दोनचार फेऱ्याहि सरल्या आणि नानीच्या आयुष्यांतलं उरलंसुरलं वैचित्र्य आटोपलं. मंगळागौर, दिवाळसण, आईचा अखेरचा आजार! —आणि मग आतां दोनचार वर्षें तरी खडकगांव सोडून कुठं जाणं जमणार नाहीं ह्या जाणिवेनं तिची चळवळी वृत्ति, स्वप्नाळू अस्वस्थता नाहींशी झाली. खडकगांवांतले निवडुंगाचे फड, कोरडा ओढा, खुजीं घरं नि धुळीच्या वाटा रोज रोज पाहून तिच्या डोळ्यांतली तरलता विझून गेली. सुवासिक आंबराया नि नदीचं सोसाट्याचं पात्र तिला स्वप्नवत् वाटूं लागलं. ह्या उजाड गांवांत, उदास संसारांत आपण असेच निर्जीव दिवस ढकलणार ह्या विचाराची काजळी तिच्या मनावर धरूं लागली.

महिने गेले, वर्षें लोटलीं, पण नानीचा संसार तसाच संथपणें सुरू होता. चवळीच्या शेंगेसारखी ती पोर आतां बोजड, बधिर बनली होती. तिच्या दृष्टींत,

हालचालींत विलक्षण थंडपणा, मुर्दाडपणा आला होता. खडकगांवांतल्या एकलकोंड्या नि उदास आयुष्याशीं ती नकळत, नाइलाजानें एकजीव झाली होती. पहाटे जड डोळ्यांनीं उठायचं, शेणसडा घालतांना आठवली तरच ओवी पुटपुटायची. मनाला येईल तें रांधायचं नि हवीं तेव्हां उष्टीं, धुणीं उरकायचीं. काम नसेल तेव्हां झोपायचं, झोप संपली कीं आळस देत ओसरीवर बसून राहायचं...कधीं तरी दुपारीं जुनेर उशाशीं घेऊन ती आडवी झालेली असली कीं धान्याच्या डब्यांत उंदीर खुडबुडत व नानी दचकून डोळे उघडी. श्वास आवरून उंदरांचं उंडारणं पाहात बसे. त्यांचे खेळ पाहतांच तिला तरतरी येई, तडफ येई. कधीं तरी कातरवेळीं ओसरीवर उभं राहून वर आकाशांत नजर टाकली कीं ढगांच्या गूढ आकृत्या दिसत. त्या पाहतांच ती अस्वस्थ होई, अनावर होई...पण तेवढंच!—आपण अखेरपर्यंत असंच कोपऱ्यांत, एकाकी जीवन कंठणार हें तिला कळून चुकलं होतं. —जीव नसलेल्या जड देहासारखं, शरीर हिरावून घेतलेल्या एकाकी आत्म्यासारखं......

● ● ●

खडकगांवांत गडबड सुरू झाली. नानीच्या संसारांत नाहीं; गुजराच्या वाड्यांत. वनमालाबेनचं लग्न ठरलं. वाङ्निश्चय पूर्वीच झाला होता; आतां विवाहाचा मुहूर्त निश्चित झाला. नानी वाड्यावर जाई तेव्हां लग्नाच्या तयारीची गडबड सुरू असलेली तिला दिसे. दागिने घडवले जात होते, कापडचोपड निवडलं जात होतं, फेण्याशेवयांचा रांधा पडला होता. नानीदेखील वारंवार कामाला जात असे. विवाहाच्या वर्दळीमुळें तिला तेवढंच वैचित्र्य वाटे. दागदागिन्यांच्या, मानापमानांच्या गप्पा, अन् तळणाचे, कोऱ्या कापडांचे वास—गुजराचं लग्न म्हणजे सारीच गंमत नि गोंधळ होता.

दादू तर सारा वेळ वाड्यावर असे. रात्रींदेखील उशीर करी. याद्या करण्यांत, पत्रं लिहिण्यांत, त्याला मान वर करायला वेळ नव्हता. एक दिवस मात्र तो लवकर आला आणि सांगूं लागला, "लग्न इथें होणार नाहीं. सारं वऱ्हाड दूर, मालेगांवीं जायचं आहे. बैलगाडींतून दोन रात्री, नि मग पांचएक तास आगगाडीचा प्रवास! अन् आपल्याला दोघांनाही बोलावलं आहे—"

नानीच्या छातींत एकदम धडधडलं. काय बोलावं, तिला सुचेना. डोळ्यांपुढं

धावणाऱ्या बैलगाड्या उभ्या राहिल्या. माहेरची मोटारबस दिसली. कुठं तरी लांब, अनोळखी गांवीं लग्नांत मिरवायला मिळणार म्हणून ती हर्षानें कासावीस झाली.

दादू तेवढ्यांत म्हणाला, "शेटजी म्हणताहेत खरं, पण मला जाणं जमणार नाहीं. आठवडाभर इथें हिशेबठिशेब कोण ठेवणार? त्यांतून वसुली सारी राहिली आहे—"

दादूचे ते शब्द ऐकतांच नानीचा आनंद ओसरला. तिचा एकाएकीं फुललेला चेहरा तेवढ्याच झपाट्यानें उतरला. जाळ झालेल्या चुलींत पाणी मारून तिनं डोळ्यांत जमलेलीं आसवं टिपलीं.

दादू पुढें म्हणाला, "पण बाई तुला नेल्याशिवाय राह्यच्या नाहींत. अन् तुला एकटं जावं लागलं तरी जा. मी नि आई राहूं चार दिवस!"

नानी पुन्हा अस्वस्थ झाली. तिच्या मनांत परत आशा तरारली. पण एकटीला जायला मिळेल कीं नाहीं ह्या शंकेनें ती अस्वस्थ झाली. नवरा म्हणतो आहे खरा, पण आयत्या वेळेला...अन् शेटाणी तरी नक्की नेईल का?...

अनेक उलटसुलट विचारांनीं तिला जेवण जाईना. तसंच अन्न आवरून ती उठली. ताकाचं भांडं घेऊन वाड्यावर आली. बाहेरच्या बैठकीवर नवऱ्याला पाहा-तांच तिला आपल्या अधीरतेची शरम वाटली. आंत जाऊन तिनें महाराजाकडून ताक मागून घेतलें. वनमालाबेनच्या हातांना मेंदी बांधली. शेटाणीच्या पायाशीं बसून विहिणीचं वर्णन फिरून एकवार ऐकलं. तास दीड तास होत आला, पण कुणीच तिच्यासंबंधीं भापण करीना; तेव्हां तिनेंच विचारलं, "आम्हांलाहि यायचं आहे असं हे म्हणत होते आज—"

"हो तर!" शेटाणी बोलली, "तूं हवीस तर! तुला तरी कधीं गंमत पाहायला मिळणार? अन् परक्या ठिकाणीं वाढायला वगैरे माणसं लागतीलच! दादू आला नाहीं तरी तुला यायलाच हवं!"

शेटाणीच्या शब्दांबरोबर नानीच्या मनांत वाजंत्रीं वाजूं लागलीं. वनमालेचे मेंदीनें माखलेले हात धरून फुगडी खेळावंसं वाटलं तिला. पण तिनं मन आवरलं, ताकाचं भांडं सांवरलं व ती बाहेर आली. खालीं मान घालून लिहीत बसलेल्या नवऱ्याला पाहातांच ती परत दचकली. त्याच्या अंगावरून ती गेली. घरांत शिरतांच तिला गुणगुणावंसं वाटलं. पण नवऱ्याला यायला मिळत नाहीं नि आपण

मजा करायला मिळणार म्हणून नाचतों आहोंत, ह्या विचाराचं तिला भय वाटलं. ताकाचं भांडं तसंच चुलीशीं ठेवून ती खिडकींतून आकाशाकडे पाहात राहिली. कधीं निघायचं, किती दिवस आहेत अजून, नेसायला चांगलं लुगडंही नाहीं...सरी घालून गेलंच पाहिजे...गुजराचं लग्न म्हणजे जेवणावळी नि गाणीं...आपण पंगतीत वाढूं नि गाणंही म्हणूं !...उखाणा घ्यावा लागला तर नवऱ्याचं नांव...

दादूची आठवण येतांच नानीनें आपले विचार आवरले. ती चुलीशीं बसली व जाळ करूं लागली. नवरा एकटा राहील, अर्धकच्चं करून खाईल ह्या जाणिवेनं तिला वाईट वाटलं. त्याची खालीं मान घालून काम करणारी शांत व धिप्पाड आकृति आठवली. छे, तिचा नवरा तिला आवडत होता. देवासारखा होता. त्याला सोडून, हा संसार बाजूला करून, दूर जायला मिळणार म्हणून ती खुषींत खास नव्हती. नवऱ्याला सोडून पळून जाणारी ती गांवातल्या तेल्याची मुलगी नव्हती, अगर सासूला मारणारी शेटाणीची पुतणी नव्हती. नवऱ्याच्या संमतीनेंच, नवऱ्यासाठींच ती चार दिवस जाणार होती मालकाच्या मुलीच्या लग्नाला ...

पुन्हा लग्नाचे विचार मनांत घोटाळूं लागले. कसं असेल तें गांव, मिरवणुकी निघतील का?—एक ना दोन ! स्वैंपाक करतांना, उष्टीं काढतांना, गाद्या घालतांना, झोपेंतून उठतांना, सारा वेळ एकच चाळा तिच्या मनांत सुरू झाला. लहान मुली-सारखी ती कामं करतांना धडपडूं लागली. नुकत्याच वयांत आलेल्या मुलीसारखी गुणगुणूं लागली. खडकगांवभर तिला मोठा मांडव घातल्यासारखं वाटूं लागलं. गल्र्यागल्र्यांतून मिरवणुकी जात होत्या, अन् तिच्याच सोप्यांत जेवणावळ चालली होती... ती वाढीत होती. लफ्फेदार लुगडं सांवरीत होती...

मग जाण्याचा दिवस जवळ आला, उजाडला. नानी पहाटे उठली. अंगधुणं वगैरे आटोपून वाड्यावर जायला हवं. बैलगाड्या तयार असतीलच. उशीर झाला तर शेटजी ओरडतील. ती घाईनें उठली. शेजारीं शांत निजलेल्या नवऱ्याकडे अंधुक उजेडांत तिनें पाहिलं. तिला त्याचा अभिमान वाटला; अन् अपराध्यासारखंहि झालं. त्याची मूर्ति ती डोळ्यांत सांठवून ठेवूं लागली. धिप्पाड देह, केसाळ भुजा, हनुवटीवरचा खळगा, डाव्या कानशिलाशीं काळी उभी रेघ. सारा परिचयाचा चेहरा. पण तोच पुन्हा पुन्हा पाहात राहावंसं वाटलं. मन आवरून ती उठली. सर्व आटोपून तयार झाली. सासूबाईंना नमस्कार करून, नवऱ्याचा निरोप घेऊन

निघाली. नवरा तिच्याबरोबर वाड्यावर आला. गाड्या निघेपर्यंत थांबला. बैलगाडींतून दूर जाणाऱ्या नानीकडे पाहात दिंडीदरवाज्याजवळच्या दगडावर उभा राहिला.

खडकगांव सोडीपर्यंत नानीला विचित्र वाटलं. त्या अंधेऱ्या घराशीं ती एकजीव झाली होती. त्या उकिरड्यासारख्या गांवांत गुदमरून गेली होती. आणि आतां अकस्मात् त्या वास्तूपासून ती मोकळ्यावर आली होती. बराच वेळ तिला भोवळ आल्यासारखं झालं. नवऱ्याचा चेहरा तर सारखा दिसत राहिला. पण मग तिनं लवकरच सारं मनांतून दूर सारलं. बैलगाडीच्या हिसड्यांबरोबर तिचं मन मोकळं होऊं लागलं. आजूबाजूचं स्वच्छ आकाश नि हिरवा प्रदेश पाहतांच ती बहरली. गाडींतल्या बायांच्या विचित्र गाण्यांत आपला सूर रेखूं लागली.

दिवसभर प्रवास करूनहि नानीला थकवा आला नाहीं. रात्रीं एका ओसाड धर्मशाळेंत मुक्काम पडला व सर्वजणी झोंपल्या. पण नानी दूरच्या एका देवळाच्या पायरीवर बसून राहिली. थंडी अंगाला झोंबत होती. वर रुपेरी चांदणं ओसंडत होतं नि आजूबाजूला सारं शांत होतं. बैलगाड्या सोडल्या होत्या. धर्मशाळेंत कपड्यांचे, खाद्यपदार्थांचे पेटारे रचून ठेवले होते. बायका आडव्या आल्या होत्या. पुरुषमाणसं तर केव्हांच झोपलीं होतीं. तें शांत, सुंदर वातावरण पाहून नानीचं मन वेगळ्याच अवस्थेंत गेलं. तिच्या मनांत लग्नाच्या गडबडीचे अगर पुढच्या प्रवासाचे विचार आले नाहींत. स्वतःच्या आयुष्याची अगर नवऱ्याच्या चेहऱ्याचीहि आठवण आली नाहीं. डोळे मिटून ती शून्यपणें, समाधिस्थ बसून राहिली. कसलीच जाणीव न होतां, कसलाच बोध न होतां बराच वेळ बसून राहिली...

नानी भानावर आली ती दचकून! प्रथम तिला कांहींच कळेना. मग ती भयभीत झाली. तिच्या घशाला कोरड पडली. ओरडावं तर जीभ आंत ओढलेली. हातापायांतलंहि बळ गेलेलं. डोळे मिटीत, उघडीत, फिरवीत ती भोवतालीं बघूं लागली. तीसचाळीस काळेकभिन्न जवान पेटत्या मशाली व चकचकीत तलवारी घेऊन धर्मशाळेभोवतीं जमले होते. बायका उठल्या होत्या, पण बोबडी वळून, भोवळ येऊन खालीं कोसळत होत्या. ते लुटारू गुंड त्यांच्या अंगावरचे दागिने ओरबाडीत होते. नोकरांना दोऱ्यांनीं बांधलं जात होतं. शेटजी रडत रडत पायां पडत होते. तोंडावर बुरखा घेतलेला दरोडेखोरांचा पुढारी त्यांना ठोकरीनें दूर ढकलीत होता.

दरोडा! रामोशी लोक लग्नाचं वऱ्हाड लुटून नेत होते. नानीच्या सर्वांगाला कांपरं

भरलं. पायरीवरून ती बाजूला कोसळली. कांट्याकुट्यांत तशीच निश्चेष्ट पडून राहिली. समोरच्या माळावर ट्रंका, पेटारे मोकळे होत होते. कुड्या, बांगड्या, मोहनमाळा, चपलाहार, आंगठ्या नि कंठे पिशवींत भरले जात होते. साड्या, साफे, शालू, सिल्कचे कपडे ह्यांचे ढीग रचले जात होते. गुजराचे सारे लोक मेल्यासारखे मुसक्या बांधून पडले होते. दरोडेखोर मोकाट पोळांप्रमाणें धुडगूस घालीत होते. नानी पाहात होती. देवाचा धावा करीत होती. पंचप्राण एकवटून चूप बसली होती.

टोळीचा म्होरक्या दमदाटी करीत, हुकूम करीत हिंडत होता. हळूहळू तो देवळाशीं आला व पायरीवर उभा राहिला. मशाल उंच धरून, बुरखा दूर करून मार्गदर्शन करूं लागला. नानीनें तो येतांच भीतीनें गपकन् डोळे मिटले. तिचा श्वास संपुष्टांत आला, छातीचे ठोकेही मंदावले. तिला वाटलं, आपण मरणार आतां! जरा वेळानें तिनें पाहिलं, तों आंवराआंवर करीत दरोडेखोर परतूं लागले होते. नायक अजून नजीकच उभा होता. धीर धरून नानीनें हलकेच त्याच्याकडे नजर टाकली. हातांत मशाल धरून उभी असलेली त्याची आकृति केवढी दणकट होती! मशालीचा उजेड त्याच्या तोंडावर पडलेला होता. नानीनें डोळे किलकिले करून त्याच्या चेहऱ्याकडे पाहिलं. अन् मग तिचे डोळे एकदम विस्फारले! आ वासून, डोळे फाडून, ती त्याच्याकडे पाहात राहिली. अचलपणें पाहात राहिली!

पायरीवर खडा असलेला म्होरक्या बाजूला हालचाल झालेली पाहून दचकला. खालीं, कोपऱ्यांत नानी पडलेली होती तिथें गेला. जळता टेंभा दगडाला टेकवून नानीकडे पाहूं लागला. 'पळत्येस व्हय् ग? बगूं काय हाय अंगावर!—एक सरी तेवढी!...हुंः!' असं उद्गारत त्यानें तिच्या गळ्याला हात घातला व खसकन् सरी हिसकली. नानीनें भीतीनें डोळे मिटले. पण पुन्हा ती त्याच्याकडे वेड्यासारखी पाहूं लागली. मशालीच्या उजेडांत दिसणाऱ्या त्याच्या चेहऱ्याकडे, त्याच्या हनुवटीकडे, कानशिलाकडे, नाकाकडे...

नायक निघून गेला, पण नानीचं आश्चर्य वाढतच गेलं. त्या नायकाचं दादूच्या चेहऱ्याशीं केवढं विलक्षण साम्य होतं! भव्य शरीर नि मोठाड तोंड. हनुवटीवरचा खड्डा तसाच. तशीच डाव्या कानशिलापासची उभी काळी खूण. धारदार, बांक आलेलं नाक आणि पाळ्या चिकटलेले कान. तसेच, तेच! अगदीं दादूसारखाच दिसत होता तो दरोडेखोर! केवढं आश्चर्य! केवढं विचित्र!

घर सोडतांना पहाटेच्या अंधुक प्रकाशांत, दाराजवळच्या दगडावर उभा असलेला दादू तिला एकदम आठवला. त्याचा चेहरा, हनुवटी, डोळे. जेवतांना, निजतांना, लिहितांना—नवऱ्याचीं नाना रूपें तिच्याभोवतीं फिरत राहिलीं. आणि आत्तां मशालीच्या प्रकाशांत पाहिलेली त्याचीच प्रतिकृति तिला दिसत राहिली. केवढा सारखेपणा! तोच चेहरा, तोच तो! नानी वेडीपिशी झाली; विस्मयानें विद्ध झाली!

दरोडेखोर दूर गेले. सारें मौल्यवान् सामान घेऊन अदृश्य झाले. अन् मग एकच रडारड सुरू झाली. शेटाणी छाती पिटूं लागली. शेटजीनें गळा काढला. इतरांची धडपड, धांदल, आरडाओरडा आकाश व्यापूं लागला. रानांतल्या कुत्र्या-कोल्ह्यांचीं केकाटणीं त्यांतच मिसळलीं. एकच आक्रोश चौफेर सुरू झाला. नानीचं मन त्यानं अधिकच उध्वस्त झालं. आपण कुठें आहोंत तेंच तिला कळेना. आपण कुणाचा चेहरा आठवत आहोंत तेंच तिला उमगेना. दादूचा कीं दरोडेखोराचा?...



खडकगांवांत एकच चर्चा चालू होती. बळराम दरोडेखोरानें गुजराला लुटलं! मुलीच्या लग्नाला गुजर निघाला असतांना बळराम दरोडेखोरानें वाटेंत वऱ्हाड वेढलं. जडजवाहीर, भांडीं, रोकड, कापडचोपड—सारं लुटून नेलं. कुणाच्या अंगाला हात लावला नाहीं, पण शेटजीला साफ केलं. व्याह्याचंच कर्ज काढून गुजरानं कशीबशी पोरगी उजवली व छाती पिटीतच तो परतला.

सुतकी चेहऱ्यांनीं लग्न लावून परतलेल्या मंडळीबरोबर नानीहि आली. बैलगाडीं-तून मधल्या आळींत उतरली. आपलं लुगड्यांचं बोचकं घेऊन घराशीं आली. पुरी रात्र झाली होती व दार बंद होतं. क्षणमात्र ती पायरीवर घुटमळली. नवऱ्याचं दर्शन होणार ह्या कल्पनेनें ती विलक्षण दचकली. दरोड्याच्या रात्रीचा सारा प्रसंग खाडकन् तिच्या दृष्टीपुढें उभा राहिला. ती अधिकच भांबावली. जोरानें कडी वाजवूं लागली.

मिणमिणती चिमणी हातांत धरून दादूनें दार उघडलं. नुकताच तो निजत होता. त्यामुळें डोळे जडावले होते. अंधुक प्रकाशांत त्याचा चेहरा चकाकत होता. नानी दारांतूनच भ्रमिष्टासारखी पाहात राहिली. त्याच्या कानांकडे, कानशिलाकडे, हनुवटीकडे, नाकाच्या टोकाकडे!—तोच चेहरा, थेट तसाच! तिनें पाहिलं तों त्या मिणमिणत्या चिमणीची वात ज्वाळा ओकणारी मशाल झाली. उजव्या हातानें त्यानें धरलेल्या दाराच्या कडीच्या ठिकाणीं भाला उभा झाला. खांद्यावरच्या धोतराच्या सोग्याची

काळी घोंगडी बनली. बळराम दरोडेखोर ! असाच, अगदीं हाच. अग बाई, केवढं साम्य ! अरेरे, कसलं हें दैव !...

"बघतेस काय वेंधळ्यासारखी !—आंत ये !" घोगऱ्या आवाजांत दादू उद्गारला. नानी भानावर आली. आंत आली. ती ओसरी, तें स्वैंपाकघर, चिरगुटं, गाद्या, भांडीं, तें भोंवतालचं कुंद वातावरण नि कुजट वास—सारं दिसतांच तिला शुद्ध आली. प्रवास, लग्न, दरोडा सारं विरून गेलं. हेंच तिचं जग, तिचा कोंड-वाडा. आतां पुन्हा इथेंच मरतमढ्यासारखं राहायचं ! नानीला जाग आली, जाणीव झाली. त्या जड जगाशीं एकजीव व्हायला ती सिद्ध होऊं लागली. पण तो चेहरा ...चमकून नानी परत नवऱ्याकडे पाहूं लागली.

दादू गडबडीनें टोपी चढवून निघाला. "दरोड्यांत सारं धुवून गेलं ना?—शेटजीवर आभाळच कोसळलं म्हणायचं. मी जाऊन येतों वाड्यावर. खूप रात्र झाली तर तिथेंच थांबेन. तूं त्या वेळणीखालची भाकर खा नि झोप. आईला पाणी दे..." घाईनें दार उघडून दादू अंधारांत अदृश्य झाला.

नवरा गेला तरी नानी तशीच अवघडून उभी होती. कधींतरी ती गादीवर बसली. सासूला पाणी द्यायचं अगर स्वतः भाकरी खायचंहि ती विसरली. थक्क होऊन ती बसली होती. तिची कल्पना होती कीं, त्या दिवशीं रात्रीं मन मोकळं होतं, आजूबाजूचं वातावरण वेगळं होतं, त्यामुळें आपल्याला भास झाला सारा ! पण नवऱ्याची मुद्रा पाहातांच पुन्हा तिला बळरामाचा चेहरा आठवला. तिला भ्रम झाला नव्हता. भास झाला नव्हता. हुबेहूब तसाच चेहरा दोघांचा. दादू देश-मुखाचा व बळराम दरोडेखोराचा. नवऱ्याचा नि रामोश्याचा...

दोघांची आलटून पालटून आठवण करतां करतां ती आडवी झाली. तशीच तिला झोंप आली. झोपेंतहि ती दोघांचा चेहरा पाहात होती, आणि तिचा विलक्षण गोंधळ होत होता. विचित्र, वेड्यावाकड्या स्वप्नांनीं तिची झोप व्यापून गेली. त्या विद्रूप स्वप्नानेंच ती दचकून जागी झाली. आपल्याला दिसलेल्या दृश्यांची तिला लाज वाटली. आपल्याला सुचणाऱ्या विचारांचं तिला भय वाटलं. काय करावं, कळेना ! रात्र अजून संपायची होती. नानी उठली व देवाशीं बसली. आपल्या शीलाला, शुद्धतेला पोखरणाऱ्या भुंग्यांचा त्रास कमी व्हावा म्हणून देवापुढें हात जोडून जागत राहिली.

पहाटे ती उठली व पदर बांधून कामाला लागली. दादू सकाळीं घरीं परतला, पण लगेच बाहेरगांवीं निघाला. गुजराचा डीग दरोडेखोराच्या दणक्यांनीं आजारी होता, त्यामुळें शेजारच्या गांवांतलीं कांहीं किरकोळ कामं दादूकडे आलीं. नानीला नवरा गेल्याचं बरंच वाटलं. त्याची मुद्रा, त्याची आकृति दिसतांच तिला विचित्र वाटे. तो गेल्यावर तिनें घराच्या भिंती सारवायला घेतल्या. उंच केरसुणी तयार करून आढ्याचीं जळमटं काढायला सुरुवात केली. अंगणांतले पोपडे उकरून जमीन चोपायला सुरुवात केली. सगळे कपडे धुवायला घेतले. देव घासले. तपेलंभर पाणी तापवून न्हायचं ठरवलं. काम, अविश्रांत काम करून आपलं मन मोकाट सुटायला तिनं संधि दिली नाहीं. गुजराकडे गेलं कीं दरोड्याचा विषय निघेल म्हणून बोलावणं आलं तरी तिनं जाण्याचं टाळलं. दोन दिवस ती अंग मोडेपर्यंत काम करीत राहिली. सासूबरोबर तिनें सोमवारचा कडकडीत उपासहि केला. आपल्या मनांतलीं भुतं नाहींशीं झालीं असं तिला वाटलं तेव्हां तिनें सुस्कारा सोडला.

मध्यान्हीला, उशाशीं जुनेर घेऊन नानी माजघरांत शांतपणें झोपली होती. स्वप्नं नव्हतीं नि मनहि खात नव्हतं....पण धान्याच्या डब्यांत उंदीर खुडबुडला नि ती दचकून उठली. तिला वाटलं, बळरामच बोलावतो आहे ! पण गलेलठ्ठ उंदीर धान्याच्या पिपाशीं तोंड करून उभा होता. नानी पुन्हा सुन्न झाली. तें उंदरांचे खेळ तिला पहावेनात. अन् पहातां पहातां ती त्यांच्या धांवण्यांत, लपण्यांत, लूट पळविण्यांत रंगून गेली. त्याच तंद्रींत ती उठली. सासूबाईंना काढा करून देत त्यांच्याजवळ बसली. सासऱ्याचा, सासूच्या सासऱ्याचा, दादूच्या साऱ्या पूर्वजांचा विषय काढून म्हातारीला बोलकी करूं लागली. जुन्या आठवणी निघतांच म्हातारीच्या तोंडाचा पट्टा सुरू झाला. दादूचा बाप, आजा, देशमुखांचे सारेच पुरुष पहाडासारखे प्रचंड देहाचे होते. आणि सारेच शांत, सुस्त होते. त्यांच्या दगडासारख्या देहांत लोण्याचीं हृदयें होतीं. अन् खडकगांव सोडून एकहि जण जन्मांत बाहेर गेला नव्हता ! सासूनें सांगितलेला इतिहास ऐकतांना नानीला गंमत वाटली. दरोडे घालणाऱ्या बळराम रामोश्याचा विचार तिच्या मनीं वावरूं लागला. गांवोगांव जंगलांतून तो सैराट हिंडत असेल—लुटालूट, मारामाऱ्या करीत ! तिचा नवराहि बळरामासारखा होता. पण किती सभ्य, सरळमार्गी. नानी सासूपासून दूर झाली. ओसरीवर आली. बाहेर अंधार पसरत होता. आकाशांतल्या ढगांच्या गूढ सावल्या ती नेहमीं पाहात असे. आज तेथें तिला काळ्या मेघांतून अनेक रामोशी दिसूं

लागले. कांबळीं पांघरलेले लुटारू अन् त्यांमधून बळरामासारखा पुढें येणारा, प्रकाश पसरणारा चंद्राचा तुकडा ! नानीला तें चंद्रबिंब निरखतांना हुरहूर वाटूं लागली. त्या चंद्रासारखाच तिचा नवरा समोरच्या अंगणांतून ओसरीवर आला. नानीच्या जवळ आला. नानी दचकून उठली. जवळ उभ्या असलेल्या नवऱ्याच्या आकृतीकडे पाहाताच तिच्या अंगावर रोमांच तरारले. आणि कित्येक वर्षांनंतर तिला दादूबद्दल ओढ वाटली. स्वतःचा तोल सांवरीत ती आंत गेली. दादूला तोंड धुवायला पाणी देण्याऐवजीं स्वतःच पाण्याशीं खेळूं लागली.

त्या क्षणापासून नानीच्या मनाला वेगळंच वळण लागलं. तिच्या डोक्यांत एक नवाच चाळा सुरू झाला. तिला जगण्यांत गंमत वाटूं लागली. संसारांत स्वारस्य वाटूं लागलं. इतर स्त्रियांसारखं साधं, सरळ प्रेम नव्हे, तर जगावेगळी, विवाहा-वेगळी अशी आपली त्याच्यावर प्रीत आहे असं तिच्या मनानें घेतलं. नवऱ्याकडे ती वारंवार. बघे. दुरून, जवळून, टक लावून! त्याचा धिप्पाड देह दृष्टीला पडतांच तिच्या डोळ्यांत पेटत्या मशाली नाचूं लागत. दरोड्याच्या माळरानावरील थंडी तिच्या सर्वांगाला दंश करूं लागे. त्याचं शरीर म्हणजे तिला जणूं दरोड्यांत सांपडलेला ठेवा होता ! त्या पिळदार शरीरासाठीं ती आंघोळीच्या वेळेला तेलहळद ठेवी. कढत पाणी ठेवी. दादू रागावे तरी बळेंच त्याची पाठ चोळी. गुजराकडून आणलेले बदाम वाटून कधीं खीर करी, तर कधीं सायसाखर. सर्पणासाठीं लाकडांचे ओंडके त्याला फोडायला सांगे व कुऱ्हाडीचे घाव घालतांना त्याचे दंड टरारले कीं तिचं काळीज बेबाळ होई. आणि रात्रीं तो शांतपणें घोरत पडला कीं ती आसक्तीनें, अचंब्यानें त्याची हनुवटी नि नाककान निरखीत बसे.

गुजराच्या घरची घडी आतां पुन्हां बसली होती. दरोड्यानें आलेलं दैन्य शेटजीनं झपाट्यानें दूर केलं होतं. व्यापार वाढवून, सतरा लफडीं करून पुन्हा पेढी थाटली होती. तिजोरींत नोटांचीं पुडकीं नि बायकांच्या अंगावर सोन्याचे डाग सांचूं लागले होते. आणि त्याबरोबर घरांतलं धास्तीचं, दहशतीचं वातावरणहि विरून गेलं होतं. त्या रात्रीची आठवण काढून शेटाणी शेटजींची थट्टा करूं लागली व शेटजी बळरामाबद्दलची माहिती सांगूं लागला. नानी अशीच एकदां जेवायच्या वेळेला वाड्यावर गेली तेव्हां शेटजींचं बोलणं तिला ऐकायला मिळालं. बळराम दरोडेखोराचे म्हणे शंभर साथीदार आहेत. तो डोंगरांतल्या गुहेंत राहतो नि खेड्याखेड्यांतून त्याला मदत करणारीं माणसं आहेत. कुऱ्हाड, भाला, तलवार इत्यादि तो वापरतोच,

पण त्याच्याजवळ एक बंदूकहि आहे. मोठमोठ्या पोलिसप्रमुखांना नि मोठमोठ्या पोलिसतुकड्यांना त्यानें धूळ चारली आहे. सगळा डोंगर वेढला, गांव वेढला तरी सांपडत नाहीं. दोन हात करीत चालून येतो, अगर वेषांतर करून पसार होतो. अन् तो कसा आहे हेंच कुणाला ठाऊक नाहीं. त्याचा पुसट फोटोहि पोलिसांना मिळत नाहीं...

शेटजींचे शब्द ऐकतांच नानीच्या दृष्टीपुढें बळरामाची आकृति लखकन् उभी राहिली. तिच्या डोळ्यांत, हृदयांत त्याचा फोटो स्पष्टपणें उठला होता. पोलिसांनीं नि अधिकाऱ्यांनीं न पाहिलेला पुरुष तिनें पाहिला होता. तिनें मिळवला होता ! नानी तशीच परतली व बाहेरच्या ओसरीवर आली. दादू बोरूला टोक करीत होता. त्याला पाहतांच तिचं मन, ऊर भरून गेलं. त्याचा देह, त्याचं बांकदार नाक, हातांतला धारदार चाकू ! तिला एकदम वाटलं कीं दादू बळरामासारखा दिसतो हें कळलं तर शेटजींची केवढी तिरपिट होईल ! 'अयाई ग ! मेलों मेलों ! पायां पडतों, सारे दागिने देतों, माझे प्राण घेऊं नको ! हाय रे डाकोरनाथ...' शेटजींची विव्हळणारी मूर्ति आठवून तिला अनिवार हसूं फुटलं. ओंठांतून, आडव्या धरलेल्या पंज्यांतून तें हसणं बाहेर आलं, वाड्यांत घुमलं.

तिचं हसणं ऐकून दादूनें वर मान केली. नानीला तसं हसतांना पाहून त्याला आश्चर्य वाटलं अन् तेवढ्यांत धोतराच्या सोग्याला तोंड पुशीत शेटजी बाहेर आले. दादूची बायडी दारांत उभी राहून कां हसते आहे हें त्यांना कळेना ! शेटजी नि नवरा दोघेहि आपल्याकडे बघत आहेत असं दिसतांच नानी बावरली. खालच्या मानेनं आपल्या घरीं पळून गेली.

त्या रात्रीं नवऱ्यानें तिच्या हसण्याचं कारण तिला विचारलं. पण नानीनें वेळ मारून नेली. दादू बळरामासारखा दिसतो हें सांगावं कसं, असं तिला पूर्वी वाटत असे. तसं म्हणणं म्हणजे नवऱ्याचा अपमान करण्यासारखं होतं. इतरांनीं तर मूर्ख म्हटलंच असतं, पण नवऱ्यानेंहि तिला वेड्यांत काढलं असतं. दरोडेखोराशीं साम्य आहे हें ऐकून तो चिडलाहि असता. आजकाल ती वेडावली होती व तिला वाटत होतं कीं कधीं तरी लाडांत येऊन त्याला कौतुकानं सारं सांगावं ! पण शेटजींचं बोलणं ऐकल्यावर तिचा बेत बदलला. तिचा नवरा बळरामासारखा दिसतो हें एक मोठं गुपित होतं. फक्त तिलाच तें ठाऊक होतं. तिचंच एकटीचं

तें गुपित! शेटजीला, पोलिसांना, जगालाहि तें टाऊक नव्हतं. तें कुणालाच, कधींच कळूं नये; फक्त तिलाच! नवरा भोळसटासारखा 'हसलीस कां' म्हणून विचारूं लागला तेव्हां तिनें मोठ्या धिटाईनें तिचं गुपित लपवलं. अन् नवऱ्याचा निर्विकार चेहेरा पाहून तिला पुन्हा हसूं आवरेनासं झालं.

मग ती मुद्दाम वाड्यावर बळरामाचा विषय काढूं लागली. गड्यांच्या बरोबर काम करतांना, शेटाणीच्या समोर बसतांना, ती दरोड्याच्या हकीकती उकरून काढी. बळरामाचं नांव काढलं कीं सारे थरथरत, अन् तें पाहतांच नानी फुलून जाई. शेटजी आठवड्याचं वर्तमानपत्र वाचून शेटाणीला कधीं बळरामाची बातमी सांगत. अमक्या ठिकाणीं त्यानें दरोडा घातला, तमका गांव लुटला, सावकाराचं नाक कापलं, फौजदाराला पळवून लावलं...एकेका बातमींभोंवतीं नानीचं मन पिंगा घाली. शंकराच्या देवळांत, गांवांतल्या ज्योतिष्याकडे, कुळकर्ण्याच्या म्हातारीकडे, कधीं असल्या गप्पा निघाल्या कीं नानी कधीं नाहीं ती हजर होई. बळरामाच्या अद्‌भुत, अचाट गोष्टी कुजबुजणाऱ्या बायाबापड्या पाहून तिला कींव येई, हसूं येई. बिचाऱ्यांना काय कल्पना दरोड्याची? कुठें पाहिलं होतं त्यांनीं बळरामाला? अन् प्रति-बळराम खडकगांवांत आहे, हें तरी कुठें त्यांना टाऊक होतं?

खडकगांवाकडे आतां नानी वेगळ्याच वृत्तीनें पाहात होती. तिच्या मनाला व मेंदूला नवी झिलई चढली होती. निवडुंगांचे फड कसे हिरवे कंच झाले होते नि लाल बोंडांनीं डवरले होते. खडकगांवचा ओढा अवखळपणें वहात होता. पडके तट अनेक गूढ गोष्टी सांगत होते. धुळीच्या वाटा, कुडीं घरं, खंगलेलीं माणसं, म्हसोबाचे धोंडे—एक अद्‌भुत जादूची नगरीच होती तो गांव म्हणजे! आणि त्यांत नानीचं बिऱ्हाड म्हणजे एक गुप्त गुहा. नानीला घरचीं चिरगुटं म्हणजे लुटून आणलेले भारी शालू शेले वाटूं लागले. चार पितळेचीं भांडीं मोलाचीं झालीं. वळचणीची कुऱ्हाड, कोपऱ्यांतली विळी, महत्त्वाची वाटूं लागली. त्या विचित्र गुहेंत तिच्या धिप्पाड धाडशी नवऱ्यासह ती अद्‌भुत जीवन जगत होती. घरांत वावरतांना तिला वेगळंच वाटूं लागलं. निराळ्याच नजरेनें ती इतर लोकांकडे पाहूं लागली. नवरा घरीं आला कीं तिला वाटे, हा तल्वार गाजवून, कामगिरी करून सुखरूप घरीं आला. तो गेला कीं तिला धाकधुकी वाटे. त्याला पोलिस पकडतील? दरोड्यांत तो जायबंदी होईल? आज काय काय सोनंनाणं आणील? नानीचं आयुष्य एक विचित्र स्वप्नच होऊन बसलं......आणि ह्या गोड

गुपितांत व अद्‌भुत स्वप्नसृष्टींत उरलेलं आयुष्य मजेंत जाणार ह्या जाणिवेनें तर तिला अस्मान ठेंगणं झालं होतं.

मग एक दिवस रात्रीं जेवतांना दादूनें सांगितलं, "वर्तमानपत्रांत छापून आलं आहे कीं, बळराम खडकगांवच्या दिशेनें डाके घालीत येत आहे. इकडे आला तर महिनाभरांत तरी तो यावा......"



खडकगांवांत एकच कुजबूज सुरू झाली. बळराम दरोडेखोर जिल्हाभर पुंडाई करीत आहे. खास पोलिसपार्टीलाहि दाद देत नाहीं. एकामागून एक अंमलदार अपयश घेऊन परतत आहेत. जागोजागीं अचानक छापे घालीत तो विजेसारखा फिरत आहे. खडकगांव पंधरवडाभरानं तरी लुटलं जावं! गुजराचा वाडा, पाटलाचं घर, किंवा सारा गांवदेखील...

सारी वस्ती चपापली होती, कावरीबावरी झाली होती. गुजर सारी चीजवस्तु हलवण्याचा विचार करीत होता. शेटाणी माहेरीं पळणार होती. दादू उरलेले हिशेब अहोरात्र उतरून काढीत होता. शेटजीवर संकट म्हणजे त्याच्या संसारावरच सांवट येण्यासारखं होतं. त्याचं गरिबाचं घर लुटलं तर आईला व नानीला कसं पोसायचं ह्याची त्याला विवंचना पडली होती.

नानी सारं पाहात होती. उघड्या डोळ्यांनीं, उजाड मनानं! क्षितिजावरचे ढग आतां तिच्या डोईवर जमले होते. जें गुपित तिच्या हृदयांत घुटमळत होतं तें आतां तिच्या नजरेपुढें भिरभिरूं लागलं होतं. तिची आकाशांतली दृष्टि सरळ झाली व पाय भुईला टेकले. तिच्या स्वप्नसृष्टींतले सोनेरी रंग उडून गेले. खडकगांव परत मुर्दाड खेडं झालं. गुप्त गुहेचा परत साधा संसार बनला. त्याभोंवतालचं अद्‌भुत वातावरण विरून गेलं. बळराम जवळपास धुडगूस घालीत आहे, कधीं तरी तो खडकगांवांत येणार ह्या जाणिवेच्या आंचेनें तिची कल्पनासृष्टि वितळून गेली. पुन्हा पुन्हा ती त्या खेळांत रमण्याचा प्रयत्न करी. भेदरलेल्या गांवकऱ्यांना हसण्याचा यत्न करी. आपलं बिऱ्हाड म्हणजे लपण्याची गुंफा आहे असं मानी. आपल्याभोंवतीं अज्ञाताची, अद्‌भुताची चंद्रकळा लपेटलेली आहे अशी कल्पना करी. पण मग कुणी म्हणे, बळराम परवां येणार, खडकगांव लुटणार! कुणी सांगे, इथल्या सगळया श्रीमंतांना तो लुटणार. बायकांची बेअब्रू करणार!—अन् मग

नानी भानावर येई. सत्य सृष्टीकडे भोवळ येऊन बघत राही. गांवाकडे, संसाराकडे, पतीकडे पाहात राही.

दादू सारा वेळ वाड्यावर मान मोडून लेखणी चालवीत असे. केव्हांहि पहावं, मांडी घातलेली, मान खालीं केलेली व वीतभर बोरूनें आंकडे मांडणं चाललेलं. निर्जीव हिशेब—रुपये, आणे, पै! घरीं येई तो दुखणारी मान नि बोटं मोडीत. हिशेबांच्या घोटाळ्यानें कावलेला. दरोड्याच्या कल्पनेनें भेदरलेला. रात्रीं बळरामाच्या भीतीनें त्याला झोप येत नसे. घरांतले चार डाग कसे सांभाळावेत ह्या काळजीनें तो कावराबावरा झाला होता. नानीला म्हणत होता, "बळरामाच्या भीतीनें मला कांहीं सुचत नाहीं. अन् तूं मख्खपणें काय बसतेस? तूं कशी इतकी शांत?—"

नानी शांत नव्हती. तिच्या मनांत घालमेल होत होती. दादूभोवतीं विणलेला कल्पनांचा गोफ गळून जात होता. पूर्वी तो घरीं येई तेव्हां ती मनाशीं म्हणत असे कीं, स्वारी मुलुखगिरी करून आली, केवढी मोठी मोत्यादागिन्यांची लूट घेऊन आली. तो घरीं नसे तेव्हां ती कल्पना करी कीं, आत्तां दादू जंगलांत दौडत असेल, तळपणारी तलवार घेऊन...पण सारं खोटं होतं; तें खोटंहि टिकत नव्हतं. धाडसी-पणाचं—अमानुष आयुष्याचं घातलेलं कवच जाऊन बोरू चालवणारा, सावकाराचे हिशेब लिहिणारा, सुस्त, नेभळट नि भेदरट दादू परत पूर्वीच्या रूपांत तिच्या दृष्टीसमोर उभा राहिला होता! तिला वाटे, तरतरां वाड्यावर जावं व दादूच्या हातांतला बोरू फेकून द्यावा. बळराम तिकडे तलवार फिरवीत मुलूख पालथा घालीत आहे, मान वर करून दरारा बसवीत आहे. अन् हा?...संध्याकाळीं दादू ओसरीवर आळशीपणानें विडी फुंकत बसला कीं तिला वाटे, त्यानें आखाड्यांत जावं, तालमींतल्या पोरांना पेच शिकवावे. आत्तां कदाचित् बळराम आपल्या साथीदारांना दीक्षा देत जंगलांत बसला असेल. रात्रीं दोनचार चांदीचे डाग उराशीं घेऊन दादू विचार करीत बसला कीं नानीला ब्रह्मांड आटवे. चिमणीच्या उजेडांत उंदीर खुडबुडला कीं दादू दचकून जागा होई. हा इकडे पोत्यांतल्या उंदराला भितो; आणि ह्या वेळेला तो तिकडे अंधेऱ्या गुहेंतून सिंहासारखा बाहेर पडत असेल....

बळरामाबद्दलच्या खोट्यानाट्या कंड्या ऐकून नानी अधिकाधिक उन्मळून जात होती. दादूबद्दल निरुत्साही होत होती. आणि नकळत बळरामाबद्दल आतुर होत

होती. गांवांत फिरणाऱ्या बातम्यांबरोबर तिचं मन बळरामाकडे भटकूं लागलं. दाट जंगलांतून, पूर आलेल्या ओढ्यांतून, भयाण भुयारांतून, पडक्या तटाआड, मुसक्या बांधलेल्या माणसांमधून, लुटलेल्या मालाभोंवतीं! ती कशीबशी अन्न शिजवी, उष्टीं काढी व अंथरुणं घाली. पण तिचं मन दादूपासून दुरावलं होतं. आणि बळरामा-भोवतीं भिरभिरत होतं. आपल्या विचित्र विचारांचं तिला आश्चर्य वाटे. स्वतःचीच दया येई, भय वाटे. प्रतिक्षणीं बळरामाबद्दल बातम्या येत. कुठल्या क्षणीं तिच्य आयुष्यांतल्या अद्भुत कालखंडाचा कपाळमोक्ष होणार ह्याचा अंदाज लागत नव्हता. ती व्याकुळ झाली होती. व्यामोहांत विव्हळत होती.

अमावास्येच्या दिवशीं दादू घाबऱ्या घाबऱ्या घरीं आला. पांच मैलांवर बळ-रामाचा तळ पडला आहे अन् तो पहाटे पुढें जाणार आहे, अशी छाती फोडणारी बातमी त्यानें आणली. तो चांगलाच घाबरला होता. खडकगांवांत दरोडा पडणार याची त्याला खात्री होती. घरांतलं किडुकमिडुक आडजागीं दडवण्याच्या उद्योगाला तो लागला होता.

अडीच कोसांवर बळराम होता! खडकगांवच्या पूर्वेकडच्या जंगलांत एका दगडावर मशाल घेऊन उभा असलेला बळराम नानीला दिसलादेखील! तिला काय करावं, कुठें पाहावं, तेंच कळेना. डबोलं लपवून दादू घरांत आला. दारं भक्कम लावून त्यानें मोठे अडसर घातले. त्यामागें पहार, पाटा ठेवला. नानीला कसंसंच झालं. दादूचं हसू आलं, शिसारी आली, आणि करुणादेखील! त्याचा काय दोष? चेहेऱ्याचं साम्य असणं, मोटाड देह असणं, हा त्याचा अपराध कसा? तिला वाटलं, सांगावं सारं नवऱ्याला. तो नाहीं हसणार, नाहीं भडकणार. नाहीं तरी पंहाटेपर्यंत साऱ्या खडकगांवांत कदाचित् कळेलहि. आपलं स्वप्न संपलं आहेच, आतां अब्रूहि जाणार आहे. ती त्याच्याजवळ गेली. तो गादी घालीत तिला म्हणाला, "भिऊं नकोस. बळराम आला तरी आपल्याला काय करणार? आपली सरी तर आधींच नेली आहे त्यानं. ये, शांत झोप. मी आहें ना!..." त्याचे तें फुसके शब्द नानीचं हृदय फाडून गेले. ती आडवी झाली. घामानें चिंब झाली.

दादूचा डोळा लागला, पण नानीला झोप येईना. दादू निजलेला समजतांच तर ती डोळे उघडून अंधाराकडे टकमकां पाहूं लागली. ती काळरात्र तिला सतावूं लागली. जवळ असलेला नवरा नि जंगलापलीकडे असलेला दरोडेखोर. दोन चेहरे, एकच रूप!—काय भयंकर आहे सारं! हें सारं खरं आहे कीं भास आहे?

काय होणार आज दरोडा पडल्यावर, अन् काय होणार उद्यांपासून आयुष्यभर? नानी तळमळूं लागली. तिला वाटलं, हळूच उठावं नि बळरामाला बघून यावं. खात्री करून घ्यावी. शंका फेडून घ्यावी!—नवऱ्याला सोडून, दार उघडून जंगलांत जायचं, अंधारांत, कांस्याकुत्र्यांत जायचं, ह्या कल्पनेनेंच तिला कांपरं भरलं. पण परत वाटलं कीं हीच एक संधि आहे. सगळा गोंधळ अशानेंच संपवितां येईल. तिला अवसान आलं. पण परपुरुषाकडे चोरून जायचं ह्या कल्पनेनें ती भ्यायली. अंमळशानें तिचा स्वप्नाळू धाडसी स्वभाव पुन्हा उसळूं लागला. विचार करून करून अखेर तिला भोवळ येऊं लागली...

...ती हलकेच उठली. मागलं दार उघडून चोरपावलांनीं घराबाहेर आली. रस्ता निर्जन होता नि आकाश अंधारलेलं. ठेचाळत, धडपडत ती गांवाबाहेर आली. पडक्या तटांतून, निवडुंगांच्या फडांमधून जंगलांत घुसली. खडे टोचत होते, कांटे मोडत होते, थंडी झोंबत होती, रक्त ओघळत होतं. पण ती पुढें पुढें पळत होती.

बरंच पुढं गेल्यावर तिला मशालीचा उजेड दिसला. ती झाडाआडून पाहूं लागली. फेर धरून रामोशी नाचत होते. हेल काढीत, ढोल बडवीत. मध्यभागीं दागिन्यांचा नि कपड्यांचा ढीग पडला होता. आणि उंच दगडावर बळराम बसला होता. तोच, तसाच, त्याच चेहऱ्याचा बळराम!

नानी थरथरली. तिच्या बांगड्यांचा आवाज झाला. बळरामाचं लगेच लक्ष वेधलं. त्यानें टाळी वाजवली व कांहीं कळायच्या आंत चार रामोश्यांनीं नानीला काढण्या घालून कैद केलं. बळरामापुढें ओढीत आणलं.

दरोडेखोरांनीं वेढलेली नानी कांपूं लागली. रडूं लागली. सोडून देण्यासाठीं विनवूं लागली. पायां पडत ती म्हणाली, "मी पोलिसांकडून नाहीं आलें. माझ्या नवऱ्याच्या चेहऱ्याशीं तुमचं विलक्षण साम्य आहे...म्हणून..."

आणि मग सारे दरोडेखोर मोठ्यानें विकट हसत सुटले. बळराम डोळे मोठे करून म्हणाला, "काय थापा मारते आहे ही बया! आणा रे पळवून कुठच्या त्या दादू देशमुखाला! नसला माझ्यासारखा तर डोकीं उडवा दोघांचीं. अन् असला तर ठेवा दोघांना आपल्या टोळींतच. माझ्याऐवजीं त्या ब्राप्याला पोलिसापुढं करतां येईल."

लगेच धावाधाव झाली. दादूला अलगद अंथरुणांतून उचलून आणलं गेलं.

त्याची ओबडी वळली होती. चेहरा पडला होता. पण चेहऱ्याचं साम्य तेंच! मग त्याला पोशाख चढवला. सुरवार आणि तलवार!—तो पुरेपूर बळराम बनला. नानीला आतां तर अगदींच ओळखेना. कुठला नवरा नि कुठला परका!

मग नवराबायकोची एकच परवड सुरू झाली. खायलाप्यायला भरपूर, पण सक्त नजरकैद. अन् दादूला बळरामाचं नांव घेऊन पोलिसांपुढें जावं लागे. पळावं लागे. पोलिसांना अशी हुलकावणी देऊन बळराम आणिक दरोडे घालूं लागला. दादू पोलिसांशीं सामना देऊं लागला. नानी कैदेंत, गुहेंत सारा वेळ रडत बसूं लागली...

...नानी दचकून जागी झाली. पहाट झाली होती. त्या भयंकर स्वप्नाची आठवण येऊन ती भेदरली. पाप्यासारखं, अपराध्यासारखं वाटलं तिला. ती उठली व देवापाशीं बसली. केवढे भयंकर विचार तिच्या मनांत वणवा पेटवीत होते! काय पाप केलं होतं तिनं, आणि कशी तिची सुटका होणार होती? एका कोपऱ्यां-तल्या छोट्याशा निद्रित गांवढ्यांत जन्म घालवतांनादेखील केवढं विलक्षण अद्भुत आयुष्य तिच्या वांट्याला आलं होतं!

दादू जागा झाला व जरा वेळानें कामावर गेला. पण तो लगेच परतला. छाती फुगवून आनंदानें म्हणाला, "बळरामाला पहाटे पकडलं म्हणे. पोलिसांनीं त्याला नीट बंदोबस्तांत नेलं. जिल्ह्याच्या गांवीं न थांबतां तडक मुंबईला नेणार आहेत त्याला. उद्यांच्या वर्तमानपत्रांत येईल सारं छापून..."

नानीच्या छातींत धडधडलं. आपल्याला आनंद झालाय् कीं खेद तें तिला कळेना! एका विचित्र, गुप्त दुःखांतून ती सुटली खरी, पण—पण आतां बळरामाचं छायाचित्र प्रसिद्ध झाल्यावर वाड्यांतले, गांवांतले सारे लोक म्हणणार, हा तर दादूसारखा दिसतो! दादू दरोडेखोरासारखा दिसतो. दादूकडे लोक विचित्र दृष्टीनें पहाणार, बळराम म्हणून हिणवणार. नानीला नवऱ्याबद्दल एकदम अनुकंपा वाटूं लागली, ओढ लागूं लागली. मोठ्या खुपींत तो कपडे काढून अंगाला तेल फाशीत होता, कढत पाणी घेत होता. आणि नानी त्याच्या मोठाड देहाकडे केविलवाण्या मुद्रेनें पाहात होती.

गुजरानें बळराम पकडला गेला म्हणून दुसऱ्या दिवशीं सत्यनारायण केला. नानी सकाळींच वाड्यावर गेली. दादूला खालीं मान घालून लिहीत बसलेला पाहून ती दिंडीदरवाज्याशीं थबकली. पतिप्रेमानें तिचा ऊर भरून आला. पण मग ती

टचकली. दाराशींच वाट पहात राहिली. पोस्टाचा रनर दिसतांच तिनें गुजराचं टपाल घेतलं. कांहीं कार्डपाकिटांसह एक वर्तमानपत्रहि होतं. धडधडल्या हृदयानें तिनें तें पदराखालीं दडवलं व ती झपझप घरीं गेली. दार लावून तिनें अधीरतेनें वर्तमानपत्र उघडलं. पहिल्याच पानावर बळरामाचा फोटो ! तिनें डोळे फाडून फोटो पाहिला. पुन्हा पुन्हा पाहिला.

भ्रम नाहीं, भास नाहीं ! तो, अगदीं हुबेहूब तसाच. दादूसारखाच ! हनुवटीचा खड्डा, बांक आलेलं नाक, कानशिलापासची काळी उभी खूण ! नानीचं सर्वांग शहारलं. घाईनें तिनें जाळ पेटवला. धगधगल्या ज्वालेंत तो छापलेला कागद धरला. अनोळखी माळावर मशालीच्या उजेडांत निर्माण झालेलं एक अद्‌भुत स्वप्न, एक अपूर्व सत्य, अंधेऱ्या संसारांतल्या त्या ज्योतींत जळून जाऊं लागलं. खडकगांवांत तेवढा एकच कागद येत होता. तोहि अदृश्य झाला. सारा गांव, गुजर, खुद्द दादू—सारेच त्या गोष्टीबद्दल, गुपिताबद्दल, अज्ञ राहिले...

सारा दिवस नानी सत्यनारायणाभोवतीं मिरवीत होती. आतां त्या पडक्या तटा-आड नि निवडुंगांच्या फडामागें तिचं मंगळसूत्र सुरक्षित राहिलं होतं. त्या एकाकी, मरतमढ्या खेड्यांत आपण अज्ञातपणें, मुर्दाडपणें जगणार म्हणून तिला समाधान वाटत होतं. सुटल्यासारखं वाटत होतं.

* * *

# स्पंज



त्यानें चेहरा चौकोनी केला, बुबुळं गरगरा फिरवलीं व हातांची विचित्र हालचाल करीत म्हटलं, "तुमच्यांत सरसनीरस कसं ठरवितां येणार? प्रत्येक व्यंगाला व्यंग व काळ्या रंगाला हा काळा रंग दोघींच्या ठिकाणीं हजर आहेच. एक नूरजहान तर दुसरी मस्तानी!" नूरजहान नि मस्तानी हीं विशेषणं त्यानें अशा आवाजांत उच्चारलीं कीं त्याची त्यालाच गंमत वाटली. खूप होऊन त्यानें तोंड कडू केलं व दोन्ही बाजूना उभ्या असलेल्या त्या सुंदरींपासून तो अंग चोरूं लागला.

सारं थिएटर खदखदून हसत होतं. दोन काळ्या तरुणींच्या तडाख्यांत सांपड-ल्यानें झालेली त्याची करुण अवस्था पाहून प्रेक्षकांना हसूं आवरत नव्हतं. प्रवेश सुरू होण्यापूर्वीच बहुतेकजण हसण्याच्या तयारीनें बसले होते. कांहींजण तर नाटकाला आले होते तेच हसतखिदळत! नाटकांतलीं महेश्वराचीं वाक्यें उच्चारून पुरुष प्रेक्षकांनीं आपल्या बहिणीला, पत्नीला, प्रेयसीला चिडवलं होतं. आणि इंदूबिंदूंच्या आठवणीनें स्त्रीवर्गानें अधिकच सौंदर्यप्रसाधन केलं होतं.

लतिका, प्रभाकर, घनश्याम, धनेश्वर ह्यांच्याइतकंच महेश्वरचं काम पाहण्याची लोकांना उत्कंठा होती. किंबहुना अधिकच. इतरांचे अभिनय सुंदर व लोकप्रिय होत असले तरी त्यांत ठराविकपणा आला होता. महेश्वराचं सारंच न्यारं होतं. दर खेळांत अन् प्रत्येक प्रवेशांत तो वेगळीच मजा आणी. अभिनयाचीं नवींनवीं अंगें प्रकट करी. प्रेक्षकांना पुन्हा पुन्हा हसायला लावी. गडकरी मास्तरांचीं कोटीबाज वाक्यें हास्याच्या स्पंजांत शोषून घेई व विचित्र हातवारे करीत विनोदाचे फवारे चौफेर सोडी. असा अकृत्रिम अभिनय अन् जिवंत विनोद पाहून डोळ्यांची व कानांची तृप्ति होई. आपलीं दुःखं, दैन्य, संकटं, शल्यं—सारं विसरून सर्वजण हसत. केवळ हसत राहात.

"पांढरीं पातळं नेसवून उन्हातान्हांतून तुम्हाला घाम येईपर्यंत फिरवून आणावं, आणि तीं पातळं खुशाल काळ्या चंद्रकळा म्हणून विकावींत—" भोळसट चेहरा करून महेश्वर म्हणाला. सहजच त्यानें पुढल्या रांगेंत काळ्या चंद्रकळा नेसून बसलेल्या दोनतीन विदुषींकडे दृष्टिक्षेप टाकल्यागत केलं. अन् मग हास्याचे मजल्यावर मजले चढूं लागले. वरच्या मजल्यावरच्या तरुणांच्या टोळक्यानें बाजूला बसलेल्या स्त्रीसमूहाकडे चिडवण्याच्या चेहऱ्यांनीं पाहिलं. समोर बसलेल्या नवपरिणीत वधूनें आपल्या नवऱ्याच्या दंडाला चिमटा घेतला. कोपऱ्यांतला कुणी वृद्ध साहित्यिक मनःपूर्वक हसला. अन् सारा वेळ हसत राहिलेल्या कांहीं पोकिनांनीं आपला सूर वर चढवला. प्रेक्षक करीत असलेलं तें कौतुक पाहून महेश्वरला धन्य वाटलं. आपल्या नुसत्या दर्शनानें प्रेक्षकांच्या वृत्ती प्रसन्न होतात व आपल्या अंगविक्षेपानें सुतकी चेहऱ्याचा इसमसुद्धां पोट धरून हसतो ह्याचा त्याला अभिमान वाटला. आपल्या अभिनयकौशल्यांत कुणाचाहि उदासपणा वारण्याचं सामर्थ्य आहे, ह्या विचारानें तो फुलून निघाला. हजारों हसरे चेहरे त्यानें क्षणार्धांत पाहून घेतले. अन् मग लगेच तो आपल्या भूमिकेंत एकजीव होऊन गेला. प्रेक्षक विसरला, स्वतःला विसरला. त्याच्यासारख्या नटश्रेष्ठाबरोबर काम करायला मिळावं म्हणून सुंदर सफेत चेहऱ्यावर काजळी फासून शेजारीं उभ्या असलेल्या दोघी कॉलेजकुमारिका त्याला खऱ्याच इंदू-बिंदू वाटूं लागल्या. त्यांच्या ओढाताणींत तो कासावीस होऊं लागला. आंधळेपणाची बतावणी बेमालूम करूं लागला. रुंडुगुंडुकुंडु—कामण्णा करूं लागला.

नाटक आटोपलं व प्रेक्षक परतले ते त्याच मोकळ्या, मनमुराद मनःस्थितींत. महेश्वरचं विनोदी काम आठवून त्यांच्या अजून मुरकुंड्या वळत होत्या. आणि नाटकांतले गंभीर, दुःखद प्रसंग विसरण्याकरितां महेश्वरचं बोलणं चालणं मुद्दाम आठवून ते मन प्रसन्न ठेवीत होते. अपरात्रीचं तटस्थ वातावरण टवटवीत ठेवीत होते. आणि झोपेंतहि महेश्वरची मुद्रा पाहात होते.

रंगपटांत महेश्वर मेकअप् उतरवीत बसला होता. इंदूबिंदूंचे चेहरे आतां उजळले होते. इंदूचं काम करणारी सोनू पाटील आपल्या गालावरच्या काजळीची उरली सुरली छटा रुजूनें नाहींशी करीत होती. काळ्या पातळांतील तिची गौर काया खरोखरच दृष्ट लागण्यासारखी होती. घनश्यामचें काम करणाऱ्या पुरोहितपंतांची दृष्टि तिच्यावर सारखी खिळली होती. चिरूटाचा धूर सोडीत पंत तिची प्रत्येक हालचाल टिपत होते. रंगभूमीच्या नादीं लागलेली ही पोरटी आपल्या रंगमहालाच्या

नादीं कधीं लागेल ह्याचा त्यांना ध्यास लागला होता. अनेक विकृत, वैषयिक विचार त्यांच्या मनांत वेटाळीं घेत होते. सोनूपेक्षां सुंदर असलेल्या बिंदूचं काम करणाऱ्या कमळीकडे त्यांचं लक्षहि नव्हतं. तिची त्यांनीं केव्हांच शिकार साधली होती. बिंदू-सारखीच कमळी मूर्ख होती. पुरोहितांचं प्रेम आपल्यालाच मिळालं आहे ह्या कल्पनेंत ती दंग होती. नाटकांत नायिकेसारखी मिरवत होती. रंगपटांत महेश्वरच्या कामावर उगाचच टीका करीत होती.

महेश्वरचा मेकअप् उतरवतांना त्याला रंगपटांतलं हें वातावरण असह्य होत होतं. स्टेजवर त्याला जरासुद्धां कामाचा ताण वाटला नव्हता. काम आटोपल्यावर तो विंगमध्यें रेंगाळत राहिला तेव्हां तो महेश्वरच्या अवतारांतच वावरत होता, घोटाळत होता. कधीं तरी तो रंगपटांत आला. तेथले आरसे, पाण्याचे ग्लास, रंग पुसायचीं फडकीं पाहतांच त्याचा आवेश ओसरून गेला. त्या रविवर्म्याच्या चित्रांतल्या-सारख्या सुंदर इंदूबिंदूंची त्याला शिसारी आली. खाजगी कपडे करूनहि खुनशीपणें पाहणारा घनश्याम पाहतांच तो बावरून गेला. खऱ्याखोट्याची, स्टेजची नि जगाची झालेली उलथापालथ पाहून त्याला कामाचा थकवा वाटूं लागला. जागरणाचा शीण वाटूं लागला.

"महेश्वर ! अहो मंगेशराव—आज अगदीं मार डाला ! डाला म्हणजे काय अगदीं डाल्डा—" कंपनीचे नवे होतकरू नाटककार रंगपटांत प्रवेश करीत किंचाळले. "काकासाहेबांनीं नारायणरावांना पुढें ठेवून स्वयंवर रचलं तसं जणूं मास्तरांनीं महेश्वरचं माप तुमच्यावर घेतलं. अन् माप म्हणजे काय, अगदीं अमाप!—" बोलणं थांबवून ते हसले व मंगेशच्या मागें उभे राहून आरशांत डोकावूं लागले.

त्या नव्या कवीचं आगमन होतांच उरला सुरला महेश्वरहि अदृश्य झाला. आरशांतून दिसणारा त्याचा चेहरा पाहतांच मंगेश त्रासून गेला. काय त्याच्या कोट्या नि कवित्व ! त्याचं नवं नाटक कंपनीनें घेतलं होतं व त्यांत एक विदूषकी भूमिका मंगेशसांठीं मुक्रर करण्यांत आली होती. आपल्या होऊं घातलेल्या विटंबनेची आठवण होऊन मंगेश अधिकच उन्मळून गेला. आरशापासून दूर झाला. खुंटी-वरचा आपला फाटका खमीस व जुनाट जाकीट चढवूं लागला. त्या कवड्याच्या कोट्या चालल्याच होत्या. गडकरी मास्तरांशीं शिष्यत्वाचं नातं जोडून तो जें बरळत होता, तें घृणा येण्यासारखं वाटत होतं. मास्तरांचा उद्धार व विनोदाची विटंबना

पाहून मंगेश भडकून गेला. त्याला वाटलं, ह्या नाटककाराच्या थोबाडींत ठेवून द्यावी एक! पण तो मालकाचा मावसभाऊ होता. त्याचा अपमान केला तर मंगेशाच्याच पोटावर पाय आला असता. आधींच उपासमार सुरू होता. नाटक-कंपन्या बुडत होत्या. लाचारीनें वागलं नाहीं तर आत्महत्या करायचीच वेळ यायची.

मंगेशला खिन्न खिन्न वाटलं. आजूबाजूच्या आरशाआरशांतून त्याचा खिन्न, खप्पड चेहरा दिसूं लागला. तो कवि लाचारीनें पुरोहितपंतांची लाळ घोटीत होता, अन् पुरोहित घनश्यामचा अवतार कायम ठेवून सोनू पाटीलवर पाळत ठेवून होते. विड्यासिगारेटचा धूर सभोवतालीं सांचत होता नि नाटकांतले कपडे जाजमावर टाकले जात होते. मिशा पुसल्या जात होत्या, अलंकार उतरवले जात होते. एकएक दिवा विझवला जात असल्यामुळें खोलीला अधिकच चमत्कारिक स्वरूप येत होतं...

मंगेशला वाटलं, एकदम मोठ्यानें ओरडावं. विचित्र हातवारे करून हसावं. भराभर दिवे लावावेत, रंग लावावेत व परत स्टेजवर धावावं. हजारों लोकांचे अखंड हास्यध्वनी ऐकत राहावं. पण थिएटर ओस पडलं होतं, स्टेजवर अंधार पसरला होता. आणि आतां रंगपटांतहि शुकशुकाट होऊं लागला होता.

"काय, सोडूं का घरीं मंगेशराव?" लतिकेचं काम करणारी मालकांची बायको म्हणाली. सँडल्स चढवीत ती मंगेशसमोर उभी होती व बाहेर वाजणाऱ्या मोटारच्या कर्ण्यामुळें अधिरी होत होती. मंगेशनें मानेनंच नकार दिला. गल्लीबोळां-तून एका पडक्या घरापाशीं गाडी न्यावी लागणार ह्याची त्याला लाज वाटत होती. मोटारच्या मागोमाग तो एकटाच पायीं निघाला. नाइलाजानं, नाउमेदीनं! त्याचीं बोटं फाटके खिसे कुरतडीत होतीं व पाय अडखळत ओढत घराकडे जात होते.

वांकड्यातिकड्या वाटेनें तो बोळांतल्या एका जुनाट घराशीं आला. दारावर थाप मारीत घोगऱ्या स्वरांत ओरडला, "तारा—ए तारा—"

रस्त्याच्या मध्यभागीं लोळत पडलेलं, लूद भरलेलं कुत्रं दचकून उठलं व शेपटी खालीं करून दूर गेलं. बाजूच्या वडाचा विस्तार हलला, अधिकच भेडसावूं लागला. अधीरपणें मंगेशनें पुन्हा साद घातली, "तारा, तारा—"

खोलींतल्या कोपऱ्यांत निजलेली तारा उठेना. दिवसभर कामं करून ती दमली होती. दळणं दळून, विणकाम करून तिचं अंग आंबून गेलं होतं, पापण्या बंद झाल्या होत्या. बापानें बऱ्याच हाका मारल्यावर ती जेमतेम जागी झाली. धडपडत उठून तिनें दार उघडलं.

मंगेश आंत आला. डोळे फाडून पोरीकडे पाहूं लागला. दार उघडायला तिला उशीर कां होतो हें मंगेशला कळत नव्हतं. तरणीताठी विधवा पोर एकटी घरीं टाकून आपण जातों अन् वाड्यांत अनेक वाईट वर्तनाचीं माणसं असतात ह्या विचारानं तो वेडापिसा झाला. अंधारांत ठेचाळत उद्गारला, "दहा हाका मारल्या. झोप लागली होती कीं मेली होतीस?"

तारेला ऐकूं आलं नाहीं. ती तत्काळ झोपेच्या आधीन झाली होती. ती गप्प राहिलेली पाहून मंगेश अधिकच भडकून गेला. अंधारांत तारेचं पांढरं कपाळ त्याला त्रास देऊं लागलं. खूप पैसे खर्चून तिला चांगल्या स्थळीं दिलं होतं. पण वर्षाभरांत नवऱ्याला मारून पोरटी कायमची माहेरीं आली. बापाच्या कपाळावर आठ्या कोरायला, डोक्यावरचे उरलेले केस साफ करायला! तारेच्या दुर्भाग्यानें मंगेश अतोनात दुःखी झाला होता. तिच्या काळजीनं पोखरून गेला होता. अत्यंत लाडांत वाढलेली ती पोर त्याची वैरीण होत होती. रोज रात्रीं थिएटरहून परतल्यावर त्याला सतावीत होती, झोप लागूं देत नव्हती.

"बाबा, झोप येत नाहीं का?" दुसऱ्या कोपऱ्यांतून क्षीण नि घोगरा आवाज आला. मंगेश दचकला. आपल्या एकुलत्या एक पोराला तो साफ विसरला होता. बिचारा गरीब, पांगळा रमाकांत! वडिलांची वास्तपुस्त करीत होता. मंगेशचे डोळे भरून आले. तो उद्गारला, "नाहीं बेटा, झोपतांच आतां. तूं कसा जागा?"

"मी तुमची वाट पाहात होतों. छान झालं ना नाटक? रस्त्यावर मघां कांहींजण गेले तुमची नक्कल करीत. खूप खूप होते तुमच्यावर. सारखे हसत होते—"

मंगेशला रडूं कोसळलं. तो म्हणाला, "हो, छान झालं नाटक. आतां झोप तूं!"

पण रमाकांत बोललाच. "मी पांगळा नसतों तर मला काम मिळालं असतं का हो? लोक म्हणतात, माझा चेहरा अगदीं तुमच्यासारखा आहे—"

मंगेशचं मन भरून आलं. त्याच्यासारखा चेहरा, त्याच्याच पोटचा पोरगा! अन् मग त्याला रमाकांताच्या आईची आठवण झाली. पांच वर्षांपूर्वी पांच वर्षांच्या पांगळ्या पोराला टाकून ती कुलटा कुठें बेपत्ता झाली होती. कुणाबरोबर तरी पळून गेली होती. संतापानें, दुःखानें मंगेश तळमळूं लागला...

रमाकांत झोपेंत बरळत होता नि तारा घोरत होती. आपल्या आयुष्याचा विचार करीत मंगेश पडला होता. केव्हां तरी तो भानावर आला. पहाट व्हायची वेळ झाली

होती अन् त्याचा जरासुद्धां डोळा लागला नव्हता. असा वेडेपणा करून भागणार नव्हतं. दुपारीं परत नाटक होतं. जागरण झालं तर उद्यां अंग दुखेल. पोटदुखीहि सुरू होईल. त्यानें बळजबरीनें झोपायचं ठरवलं. निद्रेचा पडदा पाडायला तो प्रेक्षकांना आळवूं लागला. त्यांचे हसरे चेहरे दिसतांच त्याचीं दुःखं विरूं लागलीं. हसण्याच्या स्वरावर तो श्वास घेऊं लागला. घोरूं लागला.

"अहो, उटा. विनोदमूर्ति! अहो कुंभकर्ण!—" कुणी तरी कानाशीं किंचाळलं व मंगेश दचकून जागा झाला. भाजीची झोळी हातांत घेऊन दारांतल्या उन्हांत घरमालक उभे होते. मंगेशच्या कपाळावर आठ्या पसरल्या. कपाळावर आलेले केस मागें करीत तो कसाबसा उठला. पायांनीं पांघरुणं कोपऱ्यांत ढकलूं लागला.

मालक म्हणाले, "म्हटलं, उठलां असाल. नऊ वाजायला आले. नाटकामुळें—"

मंगेशनें चूळ भरून टाकली व एकदम म्हटलं, "उद्यां भाडं देऊन टाकतों—"

मालक दचकले. हसत म्हणाले, "उद्यां रोजचंच चाललं आहे. पांच महिने झाले—"

मंगेशला वाटलं होतं कीं उद्यांच्या वायद्यानें मालक दबेल, परतेल. पण त्याचं आडमुठं, अपमानकारक बोलणं ऐकून तो भडकला. घनश्यामचीं वाक्यं मालकाच्या तोंडावर टाकावींसं वाटलं. पण तो बोलला नाहीं. तो खलप्रकृति घनश्याम नव्हता. विनोदमूर्तीहि नव्हता. दारिद्र्यानें टेकीला आलेला हतभागी इसम होता...

मालक तणतणत गेला. धुरकट चहाचा कानतुटका कप पुढें करीत तारा उद्गारली, "माझे जमले आहेत पांच रुपये—"

मंगेशनें मुलीकडे त्रासून पाहिलं. तो कांहीं तरी बोलणार होता पण त्याचे भाव पलीकडेच पडलेल्या रमाकांतानें हेरले. तो खुरडत पुढें झाला नि म्हणाला, "तिचे घेऊं नका पैसे. अन् तिला बजावून सांगा हो बाबा! सारखी लोकांचीं कामं करते. एवढे कष्ट करून—"

"अरे, माझ्या अंगांत शक्ति आहे तोंवर करतें आहें कष्ट. अन् दळणकांडण म्हणजे कांहीं कामं नाहींत. वेळप्रसंगाला पैसे नकोत का—"

मंगेश गप्प राहिला. तारा मोलमजुरीसारखीं कामं करते हें त्याला ठाऊक होतं. पण तिला तो बंदी करूं शकत नव्हता. तो बेकार राही तेव्हां तारेच्या ह्या पैशावरच त्याला दोन घास गिळायला मिळत. अन् त्याच्या पोटदुखीवर अनेक औषधं खरेदी करतांना...

त्याला आपल्या पोटदुखीची आठवण झाली. हलकेच त्यानें पोट दाबून पाहिलं. पांचसहा दिवस सारं ठीक होतं. आजहि शांत होतं. तो श्वास रोधून पुन्हा पोट चेपूं लागला. जरा दुखल्यागत वाटत होतं. तो दचकला. चहाचा शेवटचा घुटका घेऊन उठूं लागला. पण पोटांतून कळ आली. खरोखरीच कळ आली. कप खाली ठेवून तो बसला. जरा वेळ शांत झालं. दुखण्याचा भास झाल्यासारखं वाटलं. पण मग सारख्या कळा येऊं लागल्या. भयंकर दुखूं लागलं. दोन्ही हातांनीं पोट धरून तो वांकला, आडवा झाला, गडबडां लोळूं लागला. पोटदुखी वाढतच गेली. त्याचे डोळे टिपकले व ओठ विव्हळूं लागले. वेदनांनीं तो व्याकुळ झाला, अर्धमेला झाला.

बापाची ती दारुण स्थिति पाहून वितंडवाद घालणारीं दोन्ही पोरं गप्प झालीं, कावरींबावरीं झालीं. वैद्यानें दिलेल्या मात्रा शोधतांना ताराची तारांबळ उडाली. ती मात्रा उगाळूं लागली. रमाकांत करुण मुद्रेनं बघत राहिला. मध्येंच म्हणाला, "बाबा, असं नका करूं. तुम्हीच रडल्यावर आम्हीं कसं करायचं? आम्हीं कसं हसायचं?—"

अर्धापाऊण तास तो वेदनांच्या वणव्यांत कोळूनकरपून निघाला. अंगांतली सारी ताकद, तजेला नाहींसा झाला. तोंड वाळून गेलं नि डोळे सुजून निघाले. समोरची विळी घेऊन पोट चिरून टाकावं, मोठ्यानें बोंब ठोकून सैरावैरा धावावं व अखेर वाड्यांतल्या विहिरींत उडी घ्यावी, असं अनेकदां त्याला वाटलं. एखाद्या लहान मुलासारखा, एखाद्या मरणाऱ्या म्हाताऱ्यासारखा तो कण्हत राहिला.

जरा बरं वाटल्यावर मंगेश शांत झाला. यातनांच्या ग्लानीनें त्याला जरा डुलकी लागली. पोटावर हात बांधून तो पडून राहिला. पांढऱ्या कपाळाची तारा त्याचं डोकं थोपटत राहिली. पायाशीं बसलेला पांगळा पोरगा पुटपुटत राहिला, 'देवा, काय माझ्या बाबांची अवस्था! किती छळतोस त्यांना? सगळ्या गांवाला ते हसवतात म्हणून त्यांना ही शिक्षा देतोस होय?—' अंमळशानें तारा दूर झाली, स्वैंपाक करूं लागली, तरी तो पुटपुटत होता, पित्याकडे तन्मयतेनें पाहात होता.

मग मंगेश उठला. पुन्हा चहा घेतल्यावर त्याला तरतरी आली. उंबरठ्यावर बसून तो विडी फुंकूं लागला. सकाळ संपून गेली होती. घराघरांतून स्वैंपाकाचे सुवास सुटले होते व विहिरीपासच्या दगडावर अंघोळी झडत होत्या. अन्नाचे वास व स्वच्छ पाणी पाहतांच मंगेशच्या वृत्ती टवटवीत झाल्या. शेजारच्याकडचं बाळ

रांगत रांगत त्याच्याकडे आलं. तो टिचक्या वाजवीत त्या बाळकाशीं खेळूं लागला. दांत नसलेलं नि लाळेनं भरलेलं बाळाचं बोळकं किती [illegible], हवहवंसं वाटत होतं. त्या छोकऱ्याशीं खेळतांना मंगेश तन्मय झाला. हजारों प्रेक्षकांच्या स्मितांपेक्षां त्या बाळाचं हसणं त्याला मोलाचं वाटूं लागलं. किती निरागस, निर्मळ हास्य! अशा हास्यासाठीं मंगेशनं सारं आयुष्य उगाळून टाकलं असंतं.

तेवढ्यांत बाळाची आई तरातरा आली. फसकन् तिनं पोराला उचललं व फणकाऱ्यानं ती निघून गेली. मंगेश चुटक्या वाजविण्याचं थांबवून बघतच राहिला. त्याला राग आला. वाईटही वाटलं. स्वैंपाकघरांतून शेजारीण पुटपुटत होती, "कुठला मेला नाटकांतला!—पळवून न्यायचा पोराला एखाद्‌वेळीं..." मंगेशनं मुठी वळल्या व ओठ चावीत तो उठला. त्याला वाटलं, असं सुनवावं त्या बयेला! मी म्हणजे काय वाटलों तिला...तो हातवारे करीत निघाला. पण तेवढ्यांत रस्त्यावरून जाणारे दोनचार लोक त्याच्याकडे पाहून हसले. त्याच्या हातवाऱ्यांना, विचित्र मुद्रेला! तें कौतुकाचं, करमणुकीचं हसणं पाहतांच मंगेशाचा आवेश ओसरून गेला. आपल्याला संतापायचीहि सोय नाहीं. आपल्या कुठल्याहि वागण्याचं हसं होतं, अन् आपण लोकांच्या उपयोगीं पडूनहि आपला अखेर अपमान होतो या जाणिवेनं तो विलक्षण उदास झाला. रस्त्यावरचीं माणसं हसतच होतीं नि हा अधिकाधिक खिन्न होत होता.

तो घरांत गेला. चुलीशीं लाकडं पेटवीत व पीठ मळीत तारा बसली होती. धुरानं तिचे डोळे लाल पडले होते व पीठ मळून तिच्या अंगावर घाम उमटला होता. किती कष्ट करते बिचारी! कशासाठीं, कुणासाठीं?—कधीं नाहीं तें प्रेम मंगेशला वाटूं लागलं. कां तिच्या वांट्याला हें वैधव्य आलं? कां त्याच्या वांट्याला दुर्भाग्य आलं?—तो अतिशय व्याकुळ झाला व रमाकांताकडे गेला. कोपऱ्यांत पडून तो दहा वर्षांचा हुषार, हसरा पण पांगळा पोर चित्रांचं पुस्तक पाहात होता. किती आशावादी होता तो. अन् अभिनयकलेचीं अनेक अंगं त्यानें आत्तांच आत्मसात् केलीं होतीं. पण काय उपयोग? मंगेशला वाटलं, कांहीं असो, पोराला कधींहि रंगभूमीवर पाठवायचं नाहीं. निदान विनोदी कामं करायला लावायचीं नाहींत.

पोराच्या हातांतल्या पुस्तकांत असलेलं चार्ली चापलीनचं चित्र तो भरल्या डोळ्यांनीं केवढा वेळ तरी पाहात राहिला!

मग त्यानें नेहमींचा सदरा व जाकीट चढवलं व तोंडावर पाणी मारून तो बाहेर पडला. असं वेड्यासारखं वागून चालणार नव्हतं! त्याच्यावर केवढ्या जबाबदाऱ्या होत्या. त्या पार पाडायच्या म्हणजे रडकं राहणं उपयोगाचं नाहीं. मन मारून टाकलं पाहिजे, चेहरा टवटवीत ठेवला पाहिजे. म्हणजे लोक खूप होतील. लोकांचीं दुःखं दूर केलीं म्हणजे आपलं दैन्य जरा तरी कमी होईल!...

टांगा टाकीत तो रस्त्यानें चालत राहिला. कुणी बोटं दाखवीत, कुणी ओळख दाखवीत. खिडकींतून डोकीं उगवत व चेहरे हसरे होत. तारस्वरांत चाललेली चर्चा एकदम बंद पडे व सर्वजण त्याच्याकडे पाहात हसतमुख होत. "अहो, तो पाहा विनोदमूर्ति मंगेशराव—", "अय्या, कसा गंमतीदार चालतो आहे—", "देवानें बेट्याला देणगीच दिली आहे विचित्र रूपाची; पाहिलं कीं हसूंच फुटतं—", अनेक उद्गार कोपऱ्याकोपऱ्यांवर कानीं पडत. पण त्याचं कुठेंच लक्ष नव्हतं. खपाटीला गेलेले खिसे फाटले होते, दुखरं पोट रिकामं होतं, अन् वेड्यासारखा तो जात होता.

पानवाल्याच्या खिडकीशीं तो थांबला व जर्दाची पुडी घेत म्हणाला, "काय काळूराम, आला का आंकडा?"

काळूरामनें पान कातरत म्हटलं, "कसा येणार! सत्त्या लावा म्हणून सांगितलं तें ऐकलं नाहींत! तुमचे कांहीं भलतेच आडाखे. नेहमीं हातची लक्ष्मी घालवतां—"

त्याच्या आशाआकांक्षा कातरून निघाल्या. आज आंकडा लागेल, थोडा पैसा मिळेल, मग मीटमिरची आणूं, तारेला लुगडं घेऊं—अनेक स्वप्नांचे फाटे त्याच्या मनांत फुटले होते. पण आजहि त्याचा विरस झाला. दैवाच्या खेळाचा विनोद झाला.

दोनचार गिऱ्हाइकं आलीं म्हणून बोलणं थांबलं. तो दूर झाला. दुसऱ्या रस्त्याला लागला. काय करावं, कळेना त्याला. स्टेजसमोरच्या दिव्यासारखा सूर्य पेटला होता, डोळ्यांवर येत होता. रेखलेल्या इमारतींपुढच्या रस्त्यावर स्त्रीपुरुष नाटकांतल्या ड्रॉपपुढच्या पात्रांप्रमाणें कळसूत्रीपणें जात येत होते, आपापल्या भूमिका वटवीत होते. आणि तो पिटांतल्या प्रेक्षकासारखा गटाराशीं उभा राहून तिऱ्हाइतपणें पाहात होता. मंगेशला ह्या भावनेची भीति वाटली. कुणीं तरी आपल्याला स्टेजवर घ्यावं, माणसामोटरींत घ्यावं, आपली करुणा करावी, आपल्याला खूप हसवावं असं त्याला वाटूं लागलं. ओढ लागून तो पुढें झाला. कॉलेजकुमारांचं टोळकं चाललं होतं, त्यांच्या पुढ्यांत मुद्दाम गेला व दांत विचकूं लागला.

"ओहो, मंगेशराव—" बुशकोटवाला तरुण म्हणाला, "काल कमाल काम केलंत बुवा—"

सगळींजणं थांबलीं. कौतुकानें मंगेशकडे पाहूं लागलीं. पण मंगेशचं मन बहरून आलं नाहीं. हवे होते ते शब्द बोलायचं त्याला बराच वेळ धाडस होईना. 'तुमच्या कॉलेजचं नाटक बसवलं त्याचा कांहीं मोबदला द्या कीं—' त्याला म्हणायचं होतं. निदान सुचवायचं होतं, 'इथं रस्त्यांत काय उभं रहायचं ?—हॉटेलांत बसूं—दहींमिसळ खात—' पण त्याला लाज वाटली, धीर झाला नाहीं. 'हसवण्याची कला कशी मिळवलीत ?—तुमच्या आयुष्यांतल्या आनंदामागचं तत्त्वज्ञान काय—' अनेक प्रश्न तीं कोवळीं कोकरं विचारीत होतीं. तो पढीक पोपटासारखं कांहीं तरी बरळत होता. त्याचं मन मात्र आक्रांत करीत होतं, 'मोबदला, मोबदला, मिसळ, मिसळ...'

मालकांची मोटर समोरून गेली व तो भानावर आला. नटांना वेठीला धरून पैसा गांठवणारा मालक मुख्य नटीसह सहल करीत होता. तें दृश्य पाहतांच मंगेश भडकून गेला. त्याला वाटलं, जेमतेम जगणारी रंगभूमि पुरी मोडून तोडून जाऊं दे. म्हणजे नटांची ससेहोलपट तरी थांबेल. पण आपल्या विचारांची त्यालाच घृणा आली. मोठ्यानें तो म्हणाला, 'छे, छे ! रंगभूमि जगवण्यासाठीं आम्ही प्राणा-पलीकडे धडपड करूं. अन् जगाला हसत ठेवण्यासाठीं आम्ही वाटेल ते हाल सोसूं—' मुलं संवयीनं, कौतुकानं हसलीं.

मुलं हसत खिदळत निघून गेलीं, पण मंगेशला कुठें जावं तें कळेना. नाटक संपल्यावर हास्याच्या समुद्राला ओहोटी लागून थिएटर ओस पडलं कीं असंच खिन्न वाटे. मंगेशला वाटलं, पुन्हा त्या पोरांना बोलवावं. हातवारे करून हसवावं ! कुणाला तरी घुसळून हसवण्यासाठीं त्याचं रक्त उसळूं लागलं. पण सारे जण आपल्याच नादांत, धांदलींत होते. कामं आटोपून, दुकानं बंद करून, हातगाड्या घेऊन घरीं निघाले होते. मंगेशला आपल्या संसाराचा उकिरडा आठवला. घामानें थबथबलेल्या पांढऱ्या कपाळाची तारा नि मुरडणारा पांगळा रमा. पळून गेलेली पत्नी, ठाण मांडून बसलेला मालक. दुर्दैव, दारिद्र्य, दुःख...दुःख...

मंगेशला वाटलं, अजून घडी घालतां येईल. सारं सांवरतां येईल. नाटकाचा, विनोदाचा नाद सोडला पाहिजे. कुठें तरी नियमित पगाराची नौकरी धरून व्यवस्थित संसार चालवला पाहिजे. रस्त्यानें जाणाऱ्या प्रत्येकाकडे तो पाहूं लागला. दुकानदार,

फेरीवाला, कारकून, ठेकेदार, मास्तर, आचारी...जणूं तो 'एकच प्याला' मधला सुधाकर होता. व्यसनाबद्दल पश्चात्ताप पावून परत माणसांत येऊं पाहात होता. येणाऱ्याजाणाऱ्यांकडे नौकरी मागत होता. आणि—आणि गेल्याच आठवड्यांत तर त्यानें 'एकच प्याला' मध्यें, 'एका गृहस्था'चं काम केलं होत. सुधाकराला समजावलं होतं, 'आम्ही तुमच्या पाठच्या भावासारखे—'

उन्हें वाढूं लागलीं, पोटांतली आग वाढूं लागली. मंगेशच्या मनांतला गोंधळ वाढूं लागला. आपण कोण हेंच त्याला नीट कळेना. आपण सुधाकर कीं त्याचा पाठचा भाऊ? आपण नाटकांत काम करीत आहोंत नि सारेजण प्रेक्षागृहांतून पाहात आहेत, कीं लोक मोठ्या नाटकांत भूमिका करीत आहेत अन् आपण दुरून वेड्यासारखे पाहात आहोत?—कांहींच कळेना. कुणीतरी आपलं दैन्य दूर सारून आपल्याला हसवावं असंहि त्याला वाटतं होतं! कुणीं कुणाला हसवायचं?... हास्याचे ध्वनी कुठले नि आसवांचा आक्रोश कुठला...आपलं डोकं दुखतं आहे कीं पोटांतून कळा येत आहेत...?

एकाएकीं तो धावत सुटला. विचार करून त्याला वेड लागायची पाळी आली होती. ह्या आयुष्याच्या नाटकाचा पुरा वीट आला होता. हें जीवन नकोसं झालं होतं. तो वेड्यासारखा निघाला. आगगाडीखालीं उडी घेऊन आयुष्याची अखेर करायचा त्याचा रोजचा विचार त्याला आतां आटोक्यांत आणतां येईना. नाटकाच्या वेडाचा, विदूषकी चाळे करायचा शेवट केला कीं सारंच संपेल. लेव्हल क्रॉसिंग-शेजारीं आगगाडीखालीं उडी घेऊन शेवटचं विनोदी कृत्य करायचं ह्या कल्पनेनें तो वेडापिसा झाला. सैराट धावत सुटला.

त्याला लेव्हल क्रॉसिंगची घंटा ऐकूं आली. त्यामागोमाग आगगाडीच्या डब्यांचा धडधडाट. मंगेश थबकला, चपापला, अन् मग सज्ज झाला...

"अहो विनोदमूर्ति—आटपा लवकर—" मॅनेजर म्हणाले. मागोमाग कांहीं जणांच्या हसण्याचा आवाज आला. मंगेश भानावर येऊन पाहूं लागला. सरळ तो थिएटरवर आला होता! गर्दीचा धडधडाट व पहिल्या घंटेचा किणकिणाट. समोर संशयकल्लोळची प्रचंड जाहिरात फडफडत होती. 'तो पहा मंगेश—तो पाहा भादव्या—' कुणी कुजबुजत होते. आणि रंगपटाच्या दाराशीं भाकऱ्या बांधून घेऊन तारा उभी होती. 'आजसुद्धां जीव द्यायला जाणार होतांत का?'—ती पुटपुटली.

भकास मुद्रेनें मंगेश आंत गेला. मालकाच्या खोलींत मुख्य नटीसाठीं नवीं पातळं नेलीं जात होतीं व विंगच्या अंधारांत पुरोहितपंत सोनू पाटीलशीं कुजबुजत होते. मंगेश आरशापुढें बसून रंग कालवूं लागला. त्याच्या काळजांत कालवलं जात होतं व डोळ्यांच्या कडा ठिपकत होत्या. बाहेर थिएटरांत व व्हरांड्यांत हसण्याखिदळण्या-पूर्वींची निस्तब्धता पसरत होती...

* * *

# निर्माल्य १०

मुंबईच्या माणसांच्या महापुरांत ओळखीचीं माणसं हमखास भेटणं महामुष्किल असतं. निरोप पाठवून, फोन करून, त्यांना घरीं किंवा कुठल्या तरी संकेतस्थळीं गांठावं लागतं. नाहीं तर खेप फुकट जाते, वेळ फुकट जातो व विरस होतो. उलट तींच तींच अनोळखी माणसं पुन्हा पुन्हा पुढें येतात. आपला-त्यांचा परिचय नसतो; पण रोज रोज बस्-स्टॉपवर, लोकल गाडींत, जेवणसमयीं समोरच्या टेबला-वर, ते चेहरे नियमितपणें दिसतात. ठराविक अन् अनोळखी. अखेर असं होतं कीं, हे अपरिचित आत्मे आपले आयुष्याचे सोबती भासूं लागतात आणि आपल्या नात्याचीं, स्नेहाचीं माणसं केवळ उजळणींत उरतात. अर्थात् नातलगांचे लागे-बांधेहि पुरते सरत नाहींत नि अनोळखी माणसं अखेरपर्यंत अनोळखी राहतात.

ही सारी यंत्रयुगाची किमया. मुंबईच्या आजच्या जीवनाच्या विपरीतपणाचा हा वांटा मानायचा. त्याला बोल लावायचा, जाब मागायचा. ह्या प्रचंड कारखान्यांत मन करकचून जातं, नात्यागोत्याला अर्थ उरत नाहीं, असं म्हणायचं व स्वस्थ बसायचं! पण मग एक दिवस अचानक वासुदेव गुप्ते भेटतो. रक्ताइतका अमोलिक संबंध असलेला एके काळचा जिगर स्नेही. ज्याच्या सहवासांत आयुष्यांतले महत्त्वाचे क्षण व्यतीत केले तो प्राणप्रिय दोस्त. तो कुठें तरी असाच बस-स्टॉपवर, लोकल-गाडींत, हॉटेलांत, चौपाटीवर अनेकदां दिसतो. कित्येकदां त्याच्याशीं बोलायला सवड असते. पण—पण—सवड असते, पण शब्द नसतात. नाइलाज झाल्यासारखं बोलावं लागतं. कुशल विचारावं लागतं. कधीं कधीं तर एकमेकांना टाळावंसंहि वाटतं. नेहमीं भेटणाऱ्या अपरिचित इसमांच्यासारखं त्याचं अस्तित्व भासतं. परत पुन्हा भेटेपर्यंत त्याची आठवणहि उरत नाहीं. ज्याच्यासाठीं आयुष्य उधळून टाकायला

एके काळीं उद्युक्त झालों होतों त्या वासू गुत्तेबद्दल अशी, इतपत भावना उरते. भांडणतंटा नसतांना, पैशाबद्दल उच्चनीच भावना असणं अशक्य असतांना असं होतं. अन् मग वाटतं, मुंबईचा, यंत्रयुगाचा ह्यांत किती वांटा? ह्या विचित्र, वरवर सरळ वाटणाऱ्या, पण मन शरमल्यागत करणाऱ्या घटनेबद्दल बोल कुणाला लावायचा, जाब कुणाजवळ मागायचा?

मी विचार करतों. घरांत अगदीं एकटा असल्यावर जिवाभावाच्या स्नेह्या-सोबत्यांच्या स्मृती चाळवतों व मग मुद्दाम वासूची आठवण काढतों. वासूच्या आठवणींनीं मन भरून येत नाहीं म्हणून लज्जित होतों. आठवणी आल्या तरी पुन्हा स्नेह फुलवावा अशी इच्छा उत्पन्न होत नाहीं. हें सारं कां होतं, अन् कां होत नाहीं हें मला समजतं. तरी पण विचित्र वाटतं. तसं पाहिलं तर हल्लींचे माझे सगेस्नेही सारे स्वार्थामुळेंच मीं गोळा केले आहेत असं नाहीं. एकादोघां अतिदूरच्या नातेवाइकांना मीं मदत केली आहे. आपले ऋणानुबंध राहावेत म्हणून पोटाला चिमटा घेऊन व मनाला वळण लावून आणिकहि अशीं कृत्यें केलीं आहेत. तरी देखील वासूबद्दल मी कांहीं करूं शकत नाहीं. त्यांत कांहीं करण्यासारखं आहे असंहि वाटत नाहीं. एक काळ असा होता कीं, वासूशिवाय आयुष्य कसं घालवायचं असा मला प्रश्न पडला होता. वासूभोवतीं माझ्या भावना गुंफल्या गेल्या होत्या. दादांच्या-बद्दल आत्मीयता नव्हती इतकी मला वासूबद्दल वाटे. कदाचित् कुंदावरदेखील प्रेम केलं नाहीं असं प्रेम मीं वासूवर केलं असेल. पण आज वासूबद्दलच्या त्या आत्मीयतेचा, प्रेमाचा मागमूसहि उरला नाहीं. दादा गेले, कुंदा दुरावली व वासूहि आपल्या परीनें परका झाला. पण असा अपरात्रीं मी एकटा विचार करीत बसलों कीं कुंदाच्या आठवणीनें हृदय जळूं लागतं. तिच्या प्रेमाशिवाय जगणं नशिबीं आलं म्हणून डोळे ओलेचिंब होतात. संसाराचा ताप स्मरून मग असं वाटतं कीं, दादा असते तर इतकी ओढाताण, इतके घोटाळे घरांत झाले नसते. अखेर सावकाशीनें वासूची आठवण येते. नव्हे, आणली जाते. जराशी शरम, जरासा विस्मय यांनीं मन टकटकतं. दुसऱ्या स्नेहधाग्यावर धाव घेतं...

आजच दहाच्या सुमारास दादर बस-स्टॉपपाशीं वासू दिसला होता. मी मेहताच्या मोटारींत होतों व बँकेंत भरणा करायला निघालों होतों. गाडींत आणिक जागा होती व मेहताला सांगून वासूला सहज आंत घेतां आलं असतं. पण तो दिसल्यावर गाडी थांबवावी व त्याला बोलवावं अशी कल्पनाहि मला सुचली नाहीं. जागजागीं

ून अनेक ओळखीचे लोक असतात, त्यांतलाच एक वासू. सर्वांनाच कुठं घ्यायचं ?—पण कदाचित् दादरची नटवी माणिक सरंजामे दिसली तर मोटार थांबवायचं नक्की सुचलं असतं. कचेरीसमोरचा डॉक्टर सेन असता तर तसंच वाटलं असतं. पण डॉक्टरहून, माणिकहून मोटा असलेला ाज वाटेवरचा सामान्य इसम वाटला एवढं खास !

वं आश्चर्य मानावं न मानावं, तों शनिवारचा प्रसंग समोर येतो. शनिवारीं ाळीं तो नि मी चर्चगेटपासून दादरपर्यंत बरोबर होतों. पुरीं पंचवीस-ानिटं एका डब्यांत, एका बांकावर होतों. तेव्हां मींच त्याला जवळ बोलावून दिली. तो बसला, त्यानें सिगरेट पुढें केली व मीं ती मजेंत ओढली. गाडी ाली. पांचसहा प्रश्नोत्तरं झालीं. बाकीचा वेळ आम्ही मूकपणें आजूबाजूच्या वी त्रेधागर्दी पाहात होतों. दादर येतांच तो उठला. 'ओऽके' का कायसं ा नि गर्दींत घुसला. मी जरा सांवरून बसलों. कुणी नवा इसम शेजारीं येऊन त्याच्याजवळचं संध्याकाळचं वर्तमानपत्र पाहूं लागलों.

ाळपास अशाच औपचारिक, उपऱ्या, तकलादू भेटी गेल्या आठदहा महिन्यांत . अशाच—स्टॉपपाशीं, गाडींत, हॉटेलांत, सिनेमागृहांत. सिगारेटच्या ेवाणीनें, एका टेबलावर जेवण केल्यानें, एकमेकांच्या कुटुंबांना घरीं येण्याचं ग केल्यानेंसुद्धां त्या भेटींना वाढत्या स्नेहाचं स्वरूप आलं नाहीं. एकमेकांच्या , सिगारेटचे ब्रॅंड्स, विचार, चवी, कामं—सारंच वेगळं होतं. आतां अखेर-भसंच अर्धवट, ओझरतं, अचानक भेटत राहायचं हें आम्हांला उमगलं होतं.

ूला नौकरीनिमित्त मुंबईत येऊन वर्ष होत आलं होतं. आल्यावर पंधरावीस नींच तो चौपाटीवर अचानक मला दिसला होता. तेव्हांपासूनची आमच्या वी ही विद्रूप, विचित्र नोंद आहे. चौपाटीवर बऱ्याच वर्षांनीं प्रथम भेट तेव्हां आम्ही हॉटेलांत व समुद्रकांठीं अर्धाएक तास एकत्र घालवला, तीच त् अखेरची प्रदीर्घ, गाढ भेट ! पुन्हा भेटणं, स्नेह वाढवणं कठिण आहे, अप्रूपतेचं, आवश्यक नाहीं, ही जाणीव झाली ती त्याच भेटींत. कुमारवयांतील अमर्याद, मुसमुसत्या मैत्रीची अंधुक आठवण आली तीहि भेटींत !

पाटीजवळच्या हॉटेलांतल्या त्या भेटीची आठवण उजाड मनानें मी ह्या

चांदण्या रात्रीं काढतों आणि मग पंधरावीस वर्षांपूर्वींची अशीच एक भेट माझ्या मनांत उगवते. इराण्याच्या झगझगीत, भरगच्च हॉटेलांत नव्हे, तर मोडकळलेल्या घेडगुजरी उडपीच्या उपाहारगृहामागें. अशाच संध्याकाळच्या सावल्यांतून सदरा नि चड्डी घातलेला वासू घाईनें मला भेटायला त्या संकेतस्थळीं आला होता. घाईंत धावतांनासुद्धां तो बोलिंग टाकल्याचा हावभाव करीत असे. तेव्हां त्याचं केसांचं झुल्प कपाळावर येई, कपाळावरची उभी खोकेची खूण झाकून टाकी. चोरून विहिरींत आम्ही पोहायला गेलों होतों तेव्हां बसलेला तो घाव. मीं तो पानकणीस लावूनलावून भरून आणला होता; अन् मला अत्यंत आवडणारे, हेवा वाटणारे, त्याचे दाट केस तो घाव वारंवार दडवीत होते.

"राजा—" वासू जवळ येऊन म्हणाला, "फार लागलं नाहीं ना रे ?—लंबूसरांनीं उगाच मारलं तुला."

त्याची नजर माझ्या डाव्या हाताकडे होती. मीं झटकन् तो हात मागें लपवून म्हटलं, "हट् ! एक छडी ती काय लागणार ?—हेडमास्तरांच्या छड्या खाऊन हाताला घट्टे पडले आहेत. लंबूसरांच्या शेळपट छडीनें काय होणार ! पण तूं मात्र माझ्यासाठीं उगाच मास्तरांशीं तंटा केलास."

"मग ?—" वासू उसळून म्हणाला, "मास्तर मारतो म्हणजे काय ! मी—"

"वासू, खरं म्हणजे माझी चूक होती. मास्तर चिडले ते अगदीं—"

"कबूल रे !—पण तुझी चूक असली तरी तुझी बाजू मीं घ्यायलाच हवी. मला कळलं होतं, मास्तर बरोबर होते तें; पण म्हणून काय तुला उघडा, एकटा टाकायचा काय ?"

वासूच्या शब्दांनीं माझं मन भरून आलं. मला मारतांच त्याची मुद्रा क्रुद्ध झालेली होती, ती मला परत दिसली. आणि आतां माझ्याकडे पाहून तो हसत होता. हसतच म्हणाला, "छडीबद्दल तुला बक्षीस देणार आहें मी. आमच्याकडे आलं पाहिजेस तूं आज. घरीं आईनें मासे तळले आहेत."

"नको वासू, तूं खूष आहेस तर उडपीकडे घावन खाऊं हवे तर."

"छट् ! अगदीं भटजी राहूं नकोस; चल घरीं."

"नको, मांस खायला मला कांहीं वाटत नाहीं; पण दादांना आवडणार नाहीं."

दादांचं नांव काढतांच त्यानें ओढून धरलेलं माझं मनगट सोडून दिलं. आपला आग्रह सोडून दिला. दादांच्याबद्दल मला केवढा दरारा वाटतो, भक्ति वाटते, हें त्याला ठाऊक होतं. तो स्वतः पितृछत्राला पारखा होता नि माझ्या दादांना मानीत होता. वडिलांना फसवावं हें त्यालाहि पसंत पडलं नाहीं. आम्ही असेच उपाहार-गृहांत गेलों. लंबूसरांवर विनोद करीत घावन खाऊं लागलों.

...वर्षभरांत वेगानें वाढलेली आमची दोस्ती दिवसेंदिवस अमाप श्रेणीनें वाढतच जाऊं लागली होती. सकाळीं अभ्यासाला म्हणून, दुपारीं शाळेंत व संध्याकाळीं मैदानावर असा दिवसाचा बहुतेक भाग आम्ही एकत्र काढीत होतों. वासूसाठीं अखेर दादांना न कळवतां मीं माशाचं कालवण भुरकलं. वासूहि दादांकडे लहान-सहान कामासाठीं मार्गदर्शन मागूं लागला. हळूहळू वर्गांत व बाहेर उंडारायची, दंगा करायची, वेडीवाकडी मस्ती करायची वृत्ति कमी होऊन आम्ही अंतर्मुख बनलों. इतर स्नेह्यांच्यापासून बाजूला पडलों. इंग्रजी सहावीसातवींतले ते दिवस! डायरी लिहायची कल्पना तेव्हां निघाली. रोज रात्रीं आम्ही उभ्या दिवसाचा तपशील व त्यावरचे विचार लिहून काढीत असूं. माझ्या वहींत सर्वत्र वासूच भरलेला असे. त्याचीच संगत नि त्याचंच चिंतन. आईवडिलांपासून तुटक व्हायचं, घरांतून मनानें बाहेर पडायचं विचित्र वय तें! कधीं कधीं येणारे समवयस्क आते-मामेभाऊ मला खुळे, खुजे वाटत. जगांत एक भाऊ, एक नातं असेल तर तें वासूचं, असं वाटे. स्त्री-प्रेम अजून उमगायचं होतं. स्त्री अजून मनांत रुजायची होती, सजायची होती. स्त्री नव्हती म्हणून तिच्यासह येणारी असूया, स्वार्थ, लंपटपणा अजून उगवला नव्हता. नुसती निर्हेतुक, निस्वार्थ प्रीति. भ्रातृभावापेक्षां कसली तरी अधिक खोल भावना. आणि ती वाढवणारं, वागवणारं काव्यात्म, कुमार वय! स्त्री तर नकोच, पण नातलग नकोत, इतर सुखसोयी नकोत, केवळ वासूचा सहवास असावा, अशी थरथरती पण अमर्याद, काव्यात्म अन् कोवळी भावना अंतर्बाह्य भरून गेली होती.

ह्याच नशेंत, ह्याच काव्यात्म वृत्तींत त्या दिवशीं रात्रीं मी वासूकडे गेलों. नेहमींप्रमाणें रस्त्यावरून शीळ घातली. तो जेवत होता. खुणेची शीळ ऐकतांच तसाच खरकट्या हातानें तो दारांत डोकावला.

"कोण राजा! ये ना आंत."

"नको, तूंच बाहेर ये."

"कां रे? ये कीं."

"नाहीं नाहीं. यू कम् आउट. हें बघ, मी फार वेगळ्या 'मूड' मध्यें आहें. एक अप्रतिम कविता वाचली आत्तां नि तसाच धावत आलों—"

"आलोंच." वासू म्हणाला व आंचवून बाहेर आला. त्याच्या घरामागच्या देवळाच्या सभामंडपापाशीं आम्ही बसलों. हातांतलं पुस्तक पुढें करीत मीं म्हटलं, "ही पहा! चंद्रशेखरांचं नांव आपण फारसं ऐकलं नाहीं. पण ही बघ त्यांची कविता—'काय हो चमत्कार—'."

तो माझ्या 'मूड' कडे पाहात होता. मग माझ्या हातांतलं पुस्तक घेऊन सभामंडपांतल्या समयांच्या व आकाशांतल्या चांदण्यांच्या साहाय्यानें त्यानें ती कविता वाचली. मी त्याच्या मुद्रेकडे पाहात होतों. माझ्या मनांतला आनंद त्याच्या मनांत उमटतो कीं नाहीं ह्याची मला क्षणमात्र काळजी वाटली. पण आमचीं हृदयं एक होतीं. त्याच्या लकबीनुसार तो उद्गारला, "ग्रेट!"

चंद्रशेखरांच्या कवितेनें भारावलेलीं आमचीं मनें मूक होत, सुचेल तें बडबडत राहिलीं! तशाच अवस्थेंत आम्ही देवळापासून दूर झालों. वस्ती ओलांडून गांवाबाहेर पडलों.

चालतां चालतां वासू म्हणाला, "आठवतं? सावरकरांची 'सागरा, प्राण तळमळला' ही कविता आपण प्रथम ऐकली तेव्हां असेच वेडावून गेलों होतों."

मला आठवलें. ते भारलेले क्षण आठवले, त्या अमोल ओळी आठवल्या. मीं समोरच्या माळरानाकडे पाहात म्हटलं, "ती कविताहि केवढी थोर! ही कविता वाचून आपण थक्क झालों, तर ती ऐकून आपण उदास झालों होतों—"

वासूनें माझा हात हातांत घेतला. खांचखळगे चुकवीत आम्ही पुढ्यांतली टेकडी चढूं लागलों. मन बेचैन झालं, उदास झालं अगर फुलून निघालं कीं टेकडीवर जाण्याचा आमचा नेम असे. टेकडीवरच्या त्या कातळावर बसून आम्ही 'उषःकाल', 'सांवळ्या तांडेल' कादंबऱ्या वाचून काढल्या होत्या. शस्त्रास्त्रें जमवून क्रांति करायचे बेत केले होते. घरं सोडून दोघांनीं कुठें तरी जायच्या योजना आंखल्या होत्या. ह्या टेकडीच्या आजूबाजूच्या बागांतून, रानांतून, रात्रींअपरात्रीं व रखरखीत दुपारीं आम्ही मनमुराद हिंडलों होतों. एकमेकांच्या संगतीनें, आधारानें जगांतलं सारं काव्य, सारं बंड, नावीन्य पहायचा, स्पर्शायचा प्रयत्न केला होता. आमच्या वाढत्या

वयाच्या कोवळ्या कल्पनाभावना अशा एकमेकांच्याभोवतीं, एकमेकांमुळें उमलत होत्या.

टेकडीवरच्या कातळावर आम्ही उताणे पडलों व आकाशांतल्या चांदण्या निरखीत राहिलों. आमच्याच भावनांच्या उधाणांनीं आम्ही मूक झालों होतों. कविता, क्रांति, घर, अभ्यास—कांहींच आठवत नव्हतं. आतां केवळ असं मोकळं, शांत पडून राहावं असं वाटत होतं. हळूहळू आजूबाजूचे विचित्र ध्वनीहि विरळ झाले. चांदण्या मागें मागें पळूं लागल्या. सगळीकडे शांत, थंड होऊं लागलं. जणूं पृथ्वीचा गोल अखेर असाच शून्य, शांत होणार; नि त्यावर मी नि वासूच उरणार !

"राजा !"

"काय वासू ?"

"आजकाल मला बऱ्याच वेळां एक दृश्य दिसतं. कां कुणास ठाऊक, पण एका परदेशाच्या बोटींतून आपण प्रवास करीत आहोंत, असं दिसतं. घरांतून पळून गेलों आहोंत, खलाशी बनलों आहोंत, दोघेही काळे कपडे घालून बोटीच्या इंजिनांत कोळसा भरीत आहोंत. बोटीचा भोंगा मोठ्यानें वाजतो अन् मग आपण जावा-सुमात्राच्या दिशेनें जात आहोंत. तूं नि मी ! खूप लांबच्या; कदाचित् न संपणाऱ्या मुशाफिरीवर !—"

वासू सांगत होता नि मी तें दृश्य स्वतः पाहायचा यत्न करीत होतों. विचित्र; विचित्र नि कदाचित् सूचक !—मलाहि कांहीं भाष्य करावंसं वाटलं. पण भानावर येत मी उठलों. म्हणालों, "म्हणजे आपण नक्कीच कुठेंतरी जाणार, एकत्र राहून कांहीं तरी करणार. अन् खलाशी कशाला, चांगले कप्तान होऊन जाऊं कीं !—पण चल आधीं. नाहीं तर परीक्षेची बोट बुडायची आपली ! मॅट्रिकची परीक्षा तीन महिन्यांवर आली, मिस्टर !—"

...मॅट्रिक झाल्यावर मी मुंबईला शिकायला निघालों. दादांच्या मनांतून मला पुढें बॅरिस्टर करायचं होतं. स्वतःच ते मला घेऊन चालले होते. सकाळच्या गाडीनें निघायचं, पण मी पहाटेपर्यंत घरामागच्या माळ्यावर वासूशीं गप्पा मारीत बसलों होतों. गप्पा कुठल्या, नुसतीं अधूनमधून तुटक प्रश्नोत्तरं चाललीं होतीं आमचीं.

"गेल्यावर पत्र पाठव. सगळं लिही—"

"हो. अन् तुझंहि लगेच आलं पाहिजे. तुझा रोजचा कार्यक्रम, कोणतीं पुस्तकं वाचलींस, रोज संध्याकाळीं काय करतोस..."

माझी ट्रंक-वळकटी बांधून पडली होती. कोपऱ्यांतल्या कॉटवर वासू बसला होता व त्या सामानाकडे, कंदिलाकडे, जळमटांकडे पहात होता. जुन्या पुस्तका-वह्यांचे गठ्ठे मी बांधीत सोडीत वेळ दवडीत होतों. वह्यांत असलेली माझी डायरी मीं उचलली, वासूच्या हातीं दिली.

"वाच ही ! स्काउट-मास्तरांच्या सांगण्यावरून आपण डायरी लिहायला लागलों. गेल्या तीन वर्षांची नोंद हिच्यांत आहे. बहुतेक आपल्या मैत्रीची कहाणी पानापानांतून भरलेली आहे. ही मी तुझ्या हवालीं करतों."

त्यानं ती घेतली. एकदम भकास हसून तो म्हणाला, "कहाणी संपली म्हणून ?—"

मीं बावरून त्याच्याकडे पाहिलं. आमच्या दोघांच्या डोळ्यांत पाणी तरारलं. पण मी हसलों नि म्हणालों,

"तुझा विनोद कधीं कधीं कुचकामाचा असतो. तुला वाटतंय्—पण मुंबईच्या वातावरणांत मी तुला विसरेन हें अशक्य आहे. उलट माझं मन इथंच राहील. तुझ्याबरोबर रोज टेकडीवर, देवळांत, बागेंत, ह्या माळ्यावर भटकेल—"

"मला खात्री आहे राजा, मला खात्री आहे." तो म्हणाला व डायरी चाळू लागला.

पहाट फुटली. माझ्या प्रयाणाची वेळ जवळ आली. आमच्या मैत्रींत मिठाचा खडा विरघळत होता. तीनचार वर्षांचा अभंग, अमाप स्नेह चुरगळला जात होता. मला मोठं व्हायला मुंबईला जायचं होतं. परिस्थितीमुळें वासू इथेंच कुठें तरी नोकरी करणार होता.

मी गेल्यावर तो एकटा काय करील? काय वाचील? वाचल्यावर झालेला आनंद कुणाला सांगेल? रोज फिरायला एकटं, भुतासारखं जावं लागेल त्याला. तो टेकडी-वरचा कातळ खायला उठेल त्याला. आपलीं अनेक वेडींवाकडीं, पण प्रामाणिक मतं तो कुणाला सांगेल?—कसा जगेल तो? अन् मी तरी मूर्खासारखा वासूला सोडून मुंबईंत कशाला मरायला चाललों होतों? वासूसारख्या सन्मित्रापुढें मुंबईचं काय मोल? त्या राक्षसी मुंबईत मी एकाकी, वासूविना कसा जगणार ?—साऱ्या प्रवासभर मला हे प्रश्न, हा पश्चात्ताप जाळीत होता. त्या रात्रीची माळ्यावरची, पहाटेची फलाटावरची वासूची मुद्रा मला दिसत होती. व्याकुळ झालेली, घायाळ

झालेली. चिमणीएवढं त्याचं तोंड झालं होतं. हसण्यांत, निरोप देण्यांत सारी खोटी ऐट होती. दुःखानें, विरहानें तो पोळत होता. तो पोळत होता, मी पोळत होतों, जळत होतों. विरह! विरह, वासूचा विरह, जिवलग दोस्ताचा विरह, तारुण्यांत प्रवेश करण्यापूर्वी केलेल्या उत्कट प्रीतीची तातातूट!

एखाद्या विरहिणीला शोभेल असं पहिलं पत्र मीं मुंबईहून वासूला पाठविलं. एखाद्यानें प्रेयसीला जीव ओतून लिहावं तसं माझं सारं दुःख, एकाकीपण मीं त्याला लिहिलं होतं. आमच्या मैत्रीचा मेघदूतच होता तो लिफाफा. वाचलेलं, स्फुरलेलं सारं काव्य त्यांत भरलं होतं. दूरत्वाची, आतुरतेची सारी आर्तता त्यांत आली होती. दोन दिवस मी नुसता लिहीत होतों व लिहून होतांच सुखदुःखाचं विचित्र मिश्रण मला सतावीत होतं. त्याचं तसंच तांतडीनं आलेलं उत्तर मीं पुन्हा पुन्हा वाचलं, सारखं वाचीतच होतों. छे, आमची मैत्री, प्रीति अभंग होती. शरीरानें आम्ही अनेक कोस दूर झालों म्हणून काय झालं? मनानें तर आम्ही सन्निध होतों.

...तेवढ्याच आतुरतेनें मी पहिली सुट्टी पडतांच गांवीं गेलों. स्टेशनावर वासू आला होता. गाडींतून उडी घेऊन त्याला मिठीच मारली मीं! सुट्टींतला सारा वेळ त्याच्याबरोबरच काढूं लागलों. दादाआईना, भावंडांना भेटल्याच्या आनंदापेक्षां वासू भेटला हा हर्ष शतपट होता. रानावनांत, कातळावर आम्ही मनमुराद हिंडलों, खूप बडबडलों, आमच्या मैत्रीचे सारे शिलालेख परत पाहिले. आमचं प्रेम शाबूत आहे असे शिक्के परत साऱ्या स्मृतींवर उमटवले. एवढी गंमतींनीं नि माणसांनीं भरलेली मुंबई वासूशिवाय कशी उजाड, उबग आणणारी आहे हें सांगतांच त्याचं तोंड फुलून गेलं. अन् मी गेल्यापासून गांवाला, कातळाला कशी अवकळा आली आहे हें त्यानें घोगऱ्या स्वरांत पुन्हा पुन्हा सांगितलं.

"राजा, पुन्हा तूं जाणार. मग असाच सुट्टी झाल्यावर परत येणार! ह्या अर्धवट भेटी, आठवड्याचीं पत्रं, असं किती दिवस चालणार?—आपले भावी आयुष्याचे बेत वाऱ्यावर जाणार काय?" तो मध्येंच दचकून म्हणे.

"असं कसं म्हणतोस? मी तुला मुंबईला नेण्याच्या प्रयत्नांत आहें. तिथें एक पारशी गृहस्थ माझा दोस्त झाला आहे. तो—"

"पुरे बुवा! तूं मुंबईच्या गप्पांत फार रमून जायला लागला आहेस."

" मग, तूं नाहीं का, महिन्याच्या बदली नौकरीवर आहेस तर सारखा साहेबाचे गुण गातो आहेस !—"

आम्ही एकमेकांना असं चिडवीत होतों. वेगळ्या चाकोरींत मिसळून जाणं जराहि सहन होईना म्हणून डिवचीत होतों. अर्थात् सारं थट्टेनं, हसतखेळत !

मी पुन्हा परतलों. पुन्हा विरह, व्यथा, निरोप देणें. स्टेशनवर वासूच्या कचेरींतले कांहीं लोक आले होते म्हणून तो जरा अबोल होता. मीहि नेहमीं नाटक नको म्हणून बेफिकीर बघत होतों.

गाडी सुटली. वासू मागें राहिला. लहानलहान होत गेला. त्याच्या कपाळावरची खूण, केसांचं झुल्प, नुकतीच उगवणारी मिसरूड नि गोबरा चेहरा मला किती तरी वेळ दिसत राहिला. हळूहळू तोहि अदृश्यला. वासू नाहींसा झाला. गाडी धावूं लागली. वेळ धावूं लागला. मुंबईच्या दिशेनें माझं मन धावूं लागलं, काळ धावूं लागला. वासू पुन्हा केव्हां दिसणार, भेटणार, असं टकटकणारं माझं मन आपल्याच रडगाण्यानं दमलं, निमूट राहिलं...

...अन् वासू मला दिसला, भेटला. मी दचकलों. विलक्षण दचकलों. माझ्या डोळ्यांवर माझा विश्वास बसेना. त्याच्या कपाळावरच्या खुणेवर विश्वास बसेना. पुन्हा पुन्हा मीं डोळे फाडून पाहिलं. ती खूण झाकायला झुल्प नव्हतं; कारण त्याला साफ टक्कल पडलं होतं. हनुवटी व गाल हिरवे-काळे पडले होते. केवढा वेगळा, प्रौढ, परका दिसत होता तो. तरी तो वासूच होता. वासुदेव गुप्ते ! माझा पंधरासोळा वर्षांपूर्वीचा प्राणप्रिय दोस्त !—

चौपाटीची वाळू तुडवून मी त्याच्यापुढें गेलों. घोगऱ्या स्वरांत ओरडलों, " वासू !—अहो गुप्ते ! "

वासू म्हटलेलं त्याला कळलं नाहीं. गुप्ते ही हाक ऐकतांच तो बघूं लागला. विस्मयानें, आनंदानें माझ्याजवळ आला. " राजा गोखले का ?—व्हॉट् ए स्ट्रोक ऑफ लक् !—"

त्यानें जोरानें माझा पुढें झालेला हात दाबला. पंधरा वर्षांपूर्वी निरोपाच्या वेळेला त्यानें धरलेला हात मला अंधुक आठवला. जराशी शिरशिरी सर्वांगावर उठली. मी त्याच्याकडे अजून पाहातच होतों. गेल्या पंधरा वर्षांत तो मला परका झाला होता, भेटला नव्हता. मी मुंबईला शिक्षणासाठीं आल्यावर दादांनीं पेन्शन घेतलं व

ते माझ्यासाठीं मुंबईलाच बिऱ्हाड मांडून बसले. गांवाशीं माझा संबंध सुटला. आणि मग चारपांच महिन्यांत नोकरीसाठीं वासूहि सांगली-कोल्हापुराकडे कायमचा निघून गेला. यापुढें भेटीचा योग जवळजवळ कठिण होता. नंतर दादाहि अकस्मात् गेले, आणि माझे आयुष्याचे मोठे बेत मोडून गेले. मुंबईत मी एका आयात-निर्यात कंपनींत नोकरी करूं लागलों. संसाराचा डोलारा सारखा डोक्यावर घेऊन उभा राहिलों. त्या कटकटींत गांवीं जायला अगर सांगलीला जायला कधीं जमलंहि नाहीं मला. जाणं-भेटणं कसलं, पुढें पत्रव्यवहारहि संपुष्टांत आला. प्रथम वेळ होत नसे, मग आळस अडवीत असे, अन् अखेर मजकूर सुचत नसे. दहा पानांवरून चतकोर पानावर पत्रं आलीं. कधीं कधीं कार्डावर खुशाली कळवूं लागलों. एकदां तर त्याला लिहून ठेवलेलं कार्ड चार दिवस खिशांतच पडून होतं. त्याचं लग्न झालं तेव्हां तार केली; पण पुढें पोरंबाळं किती वगैरे विचारण्याची आज दहा वर्षांत शुद्धहि राहिली नाहीं.

आणि आज तो वासू अकस्मात् माझ्या पुढ्यांत, माझ्या हातांत हात देऊन उभा होता !

कातळावरच्या अनेक घटका अंधुकपणें माझ्या डोळ्यांपुढें प्रकटल्या. वाचलेल्या कादंबऱ्या, कवितांच्या ओळी दूर कुणी गुणगुणलं. तळलेल्या माशांचा, विहिरींतल्या शेवाळाचा विचित्र वास कुठूनसा आला. सोसाट्याचा धो धो पाऊस पडतो आहे आणि समोरच्या समुद्रांतून बोटींत कोळसे भरीत आम्ही दोघेच दूर चाललों आहोंत असा भास झाला. मीं त्याचा पंजा आणिक जरा दाबला, अन् म्हटलं,

"तूं स्वप्नांत आहेस, कीं मी स्वप्नांत आहें ?"

"स्वप्नच म्हणायचं ! पुन्हा तुझी भेट होईल असं फारसं वाटलं नव्हतं. अन् म्हटलं, भेटलास तरी ओळखतोस कसला ? पंधरा वर्षांत केवढा बदलला असशील ! —मुंबईत चिकार श्रीमंत झाला असशील. पूर्वीसारखा पुस्तकं वाचीत, कविता वाचीत मजेंत वेळ काढत असशील—"

आम्हीं एकमेकांचा हात सोडला. त्यानें जुनाट कोटांतला रुमाल काढून आपलं टक्कल पुसलं. माझ्या बुश्-कोटाकडे कुतूहलानें पाहिलं.

वाळूंत पायानें फरपाटे ओढीत मीं म्हटलं,

"अरे, कसल्या कविता घेऊन बसलास ! गांव सोडलं नि तो मूर्खपणाहि

सुटला. काय खुळयासारखे वाचीत असूं नाहीं आपण ? इथं मुंबईत कसली कविता नि कसला वेळ ? दिवसभर राबतों आहें. दादा गेले—"

"हो, कळलं मला—" तो मान हलवून म्हणाला. मग आम्ही दोघेहि गप्प झालों.

मला एकदम वाटलं कीं कांहीं तरी चांगला विषय काढावा. तो मुंबईत सहज आला आहे कीं नौकरीसाठीं तें विचारूं नये. रुक्ष असं कांहीं बोलूं नये. त्याला असंच घरीं न्यावं. किंवा दोघांनींहि कुठें तरी लांब पहाटेपर्यंत भटकावं. माझी अर्धस्फुट भावना लपवीत फुलवीत, मीं त्याच्याकडे पुन्हा पाहिलं. पुन्हा पुन्हा पाहिलं आणि त्याच्याबरोबर भटकायची कल्पना मुळांतच खुडली गेली! माझ्या मनांत वावरणारी गोबऱ्या चेहऱ्याची, झुलत्या केसांची, मुसमुसत्या विचारांनीं फुललेली मूर्ति ही नव्हती. शैशवांतल्या रम्य स्मृतींचं दैवत तें हें खास नव्हतं. याचं रूप निराळं, नजर निराळी. याचं घोगरं बोलणं, बोलण्यामागच्या भावना वेगळ्या वाटत होत्या. हा कुणी दुसराच, परका पुरुष होता. गेले पंधरावीस तडफडते उन्हाळे व कोसळते पावसाळे पाहिलेलं माझं मन ह्या इसमाशीं कसली साथ करणार ?—मघां स्पर्शून गेलेली थरथरती जाणीवच कदाचित् अकारण आली असेल. मी संभ्रमांत पडलों. स्वतःला सांवरीत म्हणालों,

"चल, चहा तरी घेऊं."

"चलो."

चौपाटी मागें टाकून आम्ही जवळच्या इराण्याच्या उपाहारगृहांत गेलों. चहा-बिस्किटं मागवलीं व पंधरा वर्षांच्या घडामोडींची यादी एकमेकांना सादर करूं लागलों.

मग इराण्याच्या डोक्यावरच्या घड्याळांत साताचे टोले पडले. वासू दचकला. हातावरचं घड्याळ पाहात म्हणाला, "ओ! आय् ॲम लेट. सात वाजले. गेलं पाहिजे घरीं."

मलाहि उशीर झाला होता. तो दादरला तर मी पार्ल्याला रहात होतों. अन् घरीं जाण्यापूर्वी गिरगांवांतून बायकोला घेऊन जायचं होतं. मीं उठत म्हटलं,

"मग येणार ना रविवारीं घरीं—मिसेस्‌ला घेऊन ? ओळख तरी होईल सर्वांची."

"ह्या रविवारीं जमणार नाहीं. पोरांना घेऊन राणीचा बाग दाखवायला जायचं आहे. पुढल्या रविवारीं—"

"हरकत नाहीं. केव्हांहि ये. यू आर वेल्कम्—"

हॉटेलबाहेर आम्ही आलों. फारसं न बोलतां पूल ओलांडला आणि सिनेमागृहाशीं एकमेकांचा निरोप घेतला. पुन्हा एकमेकांना भेटायचं कबूल करून, पुन्हा एकवार हस्तांदोलन करून!

मी सासुरवाडीच्या दिशेनें झपझप चालत होतों. पण माझं मन थबकून, वळून वळून वासूकडे पाहात होतं. आत्तांच्या हस्तांदोलनांत जीव नव्हता! 'पुन्हा भेटूं' हें इतक्या वेळां उच्चारलं कीं तो शुष्क उपचार वाटावा. आणि हॉटेलांत वीसएक मिनिटं बसून काय बडबडलों तर 'तुला नोकरी कुठाय्, ग्रेड् काय, जागा कशी मिळाली, मुंबई आवडते का, सगळं ठीक आहे ना, चला निघूं या—उशीर झाला!...' वासूच्या संगतींत वेळेचं भान मला पूर्वी कधींहि झालं नव्हतं. चंद्रसूर्यांच्या फेऱ्यांनींसुद्धां काळाची मोजदाद आम्हीं केली नव्हती. 'घरीं वाट पाहात असतील, रविवारीं वेळ नाहीं,' असले भकास, भयंकर शब्द आम्हीं पूर्वी उच्चारले नव्हते. इतकी शुष्क, नीरस भेट आजवर झाली नव्हती. कित्येकदां आम्ही खुशालीचंच बोलत असूं. कित्येकदां तर बोलणंहि बंद असे. पण कुणी तरी आपलं, जिवांतलं जवळ आहे अशी जाणीव तेव्हां असे. स्वतःशीं संवाद करावा तसं तें निरर्थक बोलणंहि अगत्याचं वाटत असे. आज तर ही तिऱ्हाइताची त्रयस्थानें केलेली चौकशी होती! त्या चौकशींतहि मोठी आस्था नव्हती. त्याचा संसार, नौकरी, सद्यःस्थिति—सारा इतिहास ऐकून मला विशेषसा हर्षखेद कांहींच झाला नाहीं. तो गेला तरी विशेषसा विरह, तातातूट वाटली नाहीं. फक्त कुतूहलानें मन मागें वळून त्या उगाच जवळ आलेल्या अन् कायमच्या दुरावलेल्या आकृतीला शोधीत राहिलं.

बायको भेटतांच मीं म्हटलं, "उशीर झाला का फार? अग, वाटेंत गुप्ते भेटला—लहानपणचा दोस्त, वासू गुप्ते—"

"म्हंजे, ज्याच्याबद्दल मागं एकदां बोललां होतांत तो होय?—मग खूपच लवकर आलांत म्हणायचे. बालमित्र भेटल्यावर..."

ती कौतुकानेंच बोलत होती नि मी गोंधळून गेलों होतों. वासूला लवकर सोडलं ही खरंच चूक झाली काय?—पण जवळजवळ अर्धा तास मी होतों कीं त्याच्या-जवळ! सारी माहिती समजली. आणिक काय बोलायचं?—आणिक काय

बोलायचं? मला कळेना. वाटलं, बायको उगाच बडबडते आहे. वाटलं, माझं कांहीं तरी चुकतंय्...

कुठं चुकलंय्, कुठं हुकलंय् हें मी अनेक वेळां शोधीत असतों. आजहि या चांदण्या रात्रीं घरांत एकटा असल्यावर मी मुद्दाम या कोड्यांत डोकं घालून बसतों. विचार करतों, वासू नि मी परत पूर्वीसारखे जिवलग स्नेही होऊं का?—आम्ही बदललों आहोंत. अंतर्बाह्य बदललों आहोंत. कवितेची, भटकायची, आवड दोघांनाहि उरलेली नाहीं. दोघे वेगळ्या आयुष्यांची आंखणी करून त्यांत रिंगण घालीत आहोंत. एका रविवारीं वासू खरोखरीच सहकुटुंब सहपरिवार माझ्याकडे आला. आमच्या बायकांत खूपच अंतर होतं. माझी पत्नी ठाकुरद्वारची तर त्याची सावंतवाडीची. कसं जमणार?—आमच्यांतलं अंतर आमच्या बायकांनीं अधिकच वाढवलं. आपल्या मुलांच्यांत रमलेला, बायकोला दबलेला वासू मला अधिकच उणा वाटूं लागला. लहानपणच्या गोष्टी बायकोसमोर काढलेल्या त्याला आवडेनात. माझ्या बायकोशीं तो बोललाहि नाहीं! अन् माझ्या बायकोला तर वासू शेळपट वाटला! 'ईऽ! ह्याच्याबरोबर तुम्हीं मैत्री केली होतीत?—' ती विचित्र स्वरानें म्हणाली. अर्थात् स्त्रियांनींच केवळ आम्हांला दूर ठेवलं असं नाहीं. तसं म्हणावं तर दोनतीन महिन्यांपूर्वीच लंचच्या वेळेला आम्ही कोटांत भेटलों, एका हॉटेलांत, एका टेबलावर जेवलों, पण चार शब्दहि मोहरून बोलण्याचं सुचलं नाहीं. संसाराचा, पैशाचा तसा काय एवढा कांच होता?—पण त्याचं बोलणं वागणं पाहिल्यावर मला तो परका वाटला अगदीं. याच वासूबरोबर मी रात्ररात्र हिंडलों? कातळावर काव्य वाचलं? याच्या विरहानें अक्षरशः अश्रू ढाळले? मला तर चमत्कार वाटतो. भास वाटतो. स्वतःमध्यें पूर्वी कांहीं विकृति होती, हल्लीं कांहीं विकृति आहे, असा संभ्रम पडतो.

मी विचार करतों. वासूबद्दल कां असं वाटतं? त्याचा राग येत नाहीं, तिटकारा येत नाहीं; पण आपलेपणा, उल्हास, ओढ—कांहींच खळबळ होत नाहीं. माझे आजचे कांहीं मित्र अगदीं वेगळ्या संवयींचे, वृत्तींचे आहेत. त्यांच्या संगतींत मी वेळ काढूं शकतों. मग वासूच्याच लकबी, वृत्ती नकोशा कां वाटतात? त्याच्या पुनर्भेटीबद्दल, मैत्रीबद्दल उल्हास कां वाटूं नये? उलट आळस कां वाटावा? विशिष्ट वयांत होऊन गेलेल्या विशिष्ट प्रेमाचं असंच असतं काय?—तेव्हांच त्याची जरूर असते, तेव्हांच तें बहरतं, अन् मग कायमचं सुकतं, निर्माल्य होतं? पण मग

दादांच्या, पितृप्रेमाच्या आठवणीनें, ओढीनें अजून मी कां बावरतों ? अन् कुंदा ! अशान्त कोवळ्या वयांत प्रीतीची देवाण-घेवाण करून ती पळून गेली, कायमची दुरावली. माझा इकडे संसारहि सजला. पण कुंदा आजहि जरी कुठें दिसली, भेटली कीं जीव कसा आकांत करीत उठतो. मग वासूचं प्रेम काय कमी प्रतीचं होतं ? कदाचित् कुंदाच्या प्रेमापेक्षां सरस, सुदृढ; पण म्हणूनच तें कुंदाच्या प्रीति-पुष्पासारखं पुन्हा पुन्हा फुलत नाहीं, एकदांच बहरतं व कायमचं निर्माल्य होऊन जातं, होय ?...

ह्या साऱ्या विचारांनीं मी बावरून जातों. वासूची मैत्री संपली, कायमची संपली, या विस्मयानें झाकळून जातों. ती मैत्री परत व्हावी, वाढावी, असं खरं म्हणजे मनापासून वाटत नाहीं. त्याबद्दल उत्साह, आकर्षण वाटतच नाहीं. केवळ साऱ्या घटनेबद्दल सखेदाश्चर्य वाटतं ! आणि वाटतं, हें असंच अखेरपर्यंत चालणार ! — वासू वारंवार सिनेमागृहाशीं, बस-स्टॉपपाशीं, गाडींत, हॉटेलांत दिसतो—तसाच तो अर्धवट, अचानक, ओझरता दिसणार, भेटणार ! तो गाडींत पुरा पंचवीस मिनिटं भेटला तरी पंचवीस वाक्यं मला मनापासून सुचणार नाहींत. बस-स्टॉपपाशीं तिष्ठत उभा असला तरी मोटार थांबवून त्याला आंत घ्यायचं अवधान रहाणार नाहीं. अन् खोल कुठें तरी चुकल्यासारखं वाटलं, वरवर विचित्र वाटलं, तर लगेच मीच पढीकपणें म्हणणार, मुंबईत कसले मित्र नि भावना ! हें यंत्रयुग आहे. इथं अशींच नातींगोतीं नाहींशीं होतात.

* * *

# पंडितराव ११

कचेरींतलं काम सोडून पंडितराव कचेरीमागच्या मोरींतल्या आरशांत आपला चेहरा मनमुराद न्याहाळीत होते. पंडितराव हें त्यांचं नांव नाहीं अगर आडनांवहि नाहीं. पण पंडितराव म्हणूनच ते सर्वत्र ओळखले जात होते. कधींतरी त्यांच्या एखाद्या उपद्रवी उद्योगामुळें अगर हिकमती हुषारीमुळें पंडितराव ही उपाधि त्यांना जडली असावी. त्यांचं बिऱ्हाड असलेल्या बाजारपेठेंतल्या चाळींत काय किंवा स्टेशननजीकच्या सरकारी कचेरींत जिथे ते कारकुनी करीत तिथें काय, तुरुतुरु चालणारी, चालतांना चौफेर पाहणारी, कुणी दिसतांच आर्जवी हास्य करणारी व कुणी नसतांना कसल्याशा योजना घोळवणारी आकृति म्हणजे पंडितराव असं खुशाल ओळखलं जात होतं. होतेच ते तसे टेंगणेटुसके, किरकोळ यष्टीचे पण मोठ्या डोक्याचे, काळ्या वर्णाचे व काळ्या वर्तुळांत भेदक डोळे असलेले. दुरून पाहिलं कीं ते तिरसट, त्रासिक वाटत; पण एकदां त्यांची ओळख झाली कीं त्यांच्या अडचणी, कुचंबणा ऐकून करुणा येई. खरं म्हणजे पंडितराव ही पदवी त्यांना पूर्णपणें शोभत नव्हती.बुद्धिमान् अगर बुद्धिहीन माणसाचे भाव त्यांच्या तोंडावर फारसे नसत. उलट एखाद्या दुःखी, दुर्दैवी इसमासारखे त्यांचे भाव, हावभाव असत. कशानें तरी गांजलेला, पीडलेला हा इसम असावा असा त्यांच्याकडे पाहून समज होत असे.

आत्तांहि मोरींतल्या अंधुक आरशांत आपल्या डोळ्यांखालच्या काळ्या कडा पाहून पंडितराव दुःखाचा निश्वास सोडीत होते. काळजीनें त्यांचे डोळे काळे झाले होते व केस पांढरे पडले होते. सगळीच काळजी. घरची, दारची, कचेरीची. माणसाला नीटपणें, नेकीनें आयुष्य कंठणं कठिण झालं होतं. सर्वच जण सत्तांध, स्वार्थी बनले

होते. गरिबांची, गांजलेल्यांची कुणालाच कणव येत नव्हती. त्यांच्या दुःखाला कुणी दाद देत नव्हतं—अशा अर्थाच्या आठ्या पंडितरावांच्या कपाळावर उमटत होत्या. अनेक संकटांचं ओझं शिरावर कसं पेलावं ह्याचा पेच त्यांच्या जिव्हणीला पडला होता. आपले बसलेले गाल, निमुळतें नाक व हिरवी हनुवटी चाचपीत ते चेहरा हसरा करण्याचा यत्न करीत होते. पण त्यांच्या मुद्रेवरची दुःखाची छटा पुसून जात नव्हती.

"पंडितराव—अहो—" पाठीमागून पट्टेवाल्याची हाक आली व पंडितराव दचकले. "चलावं! साहेब कवांपासून घंटी मारून राहिलाय्. बोलवतुय् तुम्हास्नी." पट्टेवाला मग्रूरपणें म्हणाला, अन् पंडितरावांचा चेहरा पडलेला पाहून छद्मीपणानें हसला. पंडितरावांना चीड आली. त्यांच्याकडून पट्टेवाल्याला कधींहि पोस्त मिळत नसे, म्हणून पंडितरावांवर त्याचा रोष होता. माणसांनीं एवढं स्वार्थी, खुनशी असावं ह्याचा पंडितरावांना विषाद वाटला. तसाच साहेब! सारखा पंडितरावांच्यावर दांत धरून होता. पंडितराव कामकाजांत मुरलेले म्हणून त्यांना फाइलींचें ओझें वगावायला लावीत होता. कमालीचा दुःखी चेहरा करून पंडितराव आरशापासून दूर झाले. खालीं पाहात, पुटपुटत, कारकुनांच्या, टेबलांच्या रांगांमधून गेले. साहेबांच्या खोलींत शिरले.

"डॅम् इट्! हें मांडलंय् काय तुम्ही?" पंडितरावांची चाहूल लागतांच साहेबांनीं कागदपत्रांतलें डोकें वर केलें व टेबलावर मूठ आपटली. मुठीचा आविर्भाव पाहतांच पंडितरावांनीं हात जोडले. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. काळा साहेब लाल पडला व गर्जू लागला, "पेंडिंग, पेंडिंग. पंधरा दिवसांचं काम पेंडिंग. एकहि केस संपवली नाहींत तुम्हीं. अर्जंट, टॉप प्रायॉरिटी, सारे महत्त्वाचे कागदहि तसेच ठेवलेत. काय झालंय काय तुम्हांला? आज पंधरा वर्षं नौकरी करतां आहांत, पण अजून तुम्हाला—"

"साहेब—"

"शट् अप्! सबबी खूप ऐकल्या तुमच्या. तुमच्या बरोबरीचे लोक हेडक्लार्क, सुपरिंटेंडंट झाले. अन् तुम्ही!—तुम्ही परीक्षेला बसलां नाहींत. सारा वेळ तुम्ही मला रजेचे अर्ज करतां नि मी तुमच्या विरुद्ध वाईट कामाचा रिपोर्ट करतों. साऱ्या कचेरीची शिस्त बिघडवतां आहांत. तुम्हांला डिसमिस केलं पाहिजे, डिसमिस..."

साहेबाच्या बिथारी जिभेचा पट्टा चालूच होता. पंडितरावांना घाम फुटला.

त्यांचा अनुभव, काम करायला घेतलं कीं दाखवलेली तडफ, इतरांना साहाय्य करण्याची वृत्ति साहेब समजूनहि घेत नव्हता. त्यांच्याबद्दल इवलीशी सहानुभूतीहि दाखवीत नव्हता. पंडितराव पांढरे फटक पडले. साहेब शिव्यांचे शिंतोडे उडवीतच होता. बाहेर कारकून लोक हसत होते, चपापले होते. पंडितरावांना वाटलं, साहेब दमून थांबेल. पण त्याच्या संतापाचा पारा खालीं उतरत नव्हता. पंडितरावांना परत जायला सांगत नव्हता. हें कधीं संपणार हें त्यांना उमगेना. धरणी दुभंगली तर बरं होईल असं त्या दुर्दैवी जीवाला वाटूं लागलं.

मग एकाएकीं पंडितरावांचे डोळे फिरले. हातापायांना कांपरं भरलं. डोकं गरगरूं लागलं. अन् ते शक्तिपात झाल्यासारखं होऊन पटकन् खालीं बसले. साहेबाच्या जिभेचा पट्टा तुटला. बावरून तो उभा राहिला. पंडितरावांच्याकडे पाहूं लागला. पंडितरावांना घेरी आली होती ! साहेब घाबरले व घंटा बडवूं लागले. पट्टेवाला धावत आला. पंडितरावांना उठवूं लागला. साहेबांनीं टेबलावरच्या कांचपात्रांतलें पाणी पंडितरावांच्या तोंडावर टाकलें. तेवढ्यांत आणिक दोन तीन कारकून धावत आले, आणिक उपचार करूं लागले.

अंमळशानें पंडितरावांनीं डोळे उघडले व उठून उभं राहात म्हणाले, "माफ करा, साहेब. आज अन्नहि पोटांत गेलं नाहीं म्हणून—तब्येत बरी नाहीं माझी साहेब—"

"नेहमीं कशी तब्येत ठीक नसते तुमची ? आजारी असतां तर औषध घेत जावं !" साहेब पुटपुटला.

"सगळ्याच अडचणी आहेत, साहेब. घरच्या नि पैशाच्या. दहा माणसांचा संसार, पुन्हा वडिलांनीं करून ठेवलेलं मारवाड्याचं कर्ज—"

"बरं, बरं. जा, जरा विश्रांति घ्या—" साहेब गुरगुरला व दणदिशीं खुर्चीवर बसला. पंडितरावांनीं बाजूच्या पट्टेवाल्याला बोलवून त्याच्या अंगाचा आधार घेतला व ते आपल्या टेबलाशीं गेले. कपाळ चेपीत बसले. त्यांना मदत करण्यास धावलेले कारकून मात्र साहेबाच्या खोलींत अडकले गेले. पंडितरावांचं पेंडिंग काम त्यांना साहेबांनीं वांटून दिलं. जादा वेळ बसून त्या तरुण कारकुनांनीं तें मागें पडलेलं, महत्वाचं काम उरकून टाकायचं होतं.

पट्टेवाल्याकडून पंडितरावांनीं कडक कॉफी मागविली व त्याचे कढत घुटके घेत

ते त्या दोन कारकुनांना म्हणाले, "माफ करा हं! माझ्यासाठीं तुम्हांला तसदी पडते आहे. काय करूं हो, आमचं नशिबच्च शिंचं..."



संध्याकाळीं सहा वाजतां कॉफीचा आणिक एक कप प्यायल्यावर पंडितरावांचं मळमळणं थांबलं व त्यांना हुषारी वाटूं लागली. तरी पण ते तसेच बसून राहिले. कचेरी सुटली तरी ते कारकून पंडितरावांचं काम करीत होते, आणि पंडितरावांनीं उठून जाणं म्हणजे कृतघ्नपणाचं ठरणार होतं. म्हणून पंडितराव कारकुनांनीं दिलेला वेलदोडा चावीत शून्यपणें, दीनवाणे बसून राहिले. अखेर साहेब गेला. ते कारकूनहि "पंडितराव, तुम्ही कशाला उगाच थांबतां —" म्हणून वारंवार म्हणूं लागले, तेव्हां पंडितराव उठले व कचेरीबाहेर पडले.

बाहेर बससाठीं मोठी रांग उभी होती. पंडितराव रांगेपुढून गेले. त्यांची अडचण ओळखून त्यांना आधींचा नंबर देण्यास तयार होणारं कुणीच दिसत नव्हतं. सगळेच घाईत अन् सगळेच उर्मट. पंडितरावांनीं कडू तोंड केलं. उशीर झालेला असल्यानं त्यांचा नेहमींचा बसवाल्याहि भेटण्याचा संभव नव्हता. तो बिचारा गरीब असूनहि मोठ्या मनाचा होता. पंडितरावांना केवळ एक आण्यांत गांवांत सोडीत असे.

पंडितराव पुटपुटत, खालीं पाहात, कडेकडेनं चालूं लागले. अनेक कल्पना त्यांच्या मनांत घोळत होत्या व अनेक विचारांनीं ते व्यग्र होत होते. पुलावर येतांच त्यांचे पाय थबकले. त्यांना वाटलं, कशाला इतक्यांतच घरीं जायचं?—सारा दिवस कचेरीच्या कोंडाळ्यांत काढला; आतां उरलेला वेळ घराच्या चक्रव्यूहांत दवडायचा. सारा वेळ स्वतःला कोंडून, गुदमरून घ्यायचं. त्यापेक्षां इथल्या मोकळ्या वातावरणांत मजेंत घटकाभर बसलं तर जिवाला तेवढाच विरंगुळा वाटेल. फुलावरून उलट सुलट धावणारीं वाहनें, कडेकडेला खडे असलेले खाद्यपदार्थांचे विक्रेते व फुटपाथवरची गर्दी त्यांनीं दीन मुद्रेनें पाहिली. मोटर नाहीं, मिठाई नाहीं, पण निदान मोकळी हवा तरी! त्यांनीं स्वतःचीच समजूत घातली व पुलाच्या दगडी कठड्यावर ते बसले.

तेवढ्यांत दूरच्या डोंगराच्या दिशेनें वारा वहात आला, नदीच्या प्रवाहावरून थंड होत आला व पंडितरावांना सुखावून गेला. कॉफीच्या कढत कपासारखा.

टवटवीत वृत्ति झालेल्या पंडितरावांची मुद्रा मात्र लाचार राहिली व ते पुलाखालचं पाणी, पलीकडचं उद्यान, सिनेमागृहाचा झगझगाट पाहात राहिले. जणूं चोहों बाजूचा तो गहिरा आनंद पंडितरावांच्या दुर्दैवी, एकाकी आयुष्यावर उतारा होता. महिवाला व बायकोला विसरून पंडितराव गजबजलेली संध्याकाळ तेथें घालवूं लागले.

अंधार वाढूं लागला, जागजागीं दिवे दिसूं लागले व पंडितराव भानावर आले. इतका वेळ उगाचच बसल्याबद्दल त्यांची मुद्रा अपराध्यासारखी झाली. भोवतालच्या चित्रविचित्र दृश्यांवरून त्यांनीं दृष्टि काढून घेतली. जणू साऱ्या वस्तूंची क्षमा मागत. आपल्याला सहानुभूति दाखवून सृष्टीनं मायेची फुंकर घातली जणूं !— मग मात्र ते झपझप निघाले. आजूबाजूला न पाहतां पावलें टाकीत गांवांतल्या गजबजलेल्या रस्त्यानं निघाले.

• • •

एकदम ते एका बोळांत शिरले. खालीं मान घालून एका अरुंद दाराच्या घरात घुसले. एक आडदांड इसम दाराकडे येत होता, त्याला अंग चोरून त्यांनीं वाट करून दिली व ते दिवाणखान्यांत शिरले. तिथें पांचसहा पोरी बसलेल्या होत्या त्याच्याकडे त्यांनीं दृष्टि फिरवली व मग उंबरठ्यावरच उभे राहून पोपटाच्या टांगलेल्या पिंजऱ्याकडे ते पाहात राहिले.

"या ना, शेट—आंत या. तुमची बेगम आहे. येत्येय् आतां !" एक पोरगी म्हणाली व मग साऱ्याच हसूं लागल्या.

पंडितरावांना खेटरं मारल्यागत झालं. पण ते तसेच उभे राहिले. आयुष्यांत काय काय भोग वाट्याला येतील ते भोगले पाहिजेत ह्या विचारानं! नाहीं तरी त्यांचं दैवच विचित्र, म्हणून त्यांना अशा वाईट जागीं यावं लागत होतं.

तेवढ्यांत त्यांची बेगम, घरांतली सर्वांत सुमार रूपाची पण सरळ मनाची, द्युतिप्रभा आंतून नट्टापट्टा करून आली. पंडितरावांना पाहतांच आनंदानं थबकली. "किती दिवसांनीं तरी—" ती पुटपुटली व पंडितरावांचा हात धरून आंत गेली. तिचा स्पर्श होतांच पंडितरावांचं शरीर सुखावलं. जणूं डोंगराकडचा नदीवरून वहात असलेला प्रसन्न वाराच त्यांना स्पर्शून गेला. एका अंधेऱ्या अरुंद खोलींत ते पलंगावर बसले व डोक्याची घडीची टोपी काढून घेऊन वारा घेऊं लागले.

"इतके दिवस आलां नाहींत—"

"वेळ कुठें होतोय. रोज घोकतोय यायचं म्हणून. पण कामं, अडचणी संपताहेत कुठें ! ह्यांतच मी झिजून अखेर—"

"असं नगा बोलूं वं—" दाराला कडी घालीत शशिप्रभा उद्गारली. तिच्या स्वरांत पंडितरावांच्याबद्दलचं सारं प्रेम प्रकट झालं. हा शिकलासवरलेला, नौकरीदार, पैसेवाला मनुष्य केवळ स्त्रीसुखाला घरीं पारखा झाल्यानें नाइलाजानं इथें येतो व इथल्या गंगू, राधा, रत्नी, यह्नी इत्यादि चांगल्या, मागणी असलेल्या मुली सोडून आपल्यासारखीवर लोभावतो ह्या जाणिवेनं शशिप्रभा हरखून गेली होती. फारशी कमाई होत नसल्यानें तिला चैनबाजी करतां येत नव्हती अथवा देवधर्महि करतां येत नव्हता. राधा नि रत्नी रोज सिनेमा पाहात, साड्या घेत, मिठाई खात. गंगू मिळणाऱ्या पैशांतून दर गुरुवारीं जंगलीमहाराजास व रोज एका भटजीस धर्म करीत असे. यह्नी आपल्या बहिणीकडे ठेवलेल्या लहान मुलीसाठीं पैसे सांठवीत असे. शशिप्रभाला असं कांहींच शक्य नव्हतं. काळा वर्ण, बेढब शरीर व पुढें आलेले दांत कुणा रंगेल इसमास आवडतील ?— तिच्या रात्रीच्या रात्री गिऱ्हाइकाशिवाय जात. खाण्यापिण्याचीच पंचाईत पडे तिथें मनाचे चोचले कुठून पुरवणार ?

पण पंडितरावांनीं तिचा प्रश्न सोडवला. द्रव्याचा नाहीं, पण भावनांचा. लग्न झाल्यापासून क्षयानं पिचत पडलेल्या पत्नीच्या औषधपाण्यांत पंडितरावांची सारी रोकड जात होती. दारिद्र्य येत होतं. आणि वर स्त्रीसुख तर नाहींच ! दोन अडीच वर्षांपूर्वी जेव्हां पंडितराव यांनीं प्रथम इथें पाऊल टाकलं व नेमकं तिला निवडलं, तेव्हां तिला अचंबा वाटला. अन मग एकांतांत पंडितरावांची ही करुण कहाणी ऐकून ती कळवळून गेली. कधींमधीं पंडितराव येत व शशिप्रभा खुलून जाई. चैन नाहीं, धर्म नाहीं, पण ह्या पिडलेल्या, दुर्दैवी गृहस्थाला आपण सुख देतों, ह्याचा शीण उतरवतों ह्या कल्पनेनं ती वेडावून जाई.

आत्तांही ती त्याच कळवळ्यानं व त्याच कौतुकानं पंडितरावांच्या पुढ्यांत गेली. म्हणाली, "कशी आहे तुमच्या बायकोची तब्येत—"

"नको विचारूं !" पंडितरावांनीं त्या अंधारांतहि दुःखी मुद्रा धारण केली. "नको दुःखावर डागण्या देऊं. दुर्दैवाचे दशावतार संपतील तेव्हां संपतील. शेकडों रुपये खर्चूनहि उपयोग नाहीं—"

त्यासरशीं शशिप्रभानं अनुकंपेनं त्यांना मिठी मारली. गुदमरल्या आवाजांत ते पुढें म्हणाले, "दुःखांत एवढंच सुख कीं तूं—"

"माझं काय ! मी आपली कुठं नीट सेवा करतें—" शनिप्रभा सिनेमांतल्या-सारखं बोलली. तिला सिनेमा पाहणाऱ्या राधा व रत्नी व दानधर्म करणाऱ्या गंगी नि यल्ली तुच्छ वाटूं लागल्या. ह्या थोर पुरुषाचे, दुर्दैवी जीवाचे पाय चुरावेत असं वाटूं लागलं.

पण तेवढ्यांत पंडितरावांनींच तिचे पाय धरले. "हें हो काय?" ती उद्गारली व त्यांच्यासह पलंगावर बसली. "तुम्हांला घरांत सुख नाहीं हें समजतं मला. म्हणूनच—"

पंडितराव तिला मिठी मारीत करुण स्वरांत म्हणाले, "तसं नाहीं ग. पण तूं निम्मेच पैसे माझ्याकडून घेतेस. कधीं कवडी जादा मागत नाहींस. वाटेल तितका वेळ बसूं देतेस...खरं म्हणजे तुला मी सोन्यानें मढवून काढायची. एखाद्या राणी-सारखी ठेवायची. मला तें अशक्य नाहीं ! पण काय करूं, आमचं नशीबच शिंचं..."



शनिप्रभाला सोडून बाहेर पडायला पंडितरावांना साडेदहा वाजले. त्यांचं शरीर सुखावून गेलं होतं, पण मन मात्र काळजीनें अधिकच व्याकुळ झालं होतं. घाम पुशीत व धापा टाकीत ते घाईनें घराच्या रस्त्याला लागले. वाटेंत त्यांनीं बालाजीच्या देवळाला नमस्कार केला. किराणा मालाचं त्यांच्या मित्राचं दुकान बंद असलेलं पाहून सुस्कारा सोडला. वाड्याच्या दिंडींत पहुडलेल्या कुत्र्याला वळसा घालून ते आपल्या बिऱ्हाडाशीं आले.

दार नुसतं लोटून घेतलं होतं व आंतून अंधुक उजेड येत होता. पंडितराव हलकेच आंत आले व कपडे उतरवूं लागले. एवढीशी जागा, जुनाट सामान, अपुरा उजेड—संसाराचं तें स्वरूप पाहून त्यांचा जीव अधिकच अस्वस्थ झाला. काय हें दैन्य, दुर्दैव ! अनेक दुःखद भावनांनीं त्यांचं मन बधिर झालं.

खिन्न चेहरा करून ते स्वैंपाकघरांत गेले. जडपणें हातपाय धूत म्हणाले, "भयंकर भूक लागली आहे. काय केलं आहेस जेवायला ?—"

"नेहमींचंच—" चुलीजवळून आवाज आला.

"नेहमीं काळजीचे दगडच पोटांत ढकलतों आहें. जीव हैराण झालाय अगदीं.

शरीर आखून गेलंय. कांहीं तरी जिभेला चव येईल असं कर. थालीपीठ टाक त्यावर—"

धोतराला तोंड पुसून ते पाटावर बसले. च्रुल फुलविणाऱ्या पत्नीकडे पाहूं लागले. नवरा उशिरां आला म्हणून तिच्या चेहऱ्यावर चिंता पसरली होती. पंडितरावांनीं तें हेरलं. त्यांना वाटलं, ती विचारील. पण ती बोलली नाहीं. तो अबोला पंडित-रावाना त्रासदायक होऊं लागला. साहेबाच्या वाक्ताडनाइतका त्रासदायक !

तेवढ्यांत थालीपिटाचा खमंग वास सुटला. पंडितरावांचा चेहरा त्यासरशीं काळजीनं काळवंडून गेला. "हे अकरा वाजले जेवायला ! —सकाळीं शिकरण-पोळी खाल्ली ती सारी ओकून पडली. वर चहाचा घुटका घ्यायलाहि सवड सांपडली नाहीं. काय करणार !—कचेरींत कोण काम !—साहेबाची मर्जी असली म्हणजे असा झटका पडतो. सगळेच तरुण, उडाणटप्पू कारकून. कुणी काम करीत नाहीं नि माझा कांटा ढिला होतो. आज दहा वाजेपर्यंत साहेबांनीं बसवलं कामाला. सरकारी काम म्हणजे..."

पंडितराव तऱ्हेतऱ्हेनें बोलत होते. त्यांची चर्या अधिकाधिक खिन्न, विपण्ण होत होती. आणि त्यांचे खोल डोळे आपल्या रसरशीत, टमटशीत शरीराच्या व शांत, सात्त्विक वृत्तीच्या पत्नीभोंवतीं भिरभिरत होते.

* * *

# दिवा जळत नाहीं.... १२

जेथें दिवा जळत नाहीं तेथें माऱ्या हालचाली सूर्याच्या चाहुलीवर होतात. तेथें कित्येकदां विस्तवहि पेटत नाहीं; व मग सूर्याची खबर सांगण्याइतकंहि झोपेचं सोंग साधत नाहीं. अंधार पडला तरी आंतड्याचा अजगर फुसकारीत राहतो; व पहाट फुटली तरी काळजांतले कोंबडे ओरडूं लागतात.

गुरवाच्या बखळीजवळच्या बिऱ्हाडांनीं मावळतीपूर्वीच मिळेल ते खाऊन घेतलं. भाकरतुकडा, शिळा भात, बाजारी भजीं. मग कुणी रकट्यावर पडून राहिले. कुणी चिलमींतला धूर नि धुंदी वाढवूं लागले. कुणी बाजारच्या लखलखाटांत वेळ काढूं लागले. रात्रभर आंबलेल्या अंगांनीं आडवं होऊन उजाडण्याआधींच उठले. रहाटाकडे धावले, रोजगाराकडे धावले. गिरणींत जाणाऱ्या सख्यानं तेंच केलं; आणि ओझं वाहणाऱ्या त्याच्या अम्तुरीनं तेंच केलं. तीच तऱ्हा शेण विकणाऱ्या म्हातारीची आणि सर्पण गोळा करणाऱ्या तिच्या थोरल्या मुलाची. तोच प्रकार तेथल्या प्रत्येक......

किर्की मात्र आपल्या खोपटात नेहमींप्रमाणें निजून होती. वस्तींतल्या लहानमोठ्या माणसांसारखं तिला घाईनें उठून कुठं कामावर धावण्याची धास्ती नसे. सावकाशीनं ती उठे आणि उठल्यावरहि आळसावून बसे. पाणवठ्यावर जाई तेव्हां शुकशुकाट असे. पाण्यांत खूप खेळायला मिळे. मग भावड्याबरोबर ती हॉटेलांत चहापाव चापी. मुलींच्याबरोबर ठिकऱ्या खेळे, भातुकली खेळे अगर बखळींतच भटकून दिवस दवडी. भावड्या तिन्ही त्रिकाळ कुठं कुठं भटकत असे व त्यानं दिलेल्या चार आण्यांचं खायला घेऊन किर्की आपली भूक भागवी. कधीं बखळी-जवळच्या हॉटेलांतले पदार्थ तर कधीं शेजारच्या कुसा कुणबिणीकडची भाकर. रात्र

पडण्यापूर्वी व भावड्या परतण्यापूर्वी ती झोपीं जाई. सकाळ झाली तरी भावड्याचं दणकट मनकट धरून पडून राही. आत्तांहि ती अशीच सुस्तावली होती, सुखावली होती. एकुलता एक सोन्याचा फूल तिच्या छातीशीं होता व कितीतरी गोड स्वप्नं तिच्या मिटल्या डोळ्यांत पिंगत होतीं…दिवसभर भटकणारा तिचा भाऊ आतां घराबाहेरसुद्धां पडणार नव्हता. त्यानं खूप पैसे आणले होते. किकीला वहिनी आणली होती. वहिनी स्वतःच्या हातांनीं भाकऱ्या भाजून तिला वाढीत होती. ती पाटावर बसून जेवत होती. खरकटीं भांडीं लाथेनं उडवीत होती. तिचा दमा दूर पळाला होता व केसांतल्या उवा उडून गेल्या होत्या. चिटाचा परकर, गुलाबी चोळी व कागदी वेणी घालून ती वखळभर मिरवीत होती…

खोपटाच्या मोडक्या दारांतून गार वारा आंत आला व फाटक्या परकरांतून अंगाला झोंबूं लागला. किकीला जरा जाग आली. सुंदर स्वप्नांचे भुंगे उडून गेले व पापण्यांची उघडझाप झाली. परकर वर सरकल्यानं तिच्या पोटऱ्या उघड्या पडल्या होत्या व डोकं गोधडींत गुंडाळलं गेलं होतं. लोळत लोळत ती चुलीच्या तीन दगडांशीं आली होती. दगडांचा थंड स्पर्श जाणवतांच ती फुरंगटून पुटपुटली,

“भावड्या, ए भाऊ रे ! - आपण दुसऱ्या चांगल्या घरांत रहायला जायचं ना रे ? मी अगदीं लहान होतें, तेव्हां आपण राहात होतों तसल्या मोठ्या घरांत…”

किकी थांबून ऐकूं लागली. पण उत्तर आलें नाहीं. कुत्रा कुणिकडे कुणीं टसकलं व जरा वेळ शिव्या देत राहिलं. गेल्या दहापंधरा दिवसांत तीनचार वेळां कुत्र्याकडून भाकर घेतली. पण पैसे दिले नाहींत म्हणून कुत्रानें शिव्या मोजल्या होत्या तें तिला आठवलं. अन् मग भावड्याचं तें भयंकर बोलणं आठवलं. काल रात्रीं भावड्या बाहेरून आला नि एकदम किकीला म्हणाला, ‘मी उद्यां गांवाला जानार आहें. लवकर माघारी येनार नाई. तूं कुटं तरी कांहीं तरी मिळवून खा. माझ्या नावानं गांवभर बोंबलत हिंडूं नको—’ त्याचा अवतार व त्याचा निर्धार पाहून तिनं त्याला मिठी मारली होती व रडत हुंदके देत एकटीला सोडून जाऊं नको म्हणून विनवलं होतं. तिची विनवणी तो मानेना व अखेर तिला गप्प करायला त्यानें एक सोन्याचा फूल दिला. तो सोन्याचा सुबक अलंकार पाहतांच किकी सारं विसरली. एकच असला तरी किती छान होता फूल ! कानांचीं भोकं बुजल्यामुळें तिला तो घालतां आला नाहीं पण कानांच्या पाळीशीं बोटांच्या चिमटींत धरून तिनें तो किती

तरी वेळ आनंदांत दडवला होता. चोळींत झूल लपवून ती भावड्याच्या आधारानं पंगत पंगत झोपली होती. भावड्या म्हणाला खरा, पण कुठं जाणार तो–अशी स्वतःची समजूत करीत !...सारं किर्कीला स्मरलं व पुन्हा शांत झोपावं कीं उठून बसावं हें समजेनासं झालं. झूल मात्र सारखा डोळ्यांपुढं येत राहिला. अखेर तिनं चोळीची चिमुकली गांठ चाचपून पाहिली. गांठ सुटलेली व झूल गेलेला ! तिच्या छातींत धडधडलं. गार वारा छातीला अधिकच झोंबला व लटलट कांपत ती उठून बसली. अंधारांत दोन्ही हातांनीं गोधडी चिवडूं लागली. भावड्या गाढ झोपला होता तरी त्याच्या दिशेनं...

परंतु भावड्याही जाग्यावर नव्हता ! किर्कीच्या छातींत गोळा उठला. घाईनं तिनं कवाड उघडलं. पांढऱ्या प्रकाशाचा व गार वाऱ्याचा झोत आंत आला. उस्कटलेल्या अंथरुणांतून विखरूं लागला. गोधड्या, गाडग्गीं, चिंध्या, चूल—सारं भकास, भयंकर दिसत होतं. झूल गेला व भावड्याही गेला ! कुणासाटीं रडावं, कसं रडावं तेंच तिला कळेना. मटकन् ती खालीं बसली. डोळे फाडून दूरवर पाहात राहिली.

किती तरी वेळ किर्की शून्यपणं बसली होती. हळूहळू उन्हं वाढलीं व तिचं अंग तापवूं लागलीं. तिच्या पायांना मुंग्या आल्या व चिपाडांनीं भरलेले डोळे खुपूं लागले. अखेर ती भानावर आली. झूल गेल्याचं विसरली; पण भावड्या पळाल्याची जाणीव तिला उफाळून टाकूं लागली. आपण झोपलों होतों तव्हां झूल काढून घेऊन भावड्या गेला. दूर, दुसऱ्या गांवीं गेला ! आतां तो लवकर येणार नाहीं. दिसणार नाहीं. आतां खायचं काय ? नि एकटं कसं राहायचं ? किर्कीला कांपरं भरलं व ती हमसून हमसून स्फुंदूं लागली. तिला वाटलं, मोठ्यानं टाहो फोडावा; ओरडत जावं नि भावड्याला धरून आणावं. पण तिच्या अंगांत, कंटात बळच नव्हतं. गोधडींत बसून ती हुंदके देऊं लागली. उंबरठ्यावर उभं राहून आवंढे गिळूं लागली. कोपऱ्यांत आडवी होऊन हातपाय झाडीत रडूं लागली. अन् अखेर दमून रडत रडतच झोपली.

"किर्की—ए किर्के—" कुठूनशी जिऊ आली व दारांत ओरडत उभी राहिली. तिच्या कर्कश स्वरानें किर्की जागी झाली. तरारून उठून बसली. आपण कुठं आहोंत, ही सकाळ आहे कीं दुपार—कांहींच कळेना तिला. समोरच्या जिऊकडे

ती विचित्र मुद्रेनं पाहात राहिली. जिऊ तिच्या श्रमिष्ट चेहऱ्याकडे चमकून पाहात म्हणाली,

"काय झालं ग? पुन्हा दमा झाला जनूं. इतका येळ झोपली व्हतीस. बाकी चैन हाय बाई तुजी. थोरला भाऊ कामं करून पैसे आणतो. हाटीलांत खायला घालतो—"

किर्की किंचित् भानावर आली. काल रात्रीं भावड्याबरोबर हॉटेलांत पावमिसळ खाल्ल्याचं तिला आठवलं. पोटांत सपाटून भूक लागल्याचं जाणवलं. अन मग भावड्या नाहींसा झाल्याचं दुःख टोचूं लागलं.

"बघतीस काय किशे? दोन दीस बदली जाते का? वाड्यापुढच्या बामणाचीं भांडीं घासायचींत. जा तेवढी. मला उरसाला जायचंय् ग—"

किर्कीनं लुगडं नेसलेल्या, लग्न झालेल्या, नऊ वर्षाच्या जिऊकडे पाहिलं. एक डोळा गेलेला नवरा मिळाला होता, तरी मोठी मजेंत होती ती. किर्कीला तिचा हेवा वाटला. उरूस पाहिला नव्हता तरी ती कल्पना करूं लागली. मला उरूसाला ने म्हणून म्हणावं का, ह्याचा विचार करीत राहिली.—पण जिऊ तर भांडीं घासायला जा म्हणून विनवीत होती. किर्कीच्या डोळ्यांपुढं उष्ट्याखरकट्या भांड्यांचा ढीग उभा राहिला. परात, कढई, ताटं, वाट्या व चमचे. चमच्यांना लागलेलं तूप नि ताटांत राहिलेल्या पोळ्यांच्या कडा व भाजींतल्या मिरच्या. तिच्या तोंडाला पाणी सुटलं. पण राखेनं भांडीं घासत बसायच्या कल्पनेनं ती कासावीस झाली. मागें एकदां गंमत म्हणून ती जिऊबरोबर गेली होती. पण भांड्यांची रास घासतांना घेरी आली तिला. साधी परातहि उचलतां येईना व पाण्यांत बसून पाय वळूं लागले.

"चोंट् नको नि जाऊं बी नको. राहा बसून येड्यावानी—" फणकारीत जिऊ गेली तेव्हां किर्कीचं मन भानावर आलं. जिऊच्या दूर जाणाऱ्या आकृतीकडे पाहतांना तिला वाटलं, कीं आपल्याला आतां असाच कुठं तरी कामधंदा करावा लागणार! नाहीं तर खायला काय मिळणार? तिनं सभोंवार पाहिलं. रखरखीत शांतता पसरलेली व सारे कामावर गेलेले. रोज सारी वस्ती कामावर गेली कीं किर्की खूप असे. वखळीभर खेळत राही. पण आतां तो शुकशुकाट पाहतांच ती भेदरून गेली. एकूण एक माणूस कामं करतं व पैसा कमावतं, ही गोष्ट तिला सारखी

जाणवूं लागली. तिला वाटलं कीं धावत जाऊन जिऊला गांठावं व तें धुणंभांड्यांचं काम मिळवावं. पण ती तशीच बसून राहिली. पुन्हा तिला भावड्याची आठवण झाली. कुठं नाहींसा झाला तो? बखळींतल्या इतर पुरुषांप्रमाणें तो नीट नोकरी कां नाहीं करीत? कां तिचे आईबाप तिच्या लहानपणींच मरून गेले? अन् कां ती मरून जात नव्हती?—तिला तर आतां साधा हुंदकाहि येत नव्हता. किकीला स्वतःचंच भय वाटलं. संत्र्याच्या सुकलेल्या फोडीसारखे आपले ओठ तिनें चावले व सांडग्यासारखं फताकडं नाक दाबून दाबून पाहिलं. तिची बाळकी, बारकी, अष्ट-वर्षीय आकृति तिलाच अनुकंपनीय वाटूं लागली.

सार्वजनिक संडासाकडून येणारी कुसा शेजारीण दिसतांच किकी दचकून उठली. कुसा तिच्याकडे तिरस्कारानें पाहात निघून गेली. किकी घाबरली. कधींमधीं दोन आणे देऊन कुसाकडून भाकर घेणंहि ह्यापुढें शक्य होणार नाहीं! मग खायचं काय? नि पैसे कुठले आणायचे?—किकी एकदम आंत गेली व चुलीखालीं लपवलेला रुपया तिनें उचलला. कुसा तो पळवील अशा धास्तीनं मुठींत घट्ट धरला. त्या चांदीच्या टिकलीचा तिला आभाळाएवढा आधार वाटूं लागला. तिला ठिकऱ्या आठवल्या, बिस्किटं आठवलीं. पाणवठ्यावर ती गेली व झिंज्या मागं घेत तिनें तोंड धुतलं. जरा तरतरी आली, धीर आला. बखळीबाहेरच्या हॉटेलकडे ती तुरुतुरु गेली. चहाचे घुटके घेतांच बहरून गेली. लाकडी टोपी घालून टेबल पुसणाऱ्या पोऱ्याची शान पाहात राहिली.

थोड्या वेळानें बखळींत दर शनिवारीं भजनं म्हणणारा शिवा हॉटेलांत आला व तिच्याच टेबलाशीं बसला. किकीनें त्याच्या जुन्या बाजारांत घेतलेल्या सोजिराच्या डगल्याकडे, खाकोटीला घेतलेल्या वर्तमानपत्रांच्या घड्यांकडे व शुभ्र लांब दाढीकडे पाहून घेतलं. शिवा तिला आवडत असे. आणि त्यानें तिला चहाचा आणिक एक कप देऊं केल्यानें तर आतां तिच्या गालाला खळ्या पडल्या.

दाढी कुरवाळीत शिवा म्हणाला, "कुठं कामाला असती ग?"

किकी उचकली. आपण एकटीच काम न करतां भटकतों हें तिच्या प्रथमच ध्यानांत आलं. प्रथमच तिला जाणवलं कीं काम केलंच पाहिजे कुठं तरी. चहा-पानाचे चार आणे कापून पोऱ्यानें बारा आणे परत आणले तें पाहून अधिकच जाणवलं. ती म्हणाली, "कुटंच नाहीं. मधीं एका बंगल्यांत मुलं सांभाळायचं काम

मिळत व्हतं. पर माजा खोकला साहेबाच्या पोरास्नी हुईल म्हणून- -शिवादादा, देतोस कुठं काम ?- —भावड्या बी —"

"हां हां—" म्हातारा आठवून म्हणाला, "आज रामपारी ठेसनावर पेपर इकत व्हतों मी, तवां दिसला भावड्या—"

किर्कीचे डोळे चमकले. शिवाचा हात धरून उभी राहात ती म्हणाली, "तूं पाह्यला त्येला ?—कुठं असल आतां ?"

"ममईला—" म्हातारा हसून म्हणाला, "ममईच्या गाडींत उडी मारून चढतांना पाह्यला. लई लांब गेला आतां तो ! अन् तुला एकटीला टाकून—"

शिवाचं बोलणं ऐकतांच किकीला कांपरं भरलं. पाय लटलटले व डोळ्यांत गरगर फिरलं. एकटं राहायचं, उपास काढायचे, कष्ट करायचे— तिला शिवा दिसेना; चहा दिसेना. पुढं झालेल्या शिवाची बाही ती अधिकच घट्ट पकडूं लागली. आणि सारा चहा त्याच्या वर्तमानपत्रांवर सांडीत खालीं कोसळली...



किर्की आपल्या खोपटांत रात्रीची पहुडली होती. चोळीच्या गांठींत अधेली लपवून व मिटल्या डोळ्यांत अधीरता लपवून ! तिला नीट झोप येत नव्हती. सारखे वर्तमानपत्रांचे अंक दिसत. लांबरुंद, नौकर छापून काढलेले कागद. खोपटांतून येणाऱ्या वाऱ्याच्या झोताबरोबर ते कागद फडफडत, तिची झोप उडवून लावीत.

कधीं तरी तिचा डोळा लागला व मध्येंच ती दचकून जागी झाली. किती वाजले, कुणास ठाऊक ! पण पहाट व्हायची वेळ झाली असावी ह्या कल्पनेनं ती दचकून उठली. तापामुळें, झोपेमुळें दोन दिवस फुकट गेले होते. रोज दोन दोन आणे उडाले होते. आज आळस करून भागणार नव्हतं. मडक्यांत मुद्दाम आणून ठेवलेलं पाणी तोंडावर मारून तिनं तरतरी आणली. गर्द अंधारांत व गार वाऱ्यांत ती आली. चाळींतून बोळांतून धडपडत धावत सुटली.

बरंचसं गेल्यावर व एकदोनदां रस्ता चुकल्यावर अखेर ती शिवाच्या घराशीं आली. अधीरतेनं अन् धीर धरीत दार ठोठावूं लागली. किती वेळ कुणी उठेचना ! त्या विचित्र एकांताची तिला जास्तच भीति वाटूं लागली व ती जोरानं दार वाजवूं लागली. अखेर धडपडत शिवा उठला, शिव्या देत दार उघडूं लागला.

"आँ ?—किकी व्हय् ! इतक्या रातचं काय हाय ? पहाटचं ये म्हटलं ना ! जा—

लई टाईम हाय अजून—" म्हातारा म्हणाला व दार बंद करून अदृश्य झाला. किर्कीला ब्रह्मांड आठवलं. घरीं जाऊन झोपावंसं वाटलं. इथेंच घेरी येऊन पडणारसं वाटलं. काय करावं, कळेना! काहीं तरी करायचं, रोजगार करायचा, म्हणून ती आज आली होती. दुसरा इलाजच नव्हता. रुपया चंद्रासारखा लहान लहान होत होता भावड्याचा मागमूस नव्हता. अन सारं जग काम करून पैसा मिळवीत होतं; भूक भागवीत होतं...

ती तेथेंच पायरीवर बसली व परकराच्या घोंटोळ्या काटा फुटलेल्या पोटऱ्यांवरून लपेटीत आजूबाजूला पाहूं लागली. रस्त्यावर अंधुक उजेड होता नि सारं स्तब्ध होतं. समोरच्या दुकानाच्या फळीवर एक भिकारी निजला होता. दूरवर धुळींत एक कुत्रं पसरलं होतं. किर्कीला वाटलं, हें कुत्रं एकदम केकाटूं लागणार व आपल्या पोटरीचा लचका तोडणार. हा भिकारी आपल्याला झोळींत घालून नेणार. तापानें, भुकेनें, आपण अखेर मरणार! मरणाचं तिला भय वाटलं. विचार आवरून तिनें डोळे मिटले व ती डुलक्या घेऊं लागली.

खाकी खमीस व मोठीशी पिशवी घेतलेला शिवा बाहेर आला. अंगाचं मुटकुळं करून पायरीवर झोपलेल्या किर्कीला पाहून चकित झाला. लहानशा तोंडावर केसाच्या झिपऱ्या आलेल्या व हाडं दिसणारे हातपाय पोटाशीं घेतलेले. कुत्र्यानं सताव-लेल्या व पिसं पडलेल्या कोंबडीच्या पिलासारखी दिसत होती ती! शिवाची चाहूल लागतांच ती दचकून उठली. डोळे चोळीत म्हणाली, "चला!"

दोघेंहि न बोलतां चौकांत गेलीं. शिवानं रदबदली केल्यावर चौकांतल्या एजंटानें अधेलीचे दहा अंक किर्कीला दिले. तो गठ्ठा सोन्याच्या फुलासारखा हलक्या हातानें तिनें धरला. आनंद, आश्चर्य, धीर, धास्ती—अनेक भावनांनीं तिचं अंग फुलून गेलं. वर्तमानपत्रांचं वांटप चालू होतं. पोरं, म्हातारे, तरणे, गठ्ठे घेत धावत सुटले होते. ओरडत, साद देत होते. तीच एकटी मुलगी होती. किर्की बावरली, बहरली...

"किर्के—जातों मी आतां." शिवा पेपरांचा गठ्ठा पिशवींत खुपशीत म्हणाला. "मी आतां गांवभर भटकणार. तूं हवी तर एका जागीं उभी राहा. म्हणजे दमणार नाहींस—त्या पुलापाशीं जा! टेसनाकडे, फ्याक्टरीकडे जानारं लई मानूस भेटल, पळ..."

किर्की पळत सुटली व पुलाशीं पोंचली. चढणावरच्या वळणावर उभी राहिली

मग काय करावं, कळेना तिला. आजवर ती ओवळीबाहेर कधीं गेली नव्हती ! आतां अनोळखी रस्त्यावर उभं राहून परक्या लोकांना अडवणं भाग होतं. कांपत, लाजत ती ओरडली, "सकाळ, समाचार...एक आना !"

तिचा आवाज तिच्याच कानांत घुमला. तिला वाटलं, तो पुलाखालच्या पाण्या-पर्यंत पोंचला. सायकलवाले, टांगेवाले, सारे जणूं तिच्याकडे पाहूं लागले. ती लाजली. दहा बोटांत धरलेले दाही अंक कुरवाळूं लागली. शेंबूड सांवरत, परकर सांवरत कडेला खडी राहिली.

तिच्या एकदम ध्यानांत आलं कीं पहाट पूर्ण फटफटली आहे. रहदारी वाढली आहे. अन् अंक तर एकहि खपला नाहीं. ती भांबावली. आठ आणे गेले अन् केवळ कागदाचे कपटे हातीं उरले. हे खपले नाहींत तर खायचं काय? का हे कपटेच चावायचे?—समोरून येणाऱ्या साहेबाकडे अंक करीत ती ओरडली, "सकाळ घ्या !"

तो साहेब जवळ आला. अंक उलगडून त्यानं मजकुरावरून घाईनं नजर फिरवली, मग घडी घालून शांतपणें परत केला. किकी प्रथम खूष झाली, मग गोंधळांत पडली, अन् अखेर तिचं तोंड कडू झालं. पेपर वाचून पैसे न देतां निघून गेला तो! हॉटेलांत एक आण्याच्या चहांत पेपर वाचणारे लोक तिला आतां आठवले. फुकट वाचायला मिळत असतांना आपल्याजवळचे अंक कोण घेणार, कळेना तिला ! वेळ चालला होता, माणसं चाललीं होतीं व विचार करीत किकी नुसती उभी होती. कुठून ह्या भानगडींत पडलों असं तिला झालं. पण तिनं स्वतःला सांवरलं. घसा साफ करीत साद दिली. कुणींच तिच्याकडे पाहिलं नाहीं. ती फुटपाथवर हालली, हिंडली. पण जो तो आपापल्याच तंद्रींत जात होता.

तेवढ्यांत एक सूटबूटवाला अंक घेण्यासाठीं थांबला. किकी पुढें होणार, तेवढ्यांत एक पेपरविक्या पोरगा कुठूनसा टपकला. चपळाईनं त्या इसमाच्या हातीं अंक देऊन व एक आणा घेऊन तो पसार झाला. किकी हिरमुसली व माघारीं परतली. तिला त्या आगाऊ पोराचा भारी राग आला. अन् मग स्वतःच्या बावळटपणाची खंत वाटली. पुलावर दहा अंक वांटायचे व दहा आणे मिळवायचे, दोन आण्याचं खाऊन पुन्हा उद्यां आठ आण्यांचे अंक घ्यायचे, भावड्या येईपर्यंत असं करीत राहायचं, असे तिचे बेत होते. पण इथेंहि कमी कटकट नव्हती. पहाटे पळत यायचं

नि इथें आल्यावर ताटकळत उभं राहायचं. किकीला वाटलं, ह्यापेक्षां भांडीं घासणं, मुलं सांभाळणं परवडलं.

एक सायकलवाला 'सकाळ-समाचार' ओरडत आला आणि ती अधिकच उन्मळून गेली. त्या पायजमावाल्या पोरापेक्षां हा सायकलवाला अधिक अंक खपवीत असेल ह्या कल्पनेनं तिला भय वाटलं. तिच्याजवळ सायकल नव्हती, चपळाईहि नव्हती. तो सायकलवाला थेट तिच्याच पुढ्यांत आला. "ए पोरी, पेपर देतेस का? मजजवळचे सगळे चार डझन अंक खपले. दे. दहाच आहेत ना? हं, हे घे दहा आणे—"

किकी थक्क होऊन पाहातच राहिली. मग घाईनं तिनं पैसे घेतले व सगळे अंक देऊन टाकले. अंकांचं ओझं गेल्यानं तिला हलकं वाटलं व मुठींत नाणीं खुळखुळूं लागल्यानं ती खूप झाली. फूटपाथच्या फरशीवर आणेल्या टाकून ठिकरीचा खेळ खेळावंसं वाटलं. पण चहाच्या ओढीनं तिनं बखळीकडे धाव घेतली. एक आण्याचा आत्तां चहा व आण्याचीं दुपारून भजीं! तिला तो सायकलवाला भावड्यासारखा वाटूं लागला. तिला भावड्याची आठवण आली. आज तो असता तर तिनं म्हटलं असतं, 'भावड्या, मीं आज पैसे कमावले! आठाचे दहा आणे केले. पहाटेची पुलावर एकटी उभी राहून ओरडलें, सकाळ एक आना—'

दिवसभर किकी वेगळ्याच मनःस्थितींत होती. थोडीशी आनंदी, थोडीशी गंभीर. बखळींतल्या इतर लोकांसारखे ती कष्ट करूं लागली होती. तिला कुणी आतां रोगी, रडकी म्हणणार नव्हतं. ती एकटी राहात होती व पैसे कमवीत होती. अन् जिऊसारखीं भांडीं घासून अगर रखमासारखं शेण्या वेचून नाहीं तर कागदावर छापलेला महत्त्वाचा मजकूर विकून! मोठ्या लोकांशीं तास दोन तास व्यवहार करून! सारी रात्र किकीला वर्तमानपत्रं दिसत राहिलीं. एका मोठ्या पेपरवर पेपर पांघरूनच ती पसरली होती. आणि पहाटे ती जागी झाली तें 'सकाळ-समाचार' ओरडतच उठली. उन्हं वाढेपर्यंत पांघरुणांत पडून राहायचं व रात्र पडेपर्यंत बखळींत हुंदडत रहायचं हें तिचं आयुष्य आटोपलं. आतां पहाटे उठून...

पहाटेच्या गार वाऱ्यांत किकीची झोप उडून जात होती. थंडीनं तिचे हातपाय कांकडत होते व नाक कान लाल पडले होते. पण कामावर जायची वेळ जसजशी जवळ येत चालली, तसतशी तिची अधीरता लोपूं लागली व ती अस्वस्थ होऊं

लागली. त्या छापलेल्या कागदांचं, फुकट्या वाचकांचं व तरबेज पेपरविक्यांचं तिला भय वाटूं लागलं. आपले अंक खपले नाहींत तर? अन् त्या सायकलवाल्यानं अंक घेतले नाहींत तर? हा विचार तिला भेडसावूं लागला. गोधडी गुरफटून ती उठून बसली. जरा दिसूं लागल्यावर उंबऱ्याशीं येऊन बसली. चोळीच्या गांठींतली अधेली छातीला टोचत होती व डोळ्यांपुढें दहा आणे दिसत होते. पण मनांतल्या शंका, धास्ती उठूं देत नव्हती. हळूहळू शेजारणीच्या घरांतलीं भांडीं वाजूं लागलीं. पाणवठ्यावर लोक पळत सुटले. खाकरे खोकरे सुरू झाले. डबे बांधून, पटके बांधून लोक कामावर जायची तयारी करूं लागले, तेव्हां किकी दचकली. अंमळशानं सारं शांत होईल, बखळीभर शुकशुकाट होईल. आपणच एकटी...ती तरातरा निघाली. एजंटानं दोन चार शिव्या हासडून तिला वर्तमानपत्रं दिलीं. तीं छातीशीं धरीत किकी पुलाशीं आली. उशीर झाला होता. सकाळ झाली होती. सायकलवाला कुठं दिसतो का हें पाहात ती साद देऊं लागली.

सायकलवाला तिच्या अंगावरून गेला. त्याच्याकडे तिनं आतुरतेनं पाहिलं. तो मान हलवीत पुढें गेला नि किकीचं अवसान ओघळलं. हातांतल्या छाप्यांकडे ती भकासपणें पाहूं लागली. आतां तिचे अंक कोण घेणार? आज ती काय खाणार? तिला ओरडायचं, उभं राहायचंहि बळ राहिलं नाहीं. पुतळ्यासारखी ती केवढा वेळची उभी होती.

"आजचा पेपर काय ग--" एक म्हातारा गृहस्थ तिच्याजवळ येऊन म्हणाला, "दे पाहूं. हा घे एक आणा--" किकी शुद्धीवर आली. अंक खपला व एक आणा मिळाला ह्यावर तिचा बराच वेळ विश्वास बसेना. तो म्हातारा तिच्याजवळच पुलाच्या कठ्ड्यावर बसला. "काय आहे या आठवड्याचं भविष्य, बघूं!--" असं मोठ्यानं म्हणत मजकुरावरून नजर फिरवूं लागला. किकी त्याच्याकडे बघत वेड्यासारखी उभी राहिली. म्हातारा एकदम म्हणाला, "अरे बापरे! उद्यां नि परवां तब्येत बिघडणार. पैसाहि हातचा जाणार! हां, पण शनिवारीं द्रव्यलाभ आहे! मुलीबाळींना नि म्हाताऱ्यांना हा आठवडा काळजीचा..."

म्हातारा मोठ्यानं बडबडत होता व किकी आ वासून उभी होती. उद्यां परवां तब्येत बिघडणार? पैसा जाणार? अन् हें सारं त्या कागदांत लिहिलेलं असतं? तिला विलक्षण आश्चर्य वाटलं. वर्तमानपत्रांतल्या मजकुराबद्दल तिला कांहींच कल्पना

नव्हती. अन् उद्यांचे अंदाज त्यांत असतात ह्या ज्ञानानं ती गडबडून गेली. हें कसं कळतं सारं?—प्रत्येक कागदांत हेंच असतं?—अन् प्रत्येक माणसाबद्दल असतं कीं फक्त मोठ्या माणसांबद्दल असतं? कीं खास श्रीमंत लोकांसाठींच? तिच्या छोट्याशा डोक्यांत अनेक प्रश्न गुंता करूं लागले. तेवढ्यांत दहाबीस मिनिटांत तिचे आणिक दोनचार अंक खपले. टांग्यांतल्या माणसानें, कापड विकणाऱ्या हातगाडीवाल्यानें सहज थांबून 'सकाळ' खरेदी केले. किकीची काळजी कमी झाली. पण नव्या कुतूहलानें तिला वेढून टाकलं होतं. तो म्हातारा निघून गेला नसता तर तिनें त्याला विचारलेंच असतं...तिचं कांहीं कळेल का? भावड्या कधीं परत येईल? तिला नवा परकर पोल्का मिळेल का? तिच्या डोक्यांतल्या उवा कधीं मरतील? नि... अनेक प्रश्नांचे पेपर तिच्या झिंज्यांसारखे डोक्यावर फडफडूं लागले.

उरलेले अंक घेऊन किकी उन्हांत उभी होती. ती त्या छापलेल्या ओळींवरून आश्चर्यानें नजर फिरवी, रस्त्यावरून जाणाऱ्या माणसांकडे पाही. आणि मग मोठा बांक काढून बसलेल्या भव्य पुलाकडे दृष्टि वळवी. आपण जादूचे कागद विकतों आहोंत, असा तिला अभिमान वाटूं लागला. आणि भविष्य वाचणारे लोक व पुलापलीकडचं अनोळखी जग ह्याबद्दल भीतीची नवी भावना तिच्या मनांत भरूं लागली. अंक खपेनात तेव्हां ती पुलावरच्या हॉटेलांत गेली व गिन्नीचा चहा प्यायली. बखळीजवळच्या 'मामा'च्या हॉटेलाशिवाय ती आजवर कुठं गेली नव्हती. ह्या हॉटेलांतले मोठाले चेहरे दाखवणारे आरसे, मोठ्या बायांचीं सुंदर चित्रं, क्षणांत गाणारं रेडियोचं यंत्र आणि टेबला टेबलावर बसलेले अनेक प्रकारचे लोक पाहून तिला अधिकच विचित्र वाटूं लागलं. जवळच्या टेबलाशीं वर्तमानपत्रं वाचणाऱ्या तरुणांच्या टोळक्याकडे ती टक लावून पाहात बसली. तिच्या भावड्याच्या वयाचे कांहींजण होते. पण कपडे नीट घातलेले, केस नीट वळलेले होते. अन् सारे जण हातांतले पेपर चाळवीत तावातावानें बडबडत होते. किकीला भावड्याची लाज वाटली. स्वतःची लाज वाटली. सशासारख्या भेदरलेल्या मुद्रेनें ती त्यांचं बोलणं ऐकण्याचा यत्न करूं लागली. तिला धड समजेना, धड ध्यानांत येईना...एक बॉम्ब टाकून लहान मुलांची शाळाच उडाली व सारीं मुलं मेलीं...लवकर लढाई होणार... दहा रुपयांचा तांदूळ दीडशें रुपायांना विकला...अन् आकलन न होणारे असंख्य शब्द, बातम्या! किकीचं डोकं दुखूं लागलं. तिच्या नीट लक्षांत येईना व जें अर्धवट उमगलं त्यानं ती थरथरली. मध्येंच तिच्या जवळचा पेपर त्या पोरांनीं

खरेदी केला. तिला स्वतःचा अभिमान वाटला! पण पुन्हा त्यांचं ओरडणं ऐकून ती भयभीत झाली. सगळे विचित्र, विलायती भाषेत भांडत होते. कांहीं तरी विचित्र, विलक्षण विकत होती ती!—

किकी कशीबशी उटली व पुलावर आली. सिगरेटच्या चांदीसारखा पूल उन्हानें चकाकत होता. माणसांची वाहनांची वर्दळ विरळ झाली होती!—किकीला उभं राहून ओरडावं कसं तेंच कळेना! जवळून जाणाऱ्या एका इसमाला उद्देशून ती म्हणाली, "घ्या—सकाळ घ्या! ताजी बातमी, एक आणा—"

भरल्या पोटावर खाल्लेलं पान थुंकत तो इसम हसला, "ए पोरी, आतां दुपार झाली कीं. सकाळ कुठली? तुझी ताजी बातमी शिळी झाली—"

किकी चकित झाली. खरंच, सकाळ सरली होती. आतां 'सकाळ' वाचणं वेडेपणाचं होतं. उद्यां नवा पेपर, नवी बातमी!—मग ह्या कागदांचं काय करायचं? होड्या करून पुलावरच्या पाण्यावर टाकायच्या? कीं पतंग करून आकाशांत उडवायचे?—त्या कागदांकडे ती करुण मुद्रेनें पाहात राहिली! चार अंक उजव्या हातांत अन् चार आणे डाव्या हातांत. जड पावलं टाकीत ती बखळींत परतली. चार आण्यांचं खावं कीं नाहीं ह्याचा निर्णय घेतां येईना. ते चार आणे सरले कीं सारंच संपलं. मग उद्यां अन्नहि नाहीं व अंकहि नाहींत. आणि त्या चार राक्षसी छाप्यांचं काय करावं तेंहि कळेना तिला. चुलीच्या दगडांवर, गोधडीच्या गुंडाळीवर, कुठेंहि ठेवले तरी तिला विचित्र वाटे. सारी संध्याकाळ ते पैसे जपत व ते अंक पाहात तिनें जागून काढली.

उपाशी पोटानें व उमाळलेल्या मनानें तिला तशीच झोप लागली. तीं नाणीं तिच्या छातीशीं आलीं व ते पेपर तिचा मेंदू पोखरूं लागले. अनेक विचित्र वेड्यावांकड्या गोष्टींचीं तिला स्वप्नं पडलीं. पहाटे ती जागी झाली ती तशा व्याकुळ अवस्थेंतच...

आज मात्र वर्तमानपत्र विकायला जायचं नाहीं असा बेत तिनें केला. कालच्या आठ आण्यांचे आज चार झाले होते. आज तेहि नाहींसे होतील. आणि पेपराची रद्दी मात्र घरांत सांठेल. त्या कागदांकडे ती केविलवाण्या मुद्रेनें पाहात होती. पैसा मिळणार नाहीं, मुलींना वाईट दिवस, वगैरे त्यांत लिहिलेलं खरं तर! तिला भय वाटलं. त्या छाप्याचं, ते छापणाऱ्यांचं, त्या पुलाचं व त्या पुलावरून दूर जाणाऱ्यांचं!

उंबरठ्याशीं उकिडवी असून ती बखळींतून कामावर धावणाऱ्या लोकांकडे बघत होती. रानांत, गिरणींत, उष्ट्या भांड्यांच्या ढिगांत, कचरा डेपोपाशीं—सारेजण सुखांत काम करीत होते. किकीच तेवढी वर्तमानपत्रांच्या वणव्यांत सांपडली होती. हळुहळू सारं शांत झालं. सर्वत्र शुकशुकाट झाला. त्या वाढत्या स्तब्धतेनें, वाढत्या दिवसानें ती व्याकुळ झाली. दूरवरच्या गिरणीच्या बंबांतून धूर आला. नेहमीं त्या धुरांत तिला उलगडलेलीं लुगडीं, मेंढरांचे कळप दिसत. आतां तिला त्यांत वेडं-वाकडं नाचणारीं काळींकभिन्न भुतं दिसत राहिलीं !

असल्या बसल्या पेंगत व कांहीं कांहीं विचार करीत तिनें दुपार उलटवली. मग मात्र सारं असह्य झालं. अंग आंबून गेलं होतं, पोटांत आग उठली होती व डोकं दुखूं लागलं होतं. ती उठली व बखळीबाहेर आली. परकर फारच फाटला होता व चोळी मळकटली होती. गालाचीं हाडं, कोपराचीं हाडं उठून दिसत होतीं. डोळे खोल गेले होते. चारी आणे खर्चून भरपूर खावं अशा इच्छेनें ती बखळीबाहेर आली होती. पण बाहेरचं तें वातावरण, तीं मोटालीं घरं, भिंतींवरच्या जाहिराती नि जाणारीं येणारीं माणसं पाहून ती परत थबकली. थरथरली.

"किकी, काय करतेस इथें ?" शिवा कुठूनसा आला. त्याला पाहतांच व त्याचं घाईचं बोलणं ऐकतांच ती दचकली. वर्तमानपत्रांचा मोठा गठ्ठा त्याच्या हातांत होता त्याकडे ती भकास नजरेनें पाहूं लागली.

"ए येडे—दिल्लीला दंगा सुरू झालाय्—आत्तां जादा अंक निघालाय. जा एजंटाकडे नि घे पेपर. भरभर अंक उडतोय—"

शिवाचं बोलणं ऐकून किकीचा चेहरा अधिकच उतरला. ती अगदींच खिळून गेली. शिवालाहि विचित्र वाटलं. पांचसहा अंक पुढें करून तो एकदम म्हणाला, "घे हे; दे चार आणे. आटप !"

किकीनें नकळत चोळीची गांठ सोडून पावली दिली. जादा अंक हातीं घेतांना जळतीं लाकडं हातीं घेतल्यासारखं वाटलं तिला ! लहानपणीं एकदां फुटलेल्या बाहुलीचे तुकडे हातांत उचलून तिनें दूर टाकले होते. त्याची तिला आठवण आली. अन् मग परवां रस्त्यावर लहान मुलाचं फडक्यांत गुंडाळून नेलं जाणारं प्रेत पाहिलं त्याची ! ती कशीबशी पुलाकडे गेली. शिवा म्हणाला होता, अंक भरकन खपेल म्हणून ! कांहीं झालं तरी आतां अंक खपवणं भाग होतं. तिचे सारे पैसे सरले होते. आणि आज चहासुद्धां घेतला नव्हता तिनें !

नाइलाजानें, निरिच्छेनें ती पुलावर उभी राहिली. उन्हं तापलीं होतीं. पोटांत पेटत होतं. फूटपाथवर दंग्याच्या बातम्या ओरडणारीं खारीसारखीं चपळ पोरं पाहतांच ती त्रासून गेली. तिला त्या पोरांचं, पुलाचं भय वाटूं लागलं. स्वतःची विलक्षण करुणा आली. अत्यंत करुण स्वरानें तिनें साद दिली, 'जादा अंक घ्या कुणी—'

जवळून जाणाऱ्या दोन बाया थबकल्या. एकजण पर्समधून पैसे काढूं लागली. दुसरी म्हणाली, "कशाला घेतां पेपर? घरीं आणला होता तोच आहे हा. अन् रेडियोवर येईल बातमी—" त्यावर पहिली म्हणाली, "हो, पण या मुलीसाठीं घेतें. किती लहान आहे, बिचारी!' आणा देऊन तिनें अंक घेतला. दोघीहि तिच्याकडे पाहात पाहात पुलापलीकडे गेल्या.

त्या स्त्रिया नाहींशा झाल्यावर किकी भानावर आली. अंक खपत होता तेव्हां तिच्या डोळ्यांपुढें चहाचा कप दिसत होता. त्या आण्याचा आधीं गरम गरम चहा घ्यायचा!—पण त्या बायांचं बोलणं, पाहणं पाहून ती भांबावली. तिला कांहीं वेगळंच वाटूं लागलं. जरूर नसतांना त्यांनीं अंक घेतला! आपल्याकडे करुणा येऊन पाहात गेल्या! भुकेल्या, रडवेल्या आकृतीसाठीं एक आणा दिला. 'बिचारी—!'

किकीचं तोंड कडू झालं व चेहरा अधिकच रडका झाला. दूर दिल्लीला दंगा चालला होता, भोवतालीं बातम्या ओरडणारीं पोरं धुडगूस घालीत होतीं. अन् किकी रडक्या चेहऱ्यानं खडी होती.

अचानक एक अभिनव कल्पना तिच्या करुण, कोवळ्या मनाला चाटून गेली. तिचे डोळे चमकले; पण चेहरा अधिकच रडका झाला. टांग्यांतून दोन गलेलठ्ठ माणसं जात होतीं, त्यांच्यामागें ती धावली. "घ्या शेटजी. वाचला असला तरी घ्या—एकच आणा. शेटजी-घ्याना—"

शेटजीनें डगल्यांतून नाणं काढीपर्यंत ती पळत राहिली. आणा मिळाला, अंक उडाला. मग हृदयांतला हर्ष दाबून तिनें नीट रडकी मुद्रा धारण केली. सायकलवाल्या साहेबाला अडवलं, घाईनें जाणाऱ्या बामणाचा पाटलाग केला. दोन मिनिटांत दोन्ही अंक उडाले. मग चार आण्यांचे आणिक अंक चौकांतून आणले. काकुळतीच्या, विनवणीच्या स्वरांत तिनें कुणाकुणाच्या गळ्यांत अंक घातले. चकाकणाऱ्या आणेल्या मिळवल्या.

हळुहळू ती हॉटेलांत आली व चहाचे घुटके घेऊं लागली. तिचा थकवा

नाहींसा झाला व सुकलेल्या चेहऱ्यावर टवटवी पसरली. जवळच्या मोठ्या आरशांत तिनें अभिमानानें पाहिलं. छे!—असा हसरा चेहेरा करून चालणार नाहीं! ह्या भयंकर जगांत जगायचं असलं तर रडकंच राहिलं पाहिजे. तिनें रडका चेहरा करून आरशांत पाहिलं. त्या दोन बाया, टांग्यांतला शेटजी, धोतरवाला गृहस्थ, सारेजण पैसे देतांना दिसले तिला! ती तृप्त झाली. तिला कांहीं तरी समजलं होतं, सांपडलं होतं. पाहतां पाहतां आरशांत तिला पूल दिसूं लागला. अनेक माणसं त्यावरून येत जात होतीं. आणि किकी खपाट पोटानें, फाटका परकर नेसून नि रडकी मुद्रा करून प्रत्येकाला अडवीत होती. आणेल्या वसूल करीत होती...



जेथें दिवा जळत नाहीं तेथें साऱ्या हालचाली सूर्याच्या चाहुलीवर होतात. तेथें कित्येकदां विस्तवहि पेटत नाहीं; व मग सूर्याची सबब सांगण्याइतकंहि झोपेचं सोंग साधत नाहीं. अंधार पडला तरी आंतड्याचा अजगर फुसकारीत राहतो; व पहाट फुटली तरी काळजांतले कोंबडे ओरडूं लागतात.

गुरवाच्या बखळीजवळचीं बिऱ्हाडं पहाट होतांच रोजगारावर जाण्यासाठीं धांदल करायला सुरुवात करीत. संडासावर, पाणवठ्यावर, चुलीशीं व फाटकाशीं तोबा करीत. किकी सर्वांच्या आधीं उठे व चौकाकडे पळत सुटे. एजंटाकडून डझन दीड डझन वर्तमानपत्रं घेऊन पुलावर जाई. सायकलवरून ओरडणारे अगर फुटपाथवर धुडगूस घालणारे पेपरवाले तिच्या हिशेबींहि नसत. तिजजवळ सायकल नव्हती. चपळाई पण नव्हती. पण त्याहून महत्त्वाची मोलाची गोष्ट होती...पहाटे पुलावर येणाऱ्या प्रत्येक इसमाला गुडघ्यापर्यंत चिंध्या झालेला विटका परकर व बरगड्यांवर बसणारी चिमुकली चोळी ल्यालेली आठनऊ वर्षांची पोर दृष्टीस पडे! नाजुक हनुवटी, बसकं नाक, बारके डोळे. अत्यंत कारुण्यानं तो रडका चेहरा विनवणी करी; पाठलाग करी. 'साहेब–सकाळ घ्या. घ्या ना—' छोटासा हात ताज्या अंकाची घडी पुढें करी. आणि मग घाईत वा नादांत जाणारा माणूस थबके. खिशांतलीं नाणीं चाचपूं लागे. दयार्द्र दृष्टीनें त्या मुलीकडे पाहूं लागे...किकीला दुकानाच्या कांचेआड असलेल्या चिनी बाहुलीच्या विचित्र चेहऱ्यापेक्षां स्वतःच्या रडव्या मुद्रेचं अधिक कौतुक वाटे. पैसे मिळाले तरी परकर घ्यायचा नाहीं, फूल तर मुळींच

घ्यायचा नाहीं, असं तिनें ठरवलं होतं. फाटका परकर पुढें करीत व रडवी मुद्रा ओवाळीत उभं राहणं यांतच तिला सारा आसरा सांपडला होता......

आठदहा दिवस तिनें हा उद्योग केला. पण आज मात्र तिचा नाइलाज झाला. पैसे मिळवायचा मार्ग सांपडूनसुद्धां तिला आज उंबरठ्याआड उपाशी बसणं भाग पडलं. पहाट फटफटली होती अन् किकी काळवंडलेल्या मुद्रेनें खोपटांत बसून राहिली होती. तिकडे पुलावरचीं माणसं खिशांत नाणीं तशींच ठेवून पुढें जात होतीं. किकीच्या डोक्यावर हात ठेवून चौकशी करणारा तो म्हातारा, त्रासून अंक घेणारा तो सूटबूटवाला, स्टेशनाकडे जाणारे ते प्रवासी, 'बिचारी, हुशार, एवढीशी' इत्यादि म्हणणाऱ्या बाया...काल त्या बाईनं पावली दिली व परत मोड न मागतां तीन आणे बक्षीस दिले!—पण त्यानेंच सारा घोटाळा झाला. 'खा कांहीं तरी—कशी दुष्काळांतून आल्यासारखी दिसते आहेस—' ती बया म्हणाली होती. किकीलाहि मग भूक अनावर होऊं लागली. कुसाकडची भाकर दोन आणे देऊन घ्यावी तर तीच गांवाकडे गेली होती. रोज 'मामा'च्या हॉटेलांतली मस्कामिसळ खाऊन किकी विटली होती. भात खाण्यासाटीं, तूपसाखर चाखण्यासाटीं ती वेडी होऊं लागली. सारखं तोंडाला पाणी सुटे व पोटांतली पोकळी वाढे. अखेर काल रात्रीं पुलापासच्या खानावळींत ती गेली. जवळचा सगळा सव्वा रुपया देऊन तिनं ताट मागवलं. दोन मुदा भात, चार पोळ्या व चार भाज्या. भरपूर जेवून छानशी ढेकर देत ती झोपली. असं अन्न तिनं कित्येक दिवसांत खाल्लं नव्हतं. अशी झोप कित्येक रात्री आली नाहीं. एकदांहि तिला डांस चावला नाहीं; आणि एकहि स्वप्न तिला पडलं नाहीं.

पण पहाटे जागं होतांच किकीला सारा मूर्खपणा उमगला! सगळं भांडवल तिनें उडवलं होतं! आतां एजंटाकडून अंक कसे घ्यायचे? उधार त्याचा बापहि देणार नाहीं. अन् अंक विकले नाहींत तर खायचं काय? तिला कालच्या अन्नाची चव सतावत होती; अन् आज सिंगल चहा घ्यायला पैसा नव्हता! उंबरठ्याआड किकी अडून पडली. विचार करीत, डोकं खाजवीत बसून राहिली.

सारी वस्ती कामावर गेली. सकाळ संपत आली. पण किकीला कांहीं मार्ग सांपडेना. तिला तीं वर्तमानपत्रं नि त्या वर्तमानपत्रांतल्या गोष्टी सारख्या छळीत होत्या. तिचं काय भविष्य असेल?— अशीच मरणार ती? कुठें दंगा होईल का नि

जादा अंक निघेल का? वर्तमानपत्रं विकत घ्यायला कुठून पैसे आणावेत? कांहीं कळत नव्हतं, कांहीं सुचत नव्हतं. दिवस वर येत चालला तसतसं तिच्या डोळ्यांतून पाणी पडूं लागलं. खालीं सांडलेल्या आसवांत तिला आपलीच आकृति दिसल्या-सारखं वाटलं. भुकेली, रडवेली! तिला वाटलं, आत्तां आपल्याजवळ शंभर अंक असते तरी आपण आसवाच्या एकेका थेंबाबरोबर अंक संपवले असते!—तिला त्या भयंकर जगाची ओळख पटली होती. तेथें जगायचं तर काय करायचं हें कळलं होतं. छोटं वय व रडकी मुद्रा तिजजवळ होती. पण...

किकीला अचानक एक कल्पना सुचली व ती तरारून उभी राहिली! गालांवर ओघळणारं पाणी पुसायलाहि तिनें हात उचलला नाहीं. खोपटाचं दार लावायचंहि भान राहिलं नाहीं तिला! आतुरतेनं, आवेगानें ती बखळीबाहेर आली. भ्रमिष्टासारखी पुलाकडे गेली. पुलावर कोणीच पेपरविके नव्हते. पण पेपराची आतां तिला जरूरी नव्हती. पूल ओलांडून ती पलीकडे जाऊं लागली. प्रथमच ती त्या दिशेनें जात होती. पुलाखालीं असलेल्या स्मशानांत चिता शिजत होत्या. पुलावर उभारलेल्या चित्रपटांच्या जाहिरातींत तलवारींची लढाई दाखवली होती. पुलापलीकडच्या कोर्टाकडे कांहीं कैद्यांना मुसक्या बांधून नेलं जात होतं. किकी दबली होती, भेदरली होती. भरल्या डोळ्यांनीं साऱ्या दृश्याकडे बघत होती. दाट जंगलांत जाणाऱ्या कोवळ्या कोंकरासारखी ती दिसत होती. पूल ओलांडतांच सर्वत्र बकाली वातावरण दिसूं लागलं. जुन्या वस्तूंचा बाजार, मोटारस्टँड, सिनेमागृहं व उपाहारगृहें...

किकी एका इराण्याच्या हॉटेलशीं उभी राहिली. चहाची वाफ तिच्या डोळ्यांवर येऊं लागली. हॉटेलांतले हॅटबूटवाले पाहून ती व्याकुळ झाली. एक गिऱ्हाईक बाहेर आलं त्याच्याजवळ जाऊन ती विलक्षण वांकडा, रडका चेहरा करून म्हणाली, "साहेब, एक पैसा द्या—साहेब—"

तो इसम काड्याची पेटी शोधायला खिसे चाचपीत होता. खिशांत लागलेला पैसा त्यानें किकीकडे भिरकावला. हातांत अंकाची घडी नसतांना, ताजी बातमी नसतांना, किकीनें पैसा कमावला! तांब्याचे आणिक असे तीन तुकडे मिळाले कीं चहाचा कप पोटांत जाऊं शकेल. जेवण घेतां येईल. आज, रोज...

हॉटेलांतून येणाऱ्या दोन तीन इसमांनीं किकीची मुद्रा पाहून कळवळ्यानें कांहीं पैसे दिले. मग ती फुटपाथशीं थांबलेल्या टांग्याकडे गेली. टांग्यांतून उतरणारा

इसम मोड मोजीत होता, तेथें अजीजी करूं लागली. त्यानें हाकललं तेव्हां जवळच्या फळवाल्यापाशीं खडी राहिली. केळीं नि आंबे घेणारे गलेलठ्ठ गृहस्थ तिच्या रडक्या चेहऱ्यामुळें पैसे देत. पैसे घेण्यापुढें ती चहा घ्यायचंहि लांबणीवर टाकूं लागली.

मूठभर नाणीं मिळविल्यावर किकी भानावर आली. अगदीं दमली होती ती ! आतां तिला ताट मागवतां येणार होतं. रस्त्यावरच उभं राहून सव्वा रुपया जमला का हें ती पाहूं लागली. एक आणा, दोन आणे, अडीच आणे, साडेचार...

—अकस्मात् तिच्या हातांवर थप्पड बसली. डोळे मिटून ती मागें सरली. हातां-तले पैसे गेले. तिनें डोळे उघडून पाहिलं. गोंड्याची टोपी घातलेला कुणी आडदांड मुसलमान वेगानें गेला. किकीच्या पैशांवर घारीसारखी झडप घालून पसार झाला !

किकीच्या तोंडून शब्द फुटेना. ओरडण्याचं, धावण्याचं अवसानच येईना. बऱ्याच वेळानें ती भानावर आली. पण काय करावं, कळेना. भीति, दुःख, राग— अनेक संमिश्र भावनांनीं तिची दमेकरी छाती भरून गेली. त्या मवाल्याला शिव्या देत ती खोलीकडे कशीबशी परतली...

किकी खोपटाशीं आली. दार उघडंच होतं अन् आंत भावड्या बसलेला होता ! —ती भयंकर दचकली. तिचा विश्वासच बसेना. डोळे फाडून ती भावड्याकडे पाहूं लागली. तिचा कशावरच विश्वास बसेना. भावड्याशिवाय आपण दिवस काढले; अन् आज भीक मागितली ! भीक ! किकीला कसंसंच वाटलं. खोलीबाहेर बसणारा महारोगी तिला आठवला. हॉटेलपुढें नेमानें येणारी आंधळ्यांची माळ आठवली. पुलावर लंगड्या भिकाऱ्याची गाडी ओढणारी तिच्याच वयाची मुलगी आठवली.

"भावड्या—" ती भेदरून ओरडली व मटकन् खालीं बसली. तिला हुंदके येऊं लागले व आपल्या वर्तनाचं एकीकडे आश्चर्य वाटूं लागलें. दमलेला भावड्या उठला व तिच्याजवळ गेला. तिचं डोकं उचलून विचारूं लागला, "काय ग, रडायला काय झालं?—कुणीं मारलंबिरलं का ?—बोल ना–ए—"

भावड्या जसजशी तिची समजूत घालूं लागला ततसं तिला अधिकच भडभडून आलं. भावाच्या प्रेमळ स्पर्शानें गेले कांहीं दिवस तिच्या भोवतीं भिरभिरणारं भयंकर जग फुग्यासारखं फुटून गेलं. तिचा मेंदू मोकळा झाला. तिला भावड्याला सांगावंसं वाटत होतं कीं, माझे पैसे पळवणाऱ्या त्या मवाल्याला पिटून काढ. पण तिला शब्द

सुचेनात. ती रडत रडत एवढंच उद्गारली, "भावड्या--मीं भीक मागितली—भीक मागितली—"

—तें ऐकतांच भावड्यानं तिचं डोकं सोडून दिलं. तो चरकला! अकस्मात् त्याच्या डोळ्यांपुढं शाळेजवळची कुणी मुलगी उभी राहिली. कानांतला एक डूल कुणी पळवला म्हणून ती रडत होती!—मग अनेक खिसे, अनेक पाटल्या, अनेक मौल्यवान वस्तू त्याला दिसल्या. मुंबईची मुशाफिरी आठवली. अन् मग तुरुंगांतली कोठडी कोंडमारा करूं लागली. तो दचकला! अन् पाहतां पाहतां भडकला. "गधडे भीक मागतेस?"—तो ओरडला व तिच्या अंगावर धावून गेला. त्याचं मन पश्चात्तापानं पोळत होतं व केकाटणाऱ्या किर्कीला तो गुरासारखा बडवीत होता...

* * *